# "अमरावती जिल्ह्यातील कुणबी (मराठा) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाजशास्त्रीय अध्ययन"

अमरावती विद्यापीठातील समाजविज्ञान विद्याशाखेतील समाजशास्त्र विषयाअंतर्गत आचार्य पदवीकरिता अमरावती विद्यापीठास सादर



## शोध प्रबंध



**- मार्गदर्शक-**

डॉ. पु.ल. भांडारकर
एम.ए. पीएच .डी. एल.एल.एम.
माजी कुलगुरू. नागपूर विद्यापीठ, नागपूर

**- संशोधन कर्ता -**

श्यामसुंदर शं. सोमवंशी
एम.ए. समाजशास्त्र

**अमरावती विद्यापीठ, अमरावती**

# ऋणनिर्देश

''अमरावती जिल्हयातील कुणबी (मराठा) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाजशास्त्रीय अध्ययन '' करणे हा प्रस्तुत संशोधन कार्याचा विषय होता. या उद्देशाची आज पूर्तता होत आहे. प्रस्तुत शोधप्रबंध समाजविज्ञान विद्याशाखे अंतर्गत आचार्य पदवीकरिता कृतार्थ मनाने सादर करीत असतांना मला मनस्वी समाधान होत आहे. परंतु या अनुषंगाने काही जेष्ठ व्यक्तिंप्रती कृतज्ञता व्यक्त केल्याशिवाय कार्यपूर्तीचा आनंद मला मिळू शकणार नाही.

माझ्या शोध प्रबंधाचे मार्गदर्शक गुरूवर्य डॉ. पु. ल. भांडारकर यांनी ''अमरावती जिल्हयातील कुणबी (मराठा) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाजशास्त्रीय अध्ययन,'' या प्रस्तुत शोध प्रंबधा विषयी मला वेळोवेळी मोलाचे मार्गदर्शन केले आणि त्यांच्या मार्गदर्शनामुळे हे संशोधन कार्य मी पूर्ण करू शकलो याबदल मी त्यांचा सदैव ऋणी राहील.

त्याचप्रमाणे माझे आई-वडील श्रीमती लताताई आणि स्व. शंकरराव सोमवंशी, यांचे आशीर्वाद व प्रेरणा यामुळे माझे कार्य पूर्ण होवू शकले. तसेच माझे प्रेरणा स्थान डॉ. अनिलभाऊ वऱ्हाडे, व डॉ. अनुराधा वऱ्हाडे, यांच्या आशीर्वादाने मी हे कार्य पूर्ण करू शकलो. तसेच माझ्या महाविद्यालयातील सर्व प्राध्यापक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांनी वेळोवेळी केलेल्या सहकार्य बद्दल मी त्यांचा आभारी व ऋणी आहे.

तसेच मला समाजशास्त्राचे गाढे अभ्यासक प्रा. रा.ज. लोटे. डॉ. एस. आर. मुरकुटे इत्यादींचे मला मोलाचे मार्गदर्शन लाभले त्याबद्दल मी त्यांचा शतशः आभारी आहे.

माझे मित्रव्दय, प्रा. कारमोरे, प्रा.दिनेश देशमुख, प्रा. राजेन्द्र हरणे, प्रा. सुनिल केदार, प्रा. संजय महल्ले, प्रा.राऊत, प्रा. पिपंळे, श्री. देवीदास अवघड यांचा ही मी आभारी आहे,

संशोधनात खरी आवश्यकता असते ती उत्तरदात्यांची. प्रस्तुत प्रबंधासाठी लागणारी आवश्यक माहिती मला उत्तरदात्यांनी आपला अमूल्य वेळ देऊन पुरविली त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. तसेच प्रस्तुत संशोधन प्रबंधाचे सुबक टंकलेखन श्री. गणेश झास्कर यांनी करून दिल्या बद्दल मी त्यांचा सुध्दा आभारी आहे.

**संशोधन कर्ता**

**श्यामसुंदर शं. सोमवंशी**

**एम.ए. समाजशास्त्र**

# अनुक्रमणिका

# तालिका सूची

# आकृती सुची

| १३ | ४.१३ | समाजाच्या जीवनपध्दतीचे सरंक्षण आणि समाजातील एकात्मतेबाबत जागृतता याबाबत माहिती दर्शविणारी आकृती | ४.१५(अ) |
|---|---|---|---|
| १४ | ४.१४ | गावात /शहरात समाजाचे उत्सव मेळावे भरतात काय याबाबत उत्तरदात्यांच्या मता विषयी माहिती दर्शविणारी आकृती. | ४.१९(अ) |
| १५ | ४.१५ | समारंभाबाबत इतर समाजातील लोकांना आमंत्रण याविषयी उत्तरदात्यांच्या माताविषयी माहिती दर्शविणारी आकृती. | ४.१९(ब) |
| १६ | ४.१६ | आपल्या समाजाच्या गावात /शहरात काही संस्था आहेत काय या प्रश्नाबाबत उत्तरदात्यांच्या मता विषयी माहिती दर्शविणारी आकृती. | ४.१९(क) |
| १७ | ४.१७ | आतंरजातीय विवाहाला विरोध- उत्तरदात्यांनी दर्शविलेली माहिती दर्शविणारी आकृती. | ४.१९(ड) |
| १८ | ४.१८ | समाजाची संस्कृती परंपरा दृढमुल व्हावी या करिता प्रयत्न करता काय? याविषयी उत्तरदात्यांच्या मताबाबत माहिती दर्शविणारी आकृती. | ४.१९(इ) |
| १९ | ४.१९ | समाजाची आर्थिक क्षेत्रामध्ये उन्नती - उत्तरदात्यांच्या मता विषयी माहिती दर्शविणारी आकृती. | ४.१९(ई) |
| २० | ४.२० | अनुदान ,शिष्यवृत्ती, पारितोषीक, आणि उत्तरदात्यांचे मत याबाबत माहिती दर्शविणारी आकृती. | ४.१९(फ) |
| २१ | ४.२१ | पुर्वीच्या पिढींच्या तुलनेत समोरील भविष्य - याविषयी उत्तरदात्यांच्या मता बाबत माहिती दर्शविणारी आकृती. | ४.१९(ग) |
| २२ | ४.२२ | स्थानिक संस्कृती आत्मा स्विकारणे आणि विकास - याबाबत उत्तरदात्यांच्या मता विषयी माहिती दर्शविणारी आकृती | ४.१९(ह) |

# प्रकरण १ ले

# प्रस्तावना

## १.१ प्रास्ताविक :-

प्रस्तूत संशोधन कुणबी ( मराठा ) जमातीत वर्षानोवर्षे व पिढ्यान पिढ्या होत असलेल्या सामाजिक आर्थिक गतिशीलतेशी संबधीत आहे. कुणबी ( मराठा ) हि जमात विदर्भ (महाराष्ट्र ) या भागातील एक प्रगत जमात मानली जाते. अनेक अध्ययना मध्ये हिचा उल्लेख प्रबल जाती (Dominant Caste ) असा होतो. उदा. रेडफिल्ड ने प्रबल जातीच्या व्याख्या केली आहे. जी जात सामाजिक ( कर्मकांडीय ) आर्थिक व राजकिय दृष्टया इतर जातीच्या तुलनेत वर्चस्व स्थापन करते किंवा वर्चस्व पूर्ण मानली जाते विशेषत: खेड्यामध्ये तिला प्रबल जात मानावायास हरकत नाही. हि प्रबळ जात सामाजिक दृष्टया उच्च दर्जा असणारी आर्थिक दृष्टया सुख, संपन्न असणारी व राजकीय दृष्टया इतर जातीवर आपली सत्ता गाजवण्याची क्षमता असणारी जात / जमात मानली जाते.

रसेल आणि हिरालाल यांनी या जमातीचा सखोल अभ्यास केला असून या जातीचे सखोल विश्लेषण केले आहे. त्याचे ते कुणबी (मराठा) देशातील एक अत्यंत प्रभावी महान अशी कृषी प्रधान जात असून मध्य प्रदेश व वऱ्हाड या विभागात तिचे बाहूल्य आढळून येते. मध्य प्रदेश व वऱ्हाड या प्रदेशात कुणबी ह्यांची संख्या जवळपास १ लक्ष ४० हजार इतकी होती (१९११) त्यांचा प्रादुर्भाव नागपूर, भंडारा, वर्धा व निमाड या क्षेत्रा मध्ये व मध्य प्रदेशातील काही भाग होता. वऱ्हाडा मध्ये त्यांची जनसंख्या ८ लाख, होती. हि संख्या या क्षेत्रातील इतर वर्गाच्या संख्येचा जवळपास १/३ होती. या क्षेत्रामध्ये ही जमात प्रमुख कास्तकार वर्ग म्हणून ओळखली

जात असे. ही जात कधीच दाट जंगला मध्ये वसली नाही. त्यांचा मुख्यव्यवसाय कृषी हाच राहिला. एकात्मिकृत मध्य प्रदेशा मध्ये वन्यभागात त्यांची संख्या गोंड आदिवासी वगळता दुसऱ्या क्रमांकावर होती. कुणबी या नावाला वेगवेगळया नावाने ओळखले जाते. दख्खन क्षेत्रामध्ये त्यांना कुणबी किंवा कोळंबी या नावांने ओळखले जाते. दक्षिण कोकणा मध्ये कुलवाडी या नावाने परिचित होती. गुजरात मध्ये कुणबी व बेलंगण मध्ये कुळवी या नावाने ओळखले जात असे. संस्कृत शिलालेखा मध्ये त्यांची कुटुंबिका हे नांव ( गृहस्थ ) देण्यात आले. म्हणून अशी सामान्य मान्यता आहे की, कुणबी या शब्दांची उत्पत्ती कुटुंब ( FAMILY ) यासंज्ञे पासून आली असावी. ११ शतकातील एका वर्णना मध्ये फॅाम्र्स या अभ्यासकाने कुणबी एवजी कुटुंबिक किंवा डाळीचे लागवड करणारे या अर्थाने त्यांच्या वापर केला आहे. एक दुसरा अभ्यासक प्राचीन राजपूत राज्यांच्यां मध्ये इतिहासात कुणबी ह्याचे वर्णन खालील प्रकारे करतो. गावांचे मुखिये पटेल असल्यामुळे असा एक समज आहे की, गावातील पटेल द्रविड भाषेतील कुलिया शब्दांशी संबंधित आहे.

एक मान्यता अशी आहे की, कुणबी लोक खानदेशात गुजरात मधुन ११ व्या शतकात प्रविष्ठ झाले. कारण की त्यांच्यावर गुजरातेत आलेल्या राजपूत जनजातीची भिती वाटू लागली. खानंदेशातून बहूतेक त्यांना उत्तर खानदेश, नागपूर व वर्धा जिल्हयाच्या भागात पलायन करावे लागले. हि शक्यता प्रबल आहे. नागपूर व वर्धा या क्षेत्रात १४ व्या शतकाच्या आधी त्यांनी आपले वास्तव्य हलविले. कारण त्यानंतरच्या गोंड साम्राज्यांची त्यांचे अनुकुलण होवू शकले नाही. आम्हास देशमुख व देशपांडे ही आडनावे येथे ऐकावयास मिळतात. देशमुख ही व्यक्ती खेड्याच्या एका गटाचा प्रमुख होता. व त्यांच्याकडे जमिणीवरील महसूल जमा करण्याची व वाटण्याची जबाबदारी होती. देशपांडे हे त्या क्षेत्रातील मुख्य पटवारी व लेखाकार होते. आपणासं असे ही मान्य करता येत की, या जमातीचे वर्धा आणि वऱ्हाड मधील आगमण हे १४ व्या शतकाच्या जवळपास झाले. कारण या काळात या क्षेत्रारमध्ये बहमनी राज्यांचा प्रभाव होता.

या नंतर झालेला कुणबी जमातीचे मोठ्या प्रमाणात वर्धा विभागात आगमन झाले, त्यावेळी या जमातीच्या लोकांना खेडुले उपजाती म्हटले जात होते. अर्थात खेडे म्हणजे गांव या मुळ शब्दापासुन खेडुले या शब्दांची उत्पत्ती झाली. Kitts ( P.19) च्या निर्वचना नुसार खेडुले व्यक्तीयाचेच दुसरे वर्णन म्हणजे दाडी नसणारे तरुण असा होता. मध्य प्रदेशातील सामाजिक व आर्थिक दृष्टया सर्वात श्रेष्ठ उपजाती तिरुळे ही होती. तिरुळे आज स्वत:ला राजपूत असल्याचा दावा करतात. त्यांचे म्हणने असे की, त्यांचे पूर्वज थेरुळे या राजपुताना क्षेत्रातील गांवामधुन आले होते व तिरोळे लोकांनी कृषी हा व्यवसाय स्विकारला आणि कालांतराने स्वत:ला कुंणबी या जमातीचा एक भाग बनवून टाकला. देशमुख ही अनुवांशीक पदवी त्यांना उच्च सामाजिक दर्जा देवू शकली हे देशमुख सामान्यपणे तिरोळे या उपजातीचे सदस्य होते. हे देशमुख सद्य स्थितीत स्वत:ला कुणबी जातीच्या कुलीन तांत्रीक शाखेचा सदस्य समजतात आणि त्यांची विवाह आपसात होऊ शकतात. विधवांचे पूर्नविवाह व त्यांना शुभ, समारंभामध्ये भाग घेण्याची अनुमती हे देत नाहीत. बांधेकरा हे कुणबी जमातीचाच एक वेगळा समूह असा आपला परिचय देतात. बांधेकरामध्ये देशमुख कुटुंब समाविष्ठ झाले आहे आणि त्यांचा सामाजिक दर्जा तिरळे कुणबी यांच्या पेक्षा थोडा कमी आहे. Kitts यांनी वऱ्हाडात वास्तव्य करीत असलेल्या अनेक उपजातीचेही वर्णन केलेले आहे. त्यांच्यात उत्तर भारतीय व हिंदूस्थानी ढोले वार, जयस्वार आणि शिंगरोरे या उपजातीचा समावेश होतो. रसेलच्या मते ते लोई बहूदा कुर्मी जातीचे आहेत व वऱ्हाडात स्थायिक झाल्यानंतर ते कुणबी जातीत समाविष्ठ झाले असावेत असे त्यांना वाटते. वंजारी उपजाती ही संख्येने बरीच मोठी आहे व बंजारा जमातीची एक उपशाखा आहे. त्यांनी कृषीला आपला मुख्य व्यवसाय म्हणून जवळ केले आणि कालांतराने कुणबी जातीने त्यांना आपल्या जवळ केले ही एक प्रकारे त्यांची पदोन्नती होती. लोहारे यांचे नाव मेहकर ( लोणार ) येथील खाऱ्यापाण्याच्या तलावा वरुन पडलेले आहे. घाटोळे उपजातीच्या लोकांनी सामान्यपणे

स्मशान घाटांच्या बाजुला आपली वस्ती केली. बावने कुणबी हे नाव बावन वऱ्हाड या नावातून उत्पन्न झाले. बावन वऱ्हाड हे नाव मोगलराज्य कर्त्यांनी दिलेले नांव आहे. कारण या प्रदेशातून बावन लाख रु. महसूल प्राप्त होत असे. गढाव ही उपजाती गाढव पालनाचे व्यवसाय करत असे व त्यांच्या कडे पाहण्याची दृष्टी ही निच होती, आणि सामान्यपणे त्यांच्या हातचे पाणी पित नव्हते. निमाळ ही एक गुजराती कुणब्याची शाखा आहे. त्यांना कूलत: गुजर असे म्हणण्यात येई. त्यांचे स्थानिक उपविभाग लेवे आणि करवा असून त्यांना दालीया असेही म्हणतात असे दिसून येते, कुणबी जमात भुतकाळात एक कास्तकार एवढीच समजण्यात येई आणि वेगवेगळया जातींनी कृषी हा व्यवसाय स्वत: साठी पत्करला अनेक खेड्यामध्ये कुणबी ही निवड रय्यत ( प्रजाजन) मानण्यात येत असत आणि पुष्कळशा अनेक गांवामध्ये कुणबी हेच असे रय्यत मानले गेले की ज्यांचा दर्जा गाव साफ ठेवणे , हस्तकला शिकणे, इतपत होता. त्यांच्या खालील सामाजिक दर्जावर अस्पृस्य महार लोकांना जागा होती, असे महार व न्हावी यांना कुणबी विभागामध्ये साधारण स्थान होते. कुणब्यांच्या विवाहात अपवित्र गोष्टींना पवित्राच्या कक्षेत आणण्याचे काम यांचेच होते. हि वास्तवता हिंदू समाजाच्या प्राचीन व प्राथमिक वास्तवतेचे प्रतिनिधीत्व करतात.

प्रत्येक उपजातीचे अनेक बहिर्विवाही गोत्र असतात . हि गोत्र व्यवस्था एक प्रकारे परसपर संबंधाची व सबंधाचे अनौचित्य निर्धारीत करणारी सारणी असते. याला आपण कुळ म्हणून संबोधतो. काही कुठ नैसर्गिक वस्तु आणि उपाधी वा कुळ प्रस्थापित करणारे नामवंत संस्थापक इत्यादिच्या आधारे आपले नाव धारण करतात. काही इतर कुळ ज्यात व्यक्तीचा समावेश झाला असेल त्यांचा नावाच्या आधारे आपले वैशिष्टय प्राप्त करतो. काही कुळ यांच्या महत्वानुसार खालील प्रमाणे आहे. उदा. वानखडे, कडू, जगताप, मेघे, कदम, लोहकरे, शिंदे, हागोरे, आगलावे, कळमकर, उघडे,वाणी, सुतार, बावने उपजातीचे महत्वाचे

कुळ कानतोडे, तिरमारे, पाथरे, घोरमाळे, वाघमारे, नाकतोडे प्रत्येक उपजाती मध्ये अनेक कुळ असतात. तिरळे कुणबी जाती मध्ये ६६ कुळ आहेत कुळांची नावे हे गृहित कृत्य प्रमाणित करतात कि कुणबी हे मुख्यत्वेकरुन आर्यपूर्व व आदिवासी जमातीतून उत्पन्न झाले आहे. जातीच्या उत्पत्ती बाबत चांगले अनूमान "A naturalist on the prowl" या वरुन काढले जाऊ शकतात व ***एन एथापॅलिट*** या ग्रंथाच्या सर्वांकश लेखकांच्या अनुमानाच्या आधारे असे विधान केले जाऊ शकते की कुणबी हा प्रारंभी स्वरुपाचा वन्य समाज्यातील निवासी असून तो काही दशकापूर्वी पर्यंत वनस्पतीचे व धान्याचे बी नसलेल्या गावात विरवून पशुची शिकार करीत होता.त्यांच प्रमाणे बैगा हि जमात मध्य प्रदेशात करत असते. अनेक अभ्यासकांनी म्हटले आहे कि, नाशिक जिल्ह्या मधील एखाद्या कुणबी व्यक्तीला हे वाटणे स्वाभाविक आहे की, त्यांची संतती त्यांच्याच मुलीच्या माध्यमाने त्यांच्या घरात रहावी आणि विवाह आपसात व्हावेत तसेच हे संघटन हळूहळू प्रदेशाच्या रुपात परिणीत व्हावे आणि हि प्रथा एक दुसऱ्यावर जाचक स्वरुपात लागू केली जावी एकेकाळी हे भावाचे कर्तव्य मानले जात होते कि त्याने आपल्या बहिनी करीता योग्य वर पहावा. आता बहीणीचा हा आग्रह असतो कि तिच्या मुला करीता योग्य वधु भावाने शोधावी याचे स्पष्टिकरण कुणबी समाजा व्यतिरिक्त इतर कृषी प्रधान जाती मध्ये असे आहे की, पत्नीचे श्रम सतती निर्माण करण्या मध्ये पाहता मुलीचे कार्य व उत्तरदायीत्व जास्त महागडे आहे आणि मुलीच्या लग्नाकरीता बरीच मोठी किंमत मोजावी लागते. कुणबी या मध्ये हा विचार अजून प्रबळ आहे कि मुलीचे लग्न लवकरात लवकर व्हावे की दहा ते विस वर्षाच्या दरम्यान मुलीचे लग्न संपन्न व्हावे समाजमान्य वधू मूल्ये कितीही असले तरी त्या पेक्षा जास्त मोठी रक्कम वधू मूल्ये म्हणून दिली व स्विकारली जाते.

कुणब्यांन मध्ये बहूपत्नीत्वाची प्रथा हि विरळच पाहिली जाते, आणि दुसऱ्या मुलांशी विवाह तेव्हाच केला जातो जेव्हा पहिली पत्नी नि संतान आहे किंवा तिचे चारीत्र्य चांगले

नाही. या जातीमध्ये घटस्फोट हि स्विकृत प्रथा आहे. पण अनेक स्थानिक क्षेत्रामध्ये घटस्फोटीत स्त्री दुसरा विवाह करु शकत नाही. विवाह पूर्वी जर एखाद्या मुलीला मुलाकडून मोहीत करण्यात आले तर दंड दिला जातो आणि काही काळानंतर त्यांच्यात सामाजिक क्रिया होऊ शकते. तिरळे आणि बांधेकर यांच्या मध्ये एखादी स्त्री ठेवणे हे स्विकृत आहे. पण हा मोठा गुन्हा नव्हे पण वाधेकर आणि तिरळे उच्च या उपजाती मध्ये हे निषेध मानले जाते.

कुणबी जातीना पूर्णविवाह मान्य आहे. याला अपवाद म्हणजे देशमुख हि उपजात व तिरळे कुणबी ही उपजात आहे, जर पती वारला तर ती विधवा पत्नी व आपल्या वडिलाकडे जावू शकते. तिचे वडील तिचा दुसरा विवाह घडवून आणतात. यालाच चोळी - लुगड असे म्हणतात तिची किंमत वसूल करतात ( विवाह खर्च ) आणि तिला नविन कपड्यांची भेट देतात. हि किंमत पत्नीच्या वया प्रमाणे असते आणि शंभर ते पाचशे पर्यत तिचा विस्तार असू शकतो. विधवा आपल्या कडून बाहेरील कोणत्याही पुरुषांशी विवाह करु शकते. पण ती मृत नवऱ्याच्या लहान भावाशी विवाह करु शकत नाही. ही प्रथा मराठ्या मध्ये पूर्णत: अमान्य आहे. आतापर्यत आपण कुणबी जातीच्या इतिहासाचे सिंहावलोकन केले. आता आपल्या संशोधनात कुणबी ( मराठा ) यातील मराठा जाती प्रथा, उत्पत्ती, परंपरा यांचे वर्णन करावयाचे आहे. मराठा दक्षिण भारताच्या अनेक जाती मधील एक जात आहे. या जातीचे वैशिष्ट असे की, ही एक सैनिकी जात असून कित्येक शतके छत्रपती शिवाजी महाराजांच्या नंतर पेशवाई साम्रराज्याचया सैनिकी संघटनांचीधूरा त्यांनी सांभाळली. मराठा जातीचे नाव घेतले तर कुणालाही त्यांच्या शौर्याबद्दल लढावू वृत्तीबद्दल आकलन होत असते. सन १९११ च्या सुमारास मराठाच्या अधिपत्याखाली असलेल्या प्रांतामध्ये मराठ्यांची संख्या ३५००० इतकी होती. दक्षिण क्षेत्रात त्यातील नागपूर भागात नऊ हजार आणि रायपूर होशंगाबाद आणि निमाळ या सारख्या क्षेत्रामध्ये ती विखूरलेली होती. वऱ्हाडाच्या क्षेत्रात त्यांची संख्या बळ ६०००० पर्यत पोहचलेली होती आणि एकात्मीकृत प्रशासकिय क्षेत्रात यांची प्रचंड संख्या नऊ लाख चाळीस

हजार इतकी होती १९०१ च्या भारतीय जनगणेनेत त्यांची पंजीकृत संख्या ५० लाखापर्यंत पोहचलेली होती. मराठा ही संज्ञा मराठी भाषेचे माहेर घर या दोहो मध्ये गलत होण्याची शक्यता आहे. कारण की एकीकडे मराठा म्हणजे मराठी भाषा जिथे बोलली जाते ते क्षेत्र आणि दुसरी कडे ही भाषा प्रचलित असलेल्या भौगोलिक टापू या मध्ये विभाजन करणे बरेच कठीण आहे. ज्या प्रदेशातून मराठी हे नांव प्राप्त झाले ते प्रदेश म्हणजे महाराष्ट्रात काहीनी असे मान्य केले आहे की, महाराष्ट्र ही संज्ञा वेगवेगळ्या प्रकारे समजवता येते एक भाष्य असे की, महाराष्ट्र म्हणजे महान देश, दुसरे भाष्य महार लोकांचा देश आणि महाराष्ट्राचे तिसरे स्पष्टीकरण असे की, हा प्रदेश राष्टकुट साम्राज्य किंवा राजेशाहितून निर्माण झाला. ते राष्ट्रकुट साम्राज्य इ.स पूर्व ५० या आधी काही शतके बलिष्ट होते. राष्ट्रकुट हे नांव Rattaha and Maha OR महान या संयोगातून निर्माण झाले. राष्ट्रकुट साम्राज्य संबंध राजपूतांशी लावला गेला आहे नाशिक गॅझेटिअर, या मध्ये असा उल्लेख आहे की, सम्राट अशोकांनी ज्या-ज्या ठिकाणी आपले दूत पाठविले त्यापैकी एक ठिकाण महाराष्ट्र हे होते व इ.स. ८५० पूर्व दरम्यान या घटनेचा उल्लेख आहे . महाराष्ट्र मध्ये ९९ हजार गांवे होती महाराष्ट्र हे गांव जरी प्राचीन असले तरी तेराव्या आणि चवदाव्या शतकात मराठा हि संज्ञा प्रचलनात आली. राष्ट्रकुटाच्या साम्राज्य पासून महाराष्ट्र या संज्ञाची उत्पत्ती तो पर्यंत फारशी प्रचलित नव्हती या काळापर्यंत महाराष्ट्र या संज्ञेचा अर्थ महारांचा देश असा करण्यात आला नव्हता. मराठा हि जात सैनिक सेवूतून निर्माण झाली आहे, हि शक्यता टाळता येत नाही, कारण ते मराठा हे कुणबी जनसंख्येतून नावलौकिकास पोहचले. कुणबी लोकसंख्या ऐतिहासिक काळाचा संदर्भ न घेता हि मराठा जातीच्या उत्पत्तीस जबाबदार धरली तरी ग्रॅंट आणि डफ यांच्या उल्लेखाप्रमाणे मराठा जातीची अनेक कुटूंबे मुसलमान राज्य कर्त्यांच्या ( विजापूर व अहमदनगर) १५ व्या शतकात काही अधिकारी पदे स्विकारली होती, निबांळकर कुटूंबाने इस्लामी राज्य कर्त्यांच्या राज्या मध्ये अनेक अधिकारी पदे प्राप्त केले आणि संभवता

त्या-त्या गोत्रजांनी मुसलमानांच्या सेने मध्ये नोकऱ्या धरल्या परंतु मराठा हे नाव प्राप्त झाले वा नाही अजूनही शंकास्पद बाब आहे. ही बाब औरंगजेबच्या सोबत झालेल्या गनिमी युध्दाच्या वेळेस स्पष्ट झाली. मराठा लोक कुण्या एका राजपूत उत्पत्तीचा दावा करतात उदा. पानवर, सोळंकी, सुर्यवंशी १८३६ दरम्यान एंथोहोन यांनी उदयपूरच्या सिसोदिया राणा जो उदयपूर घराण्यातील सर्वात पवित्र कुटूंबाचा प्रतिनिधी मानला गेला. त्यांने हे मान्य केले की, भोसले व काही इतर मराठा कुटूंब यांना राजपूत मानण्यात यावे. कर्नल टॉड म्हणतो की, शिवाजी माहराज हे संजोशी या राजपूत राज्यांचे वंशज होते. पुढे संजोशीला शिवाजीच्या उत्पत्तीचा तेरावा सरदार म्हणून दाखविण्यात आले. त्याप्रमाणे नागपूरचे भोसले यांची उत्पत्ती बनबिर या राणा कडून दाखविण्यात आली. बनबिरला उदयपूर मधून बाहेर काढले होते. बनबिर याने दख्खन क्षेत्रावर बरेच वर्षे राज्य केले आणि मुसलमान आक्रमनाच्या आधी तो तिथला मुकूट धारी राजा घोषित झाला.

असे दिसून येते की, राजपूतांची कुलीन तंत्राने तेथे आपली मूळे पक्के केली हे कर्नल टॉड चे मत होते. कर्नल टॉड ने लिहले आहे की, उत्तर आणि दक्षिण भागातील राज घराणे, राजपूतांच्या अधिपत्वाखाली होते, निंबाकर, फलकिया, व पाटणकर हि नांवे या संदर्भात महत्वाची आहेत. हे विधान फक्त काही महत्वाच्या कुटूंबाना लागू पडते. ही कुटूंबे कुणबी जाताची होती, सोलापूर मध्ये मराठा व कुणबी कुटूंबीयांच्या ९६ कुळे होते आणि जशी मराठा लोकामध्ये असतात. एक सारखे आडनावे यांची वैशिष्ठ होती. १८५१ मध्ये प्रकाशित झालेले सातरा गॅझटिअर ने मराठा व कुणबी यांच्यात फारसा भेद दाखविला नाही आणि गॅझटिअस प्रमाणे कुणबी आणि मराठ्या मध्ये नेहमीच काही भिन्नता राहिली या गोष्टिवर भर दिला. याही गोष्टीवर भर देण्यात आला की ते वेगवेगळ्या जातीचे प्रतिनिधी आहेत. मराठा कुटुंबिया मध्ये बरेच उत्तर भारतीय लोकांचे रक्त असू शकते.

हजार इतकी होती १९०१ च्या भारतीय जनगणेनेत त्यांची पंजीकृत संख्या ५० लाखापर्यंत पोहचलेली होती. मराठा ही संज्ञा मराठी भाषेचे माहेर घर या दोहो मध्ये गलत होण्याची शक्यता आहे. कारण की एकीकडे मराठा म्हणजे मराठी भाषा जिथे बोलली जाते ते क्षेत्र आणि दुसरी कडे ही भाषा प्रचलित असलेल्या भौगोलिक टापू या मध्ये विभाजन करणे बरेच कठीण आहे. ज्या प्रदेशातून मराठी हे नांव प्राप्त झाले ते प्रदेश म्हणजे महाराष्ट्रात काहीनी असे मान्य केले आहे की, महाराष्ट्र ही संज्ञा वेगवेगळ्या प्रकारे समजवता येते एक भाष्य असे की, महाराष्ट्र म्हणजे महान देश, दुसरे भाष्य महार लोकांचा देश आणि महाराष्ट्राचे तिसरे स्पष्टीकरण असे की, हा प्रदेश राष्टकुट साम्राज्य किंवा राजेशाहितून निर्माण झाला. ते राष्ट्रकुट साम्राज्य इ.स पूर्व ५० या आधी काही शतके बलिष्ट होते. राष्ट्रकुट हे नांव Rattaha and Maha OR महान या संयोगातून निर्माण झाले. राष्ट्रकुट साम्राज्य संबंध राजपूतांशी लावला गेला आहे नाशिक गॅझेटिअर, या मध्ये असा उल्लेख आहे की, सम्राट अशोकांनी ज्या-ज्या ठिकाणी आपले दूत पाठविले त्यापैकी एक ठिकाण महाराष्ट्र हे होते व इ.स. ८५० पूर्व दरम्यान या घटनेचा उल्लेख आहे . महाराष्ट्र मध्ये ९९ हजार गांवे होती महाराष्ट्र हे गांव जरी प्राचीन असले तरी तेराव्या आणि चवदाव्या शतकात मराठा हि संज्ञा प्रचलनात आली. राष्ट्रकुटाच्या साम्राज्य पासून महाराष्ट्र या संज्ञाची उत्पत्ती तो पर्यत फारशी प्रचलित नव्हती या काळापर्यंत महाराष्ट्र या संज्ञेचा अर्थ महारांचा देश असा करण्यात आला नव्हता. मराठा हि जात सैनिक सेवूतून निर्माण झाली आहे, हि शक्यता टाळता येत नाही, कारण ते मराठा हे कुणबी जनसंख्येतून नावलौकिकास पोहचले. कुणबी लोकसंख्या ऐतिहासिक काळाचा संदर्भ न घेता हि मराठा जातीच्या उत्पत्तीस जबाबदार धरली तरी ग्रॅंट आणि डफ यांच्या उल्लेखाप्रमाणे मराठा जातीची अनेक कुटूंबे मुसलमान राज्य कर्त्यांच्या ( विजापूर व अहमदनगर) १५ व्या शतकात काही अधिकारी पदे स्विकारली होती, निबांळकर कुटूंबाने इस्लामी राज्य कर्त्यांच्या राज्या मध्ये अनेक अधिकारी पदे प्राप्त केले आणि संभवता

त्या-त्या गोत्रजांनी मुसलमानांच्या सेने मध्ये नोकऱ्या धरल्या परंतु मराठा हे नाव प्राप्त झाले वा नाही अजूनही शंकास्पद बाब आहे. ही बाब औरंगजेबच्या सोबत झालेल्या गनिमी युध्दाच्या वेळेस स्पष्ट झाली. मराठा लोक कुण्या एका राजपूत उत्पत्तीचा दावा करतात उदा. पानवर, सोळंकी, सुर्यवंशी १८३६ दरम्यान एंथोहोन यांनी उदयपूरच्या सिसोदिया राणा जो उदयपूर घराण्यातील सर्वात पवित्र कुटूंबाचा प्रतिनिधी मानला गेला. त्यांने हे मान्य केले की, भोसले व काही इतर मराठा कुटूंब यांना राजपूत मानण्यात यावे. कर्नल टॉड म्हणतो की, शिवाजी माहराज हे संजोशी या राजपूत राज्यांचे वंशज होते. पुढे संजोशीला शिवाजीच्या उत्पत्तीचा तेरावा सरदार म्हणून दाखविण्यात आले. त्याप्रमाणे नागपूरचे भोसले यांची उत्पत्ती बनबिर या राणा कडून दाखविण्यात आली. बनबिरला उदयपूर मधून बाहेर काढले होते. बनबिर याने दख्खन क्षेत्रावर बरेच वर्षे राज्य केले आणि मुसलमान आक्रमनाच्या आधी तो तिथला मुकूट धारी राजा घोषित झाला.

असे दिसून येते की, राजपूतांची कुलीन तंत्राने तेथे आपली मूळे पक्के केली हे कर्नल टॉड चे मत होते. कर्नल टॉड ने लिहले आहे की, उत्तर आणि दक्षिण भागातील राज घराणे, राजपूतांच्या अधिपत्वाखाली होते, निंबाकर, फलकिया, व पाटणकर हि नांवे या संदर्भात महत्वाची आहेत. हे विधान फक्त काही महत्वाच्या कुटूंबाना लागू पडते. ही कुटूंबे कुणबी जाताची होती, सोलापूर मध्ये मराठा व कुणबी कुटूंबीयांच्या ९६ कुळे होते आणि जशी मराठा लोकामध्ये असतात. एक सारखे आडनावे यांची वैशिष्ठ होती. १८५१ मध्ये प्रकाशित झालेले सातरा गॅझटिअर ने मराठा व कुणबी यांच्यात फारसा भेद दाखविला नाही आणि गॅझटिअस प्रमाणे कुणबी आणि मराठ्या मध्ये नेहमीच काही भिन्नता राहिली या गोष्टिवर भर दिला. याही गोष्टीवर भर देण्यात आला की ते वेगवेगळ्या जातीचे प्रतिनिधी आहेत. मराठा कुटुंबिया मध्ये बरेच उत्तर भारतीय लोकांचे रक्त असू शकते.

तत्वत: मराठा लोकांना उच्च अधिकार प्राप्त झाले यांच प्रकारची परिस्थिती मध्य प्रदेश व वऱ्हाडात होती आणि येथे मराठा आणि कुणबी एकत्र समुदायातील प्रतिनिधी मान्यण्यात आले. मुंबईमध्ये मराठा लोकांनी मोठ्या प्रमाणात कुणबी जातीच्या मुलीशी विवाहाला उत्तेजना दिली, दुसरीकडे कुणबी लोकांनी आपल्या मुलांच्या विवाहासाठी मराठ्यांना दुय्यम मानले होते. कारण यांचा संबंध राष्ट्रकुट राज्य व्यवस्थेशी होता आणि हि राज्य व्यवस्था या क्षेत्रात काही शतके प्रभुत्वाच्या दर्जावर होती. राष्ट्रकुटराज्यकर्ते बऱ्याच प्रमाणात राजपूतांची संबंध ठेवणे अनुकूल मानित असत असा अनुमान काढला जावू शकतो कि मराठा जातीची उत्पत्ती विशुध्दता सैन्यातून झाली असावी आणि महाराष्ट्राच्या जाती पासून तिची रचना झाली असावी आता हि गोष्ट खरी आहे की, महत्वाचे कुटुंबे काही राजपुतांना आपले पूर्वज मानत असत. सर इबेटसन यांचा विचार असा होता की, जुन्या काळात देखिल राजपूत, जाट, आणि जाट जातीची कुलीन कुटुंबे राजपूतांच्या दर्जाची होती. खंडाईत तलवारबाज किंवा उडीसाचे तलवार बाज हे दोन्ही देखील सैन्य सेवेतून निर्माण झाले होते. सररिझले यांच्या मता नुसार मराठा लोक हे सिथियन ( Seithin ) वंशाचे होते. या क्षेत्रातील लोकांचा चेहरा मोहरा रिसलेच्या सिध्दांताला बराच पुरक आहे.

मध्यप्रदेशातील मराठा जाती मधील बर्हिविवाही कुळ यांच्या मध्ये महत्वाचे सात कुळ होते आणि यांच्या मध्ये परस्पर विवाह संबंध होतच नसत. यांना आगळे वेगळे नाव देण्यात आले ते या प्रमाणे सेव्हन लिडिंग कॅक्स, सेव्हन हाऊसेस ज्यात काही कुटुंबाचा समावेश होतो. तो खालील प्रमाणे भोसला, महकिक, शिंकि, पालके आणि मोहिते हि सातसदने एका काळी अंतर्विवाह समूह होती यांच्या मध्ये आपआपसात विवाह होत असत,. परंतू हल्ली हि सवलत आणखी सैल करण्यात आली आणि या सात सदनां मध्ये नियोजीत विवाह आहे ही गोष्ट लक्षात ठेवली पाहीजे की, भोसला कुटुंबाचे हल्लीचे प्रतिनिधी गुजर उपजातीचे आहेत. नागपूरच्या

शेवटच्या राजाने दत्तक विधानापूर्वी गुजर जमातीचेच होते. अनेक गोत्रांना आधी सांगितल्या प्रमाणे राजपूत गोत्रांची नावे होती. त्यापैकी काही पूर्वीच्या राज्यांच्या गोत्रांना सुसंग होती. रघुजी हे दत्तक विधानपुर्वी वेगळया गोत्राचे प्रतिनिधी होते हे राजपूत गोत्र नावाने संबोधित केले जात असे या पैकी काही नावे मौर्य , सोळकें आणि यादव अशी होती. त्यात आणखी काळे, पांढरे, घोरपडे, जगताप अशी नावे आहेत. निंबाळकर, घाडगे, मागे, डफले, जाधव व भोसला गोत्र हि सर्वात जूनी आणि प्रतिष्ठीत गोत्र मानली जातात. शहान्नव गोत्रा व्यतिरिक्त मध्य प्रदेशात काही स्थायिक प्रजाती असून त्यांची सामुहिक स्थिती खालची आहे कुणबी लोकामधील विवाह बाबतचे निर्बंध मराठा समाजा मध्ये तितक्याच कठोर पणे लावले जातात. त्यामुळे त्यांचा पूर्ण उल्लेख करणे अप्रस्तुत आहे.

## १.२ मराठयांची वाशिक माहिती -

अगदी प्राचीन काळी या प्रदेशात राहणाऱ्या लोकांना रट्ट असे म्हणत असत. ह्या रट्ठ जमाती उद्योगशीलता, संपत्ती आणि पराक्रम याकरिता विशेष प्रसिध्द होत्या. या रट्टांचेच पलीकडे अनेक उपमातीमध्ये रुपांतर झाले. सातवाहन, भोज, मौर्य, कंदब, यादव,चालुक्य,राष्ट्रकुट, परमार इत्यादी जमाती रट्टापासूनच निर्माण झाल्या ही गोष्ट उघड आहे. या जमातींनी महाराष्ट्रात ठिकठिकाणी आपली राज्ये स्थापून विद्या आणि कला ह्यांना बरेच उत्तेजन दिले. या जमातीमध्ये अत्यंत उत्तम दर्जाचे राज्यकर्ते सुध्दा होवून गेले. एल्लोरा, अजिंठा, एलिफंटा इत्यादी ठिकांणच्या लेण्यांवरुन त्या काळातील सांस्कृतिक उत्कर्षाची कल्पना आपल्याला येऊ शकते. हे रट्ट आणि त्यापासून निर्माण झालेल्या या उपजमाती हे मराठ्यांचे उगमस्थान समजले पाहिजे. बहुतांश इतिहासकारांनी राजवाड्यांचे हे मत मान्य केलेले दिसते. हे रट्टा डोंगराळ प्रदेशामुळे काटक आणि कष्टाळू बनले होते. उत्तरेकडील आर्यातील विशेष गुण

आणि पश्चिम हिंदुस्थानातील वैशिष्टये यांचा मोठा मनोहर संगम या मराठ्यांमध्ये झालेला आपणाला आढळून येईल.

**मराठी भाषा :-**

आर्य ज्यावेळी हिंदुस्थानात आले त्यावेळी त्यांनी आपल्याबरोबर वैदिक संस्कृती आणि संस्कृत भाषा आपल्याबरोबर आणली. आर्यांची ही मूळ संस्कृत भाषा अतिशय गोड आणि आर्यांच्या उच्च संस्कृतीची निदर्शक होती. तिचा हिंदुस्थानातल्या स्थानिक भाषांवर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही. या स्थानिक भाषांना सर्वसाधारणपणे प्राकृत भाषा म्हणून ओळखले जाऊ लागले. हळूहळू संस्कृत भाषा ही विद्वान पंडीत, कवी आणि लेखकांची भाषा म्हणून ओळखल्या जाऊ लागली, तर प्राकृत भाषा सर्वसामान्यांची म्हणून ओळखली जाऊ लागली. प्रादेशिक वैशिष्टये आणि धार्मिक महत्व यानुसार प्राकृत भाषा सर्वसामान्यांची म्हणून ओळखली जाऊ लागली. प्रादेशिक वैशिष्टये आणि धार्मिक महत्व यानुसार प्राकृत भाषांचे वर्गीकरण पाच सहा प्रकारे होऊ लागले. महाराष्ट्री, पाली किंवा मागधी , अर्धमागधी,सौरसेनी आणि पैशाची इत्यादी प्रकारे प्राकृत भाषेचे वर्गीकरण होऊ लागले. त्यापैकी बौद्ध वाङ्मय हे पालीमध्ये लिहिल्या गेले तर जैन वाङ्मय अर्धमागधी मध्ये लिहिलेले आपणाला आढळून येते. सैरसेनी भाषा मथुरेच्या आसपास बोलली जात होती तर पश्चिम पंजाबात पैशाची भाषा बोलली जात होती. या सर्व प्राकृत भाषांमध्ये महाराष्ट्री ही भाषा अतिशय लोकप्रिय होती. उत्तरेत माळव्यापासून राजपूतान्यापर्यंत आणि दक्षिणेत कृष्णपासून तुंगभद्रा नदीपर्यत महाराष्ट्री भाषा बोलली जात होती. आरंभीच्या भाषेचासुध्दा उपयोग करीत असत. कालीदासाने आपल्या नाटकातून हलक्या दर्जाची पात्रे प्राकृत भाषेतून बोलत असलेली दाखवलेली आपल्याला आढळतात. ख्रिस्तपूर्व ५०० च्या सुमारास संस्कृत भाषा हीच बोलीभाषा म्हणून लोप झाला आणि प्राकृत भाषा सर्वत्र वापरली जाऊ लागली. यावेळी महाराष्ट्री भाषेला अतिशय महत्व चढले आणि या

काळात महाराष्ट्री भाषेत चांगल्या दर्जाचे वाङ्मय निर्माण झाले. सप्तशती, सेतुबंध आणि कर्पूरमंजरी ही त्याचीच उदाहरणे होत. सातवाहन वंशातील हल राजाने या काव्यग्रंथाची निर्मिती केली. या ग्रंथात महाराष्ट्रातील अनेक पर्वत, नद्या आणि शहरे यांचा उल्लेख आढळतो. महराष्ट्री भाषा ही सर्वसाधारणपणे १००० वर्षे प्रचलित असावी. ख्रिसतपूर्व ५०० पासून ख्रिस्तानंतर ५०० वर्ष इतक्या कालखंडात महाराष्ट्री आणि इतर प्राकृत भाषा यांचा प्रभाव असावा, यावर सर्वच भाषा शास्त्रज्ञांचे एकमत आढळून येते. यानंतर मात्र मराठी आणि इतर आधुनिक भाषांचा उगम आणि विकास घडून आला. मराठीतील सर्वात आद्य ग्रंथ कोणता असा प्रश्न या ठिकाणी साहजिकच निर्माण होतो. म्हैसूर राज्यात सर्वात जुना मराठी शिलालेख आढळून येतो. त्यावर ख्रिस्तोत्तर ९८३ हे वर्ष आढळून येते. पंचतंत्राचे मराठी भाषांतर हे सुध्दा अतिशय जुने समजले जाते. परंतु मराठीमध्ये खऱ्या अर्थाने साहित्यनिर्मिती होण्याला प्रारंभ झाला तो बाराव्या शतकापासून झाला असे म्हटले पाहिजे. त्या काळात कुमूंदराज याने विवेकसिंधू हा तत्वज्ञानपर एक ग्रंथ लिहिला . हा मराठीतील आद्य ग्रंथ समजल्या जातो. तेराव्या शतकाच्या अखेरीस जे महानुभाव वाङ्मय निर्माण झाले तेही मराठीच्या विकासाच्या दृष्टीने अतिशय महत्वाचे ठरले. तेराव्या शतकात म्हाइंभट या चक्रधरस्वामीच्या शिष्याने लिळाचरित्र हे चक्रधरस्वामीचे चरित्र लिहिले. परंतु मराठीला खरी प्रतिष्ठा ज्ञानेश्वरानी मिळवून दिली. संस्कृत भाषेतील उत्तम उत्तम विचारधन आपण मराठीत आणून दाखवतो अशी ज्ञानेश्वरांनी प्रतिज्ञाच केली होती. मराठी भाषेचे मोठेपण सांगतांना-

**माझा मऱ्हाटाची बोलु कवतिके ।**

**परि अमृततातेहि पैजा जिंके ।**

**ऐसी अक्षरे रसिके –**

**मेळवीन ।**

ज्ञानेश्वारांनी आपली ही प्रतिज्ञा पुरी केली आणि संस्कृत भाषेतील फार मोठे विचारधन त्यांनी मराठीत आणून सोडले. ज्ञानेश्वरांनंतर महाराष्ट्रात अनेक संत महात्मे होवून गेले. त्यांनी मराठीत लिखाण करुन मराठी भाषेला संपन्न बनविले.

**सर्वसाधारण स्थिती –**

महाराष्ट्रात कोणाकोणाच्या राजवटी होऊन गेल्यात, त्याचे महाराष्ट्राच्या इतिहासावर कोणते परिणाम घडून आले असा प्रश्न जेव्हा निर्माण होतो त्यावेळी महाराष्ट्रात अनेक ऐतिहासिक घराण्यांनी राज्य केले असे आपल्याला दिसून येते. त्यापैकी पहिले घराणे म्हणजे मौर्य घराणे या घराण्यातील चंद्रगुप्त मौर्याने महाराष्ट्रावर आपली सत्ता प्रस्थापित केल्याचा उल्लेख आपल्याला आढळून येतो. त्यानंतर चंद्रगुप्ताचा नातू अशोक याने महाराष्ट्राच्या पूर्वेला आपले वर्चस्व स्थापन केले. अशोकाचे जे स्तंभ ठिकठिकानी आढळून येतात त्यात आपल्याला ही माहिती मिळते. यानंतर जवळजवळ ३०० वर्षे सातवाहनांनी महाराष्ट्रावर राज्य केले . (ख्रिस्तपूर्व ७३ ते ख्रिस्तोत्तर २१८) सातवाहनांनी राजधारी ही गोदावरी नदीच्या काठावरील पैठण या शहरी होती. सातवाहनांच्या काळात सांस्कृतिक दृष्टया महाराष्ट्राची फार मोठी भरभराट घडून आली. नाशिक, कणेरी, कार्ले या ठिकाणच्या लेण्यांवरुन आपल्याला सातवाहनांच्या सांस्कृतिक संपन्नतेची कल्पना येऊ शकते. चौथ्या आणि पाचव्या शतकात उत्तर हिंदुस्थानात गुप्त घराण्याचे राज्य स्थापन झाले. परंतु गुप्तांनी महाराष्ट्रावर किंवा दक्षिण हिंदुस्थानातील कोणत्याही प्रदेशावर आपले वर्चस्व स्थापन केल्याचे आढळून येत नाही. सहाव्याशतकाच्या प्रारंभी चालुक्य घराण्याचा उद्य झाला. चालुक्यांनी विजापूर जिल्हयात बदामी या ठिकाणी आपली राजधानी ठेवली आणि तिथूनच त्यांनी राज्य केले. चालुक्यांमध्ये सत्याश्रम पुलकेशी नावाचा कर्तबगार राजा होऊन गेला. त्याने इ.स. ६०८ ते ६४२ या कालखंडात हर्षाचा प्रतिकार करुन

उत्तर महराष्ट्राचा बचाव केला. चालुक्यानंतर महाराष्ट्रात राष्ट्रकुट घराण्याचा उद्य झाला. या घरनाण्याने महाराष्ट्रावर जवळजवळ दोनशे वर्शे राज्य केले .( इ.सन ७५० ते इ.सन ९७५ ) राष्ट्रकूटांच्या कारकीर्दीत समन्वयाचे धोरण अंमलात आणण्यात आले. त्यामुळे जैन, हिंदू आणि बौद्ध धर्म या तिघांनाही अतिशय सन्मानाची वागणूक देण्यात येत होती. चालुक्य घराण्यात कृष्णदेवराय पहिला हा अतिशय कर्तबगार राजा होवून गेला. एलोऱ्याचे कैलास मंदिर यानेच बांधले. चालुक्यांनी नौकायनाकडे मात्र विशेष लख दिले नाही. नंतरच्या चालुक्य शासकांनी राष्ट्रकूटांचा पाडाव घडवून आणला आणि त्यांनी महाराष्ट्रात दोनशे वर्ष राज्य केले . ( इ.सन ९७५ ते इ.सन ११८९ ) त्यांची राजधानी मान्यतेत आणि बिदरजवळील कल्याणी या ठिकाणी होती. चालुक्य घराण्यात एकूण १० कर्तबागार राजे होऊन गेले. या राज्यातील विज्ञानेश्वर नावाच्या एका पंतप्रधानाने मिताक्षरी नावाचा हिंदू कायद्यावरील एक ग्रंथ लिहिला तो आजही प्रसिध्द आहे. नंतरच्या चालुक्यांची सत्ता ही यादवांनी गिळंकृत केली. यादव हे मूळ उत्तर हिंदुस्थानातले. त्यांनी दक्षिण हिंदुस्थानात जवळजवळ १०० वर्षे, राज्ये केले ( इ.सन ११८७ ते इ.सन १२९४) त्यांची राजधानी देवगिरीला होती. त्यांचाच पलीकडे मुसलमानांनी दौलताबाद हे नाव दिले. सिंधन, कृष्णदेव, महादेव आणि रामदेव हे यादवामध्ये होऊन गेलेल्या शतकांमध्ये अत्यंत कर्तबगार शासक समजले जातात. यांनी केलेला व वाङ्मय संवर्धनाला मोठाच हातभार लावला. यादवांमध्ये भास्कराचार्यासारखा गणितज्ञ आणि यहेमाद्रीसारखा एक विद्वान पंडीत होवून गेला. हेमाद्रीच्या कर्तृत्वाचा महाराष्ट्रावर मोठा ठसा उमटला. वैद्यकशास्त्रावर त्याने निरनिराळे ग्रंथ लिहिले.देवनागरी लिपीमध्ये त्याने बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या. बाजरीच्या पिकाला त्यानेच मोठ्या प्रमाणात उत्तेजना दिली. अशा रितीने सातवाहन, वाखाटक, चवालुक्य, राष्ट्रकुट आणि पुन्हा चालुक्य ह्यांच्या राजवटी महाराष्ट्रात होऊन गेल्या. या राजवटींनी महाराष्ट्राला संपन्नता आणि भरभराट मिळवून दिली. परंतु या राजवटी स्वकियांच्या राजवटी होत्या. दक्षिण

हिदुस्थानात अजूनपर्यंत मुसलमानाचा प्रवेश झालेला नव्हता. त्यांची सत्ता उत्तर हिंदुस्थानात स्थापन होवून जवळ जवळ एक शतक होवून गेले होते. तरी त्यांना दक्षिण हिंदुस्थानात आक्रमण करण्याचे धाडस झाले नव्हते. महमंद गझनी आणि महमद घोरी या आक्रमकांनी उत्तर हिंदुस्थानात स्वाऱ्या करुन उत्तर हिदुस्थान खिळखिळा करुन टाकला होता आणि त्यामुळेच पलीकडे उत्तर हिदुस्थानात मुसलमानी सत्तेचा पाया घातला गेला. केवळ दोनशे वर्षात संपूर्ण उत्तर हिदुस्थान मुसलमानांनी गिळंकृगत केला. पुढल्या शंभर वर्षानंतर तर मुसलमानांना आत्मविश्वास आला आणि म्हणून त्यांनी दक्षिण हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्यास प्रारंभ केला. दक्षिण हिंदुस्थानात या वेळी चार ते पाच महत्वांची हिंदू राज्ये होती. या हिंदू राज्यांवर प्रथमतः अल्लाउद्दीन खिलजीने हल्ले चढवून ही सर्व राज्ये खिळखिळी करुन टाकली. अल्लाउद्दीनमुळेच मुसलमानांचा प्रथमत दक्षिण हिंदुस्थानात प्रवेश झाला. इ.सन १२९४ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीने प्रथमत देवगिरीवर हल्ला चढविला आणि देवगिरीचा राजा रामदेवराव यावर याला शरण आणले, यानंतर अल्लाउद्दीनचा एकनिष्ठ अनुयायी आणि पराक्रमी सरदार मलिक कफर यांने एकामागून एक स्वाऱ्या करुन दक्षिणेतील राज्ये खिळखिळी करुन सोडली. इ.सन १३०९ मध्ये वारंगळचे राज्य तर १३१० मध्ये द्वारसमुद्राचे राज्य याने आपल्या वर्चस्वाखाली आणले. या विजयामुळे त्यांला मोठा आत्मविश्वास प्राप्त झाला आणि त्यानंतर चोल आणि पांड्या या राज्यांवर हल्ले चढवून मुसलमानी धर्माचा झेंडा त्याने अगदी दक्षिण टोकापर्यंत नेऊन पोहोचविला. अशारितीने अल्लाउद्दीन खिलजीच्या कारकीर्दीमध्ये जवळजवळ संपूर्ण हिंदुस्थानच मुसलमानी धर्माच्या वर्चस्वाखाली आणला गेला. मुसलमानांची धर्माची ही घोडदौड तशाच वेगाने चालू राहिली. इ.सन १३१७ मध्ये अल्लाउद्दीनचा मुलगा मुबारकशहा याने देवगिरीच्या यादवांचे राज्य नष्ट केले. दक्षिण हिंदुस्थानात एकही हिंदु राज्य उरले नाही. दक्षिण हिंदुस्थानात जिंकलेल्या हिंदू राज्यांवर योग्ये ते नियंत्रण असावे म्हणून १३२५ मध्ये महंमद तघलघाने आपली राजधानी

देवगिरी या ठिकाणी आणली. देवगिरीला दौलताबाद असे नांव ठेवण्यात आले. दक्षिणेतील हिंदूचा विरोध मोठ्या नेटाने मोडून काढण्यात आला. वारंगळच्या हिंदू राज्याचाही याच वेळी पाडाव करण्यात आला. वारंगळ येथील बंडाचा वणवा शेजारच्या तुंगभद्रा नदीच्या काठावरील कपलीच्या प्रदेशात पसरला. कपालीच्या प्रदेशात बंडाळीचे नेतृत्व कामनाथ नावाच्या एका शूर हिंदू पुरुषाकडे होते. देवगिरीहून महमंद तुघलघाने ज्या - ज्या सैन्याच्या तुकड्या पाठविल्या त्या सर्वांचा कानाथाने पराभव केला. म्हणून इ.सन १३२७ मध्ये कपाली जिंकण्याकरिता म्हणून महमंद तघलघाने एक फार मोठी मोहीम हाती घेतली. एवढ्या प्रचंड सैन्यासमोर आपला टिकाव लागणे अशक्य आहे हे कामनाथने ओळखले या मोहिमेत सुलतानाला प्रचंड विजय मिळाला. हजारो स्त्री-पुरुषांना युद्धकैदी म्हणून पकडण्यात आले.

त्यांना गुलाम बनवून सुलतानाने त्यांना उत्तरेकडे नेले. ज्यांनी पुढे विजयनगरच्या साम्राज्यांची स्थापना केली ते हरिहर आणि बुक्क हे दोघे कपालीला मंत्री होते आणि त्यांनी वारंगळच्या प्रतापरुद्र राजाला बहुमोल मदत केलेली होती. महमंद बिन तघलघाला राजकारणातील त्यांचे महत्व माहित होते. सुलतानाने ज्यांना जबरदस्तीने मुसलमान धर्माची दीक्षा दिली आणि दक्षिण हिंदुस्थानात बंड झाल्यास त्यांचा उपयोग करुन घ्यावयाचा असा निश्चय केला. या दोघाही बंधूच्या अंतकरणात हिंदू धर्म आणि हिंदू संस्कृती ह्यांच्याबद्दल प्रखर प्रेम होते आणि जरी त्यांना मुसलमानी धर्माची दीक्षा जबरदस्तीने देण्यात आली तरी त्यांचे हिंदू धर्माविषयीचे प्रेम अजिबात कमी झाले नाही. उलट त्यांच्या अंतकरणात सूडाची भावना निर्माण झाली आणि त्यांनी हिंदूचे महान साम्राज्य स्थापन करण्याची घोर प्रतिज्ञा केली. या वेळी सलतान महमंद तघलघ यांला मोठ्या अडचणीच्या परिस्थितीला तोंड द्यावे लागत होते. दक्षिणेत त्याचप्रमाणे उत्तरेत सार्वत्रिक बंडाळ्या निर्माण झाल्या होत्या. इ.स. १३३० आणि १३३१ मध्ये वारंगळला कापय्या नाईक याने बंडाळी पुकारली तर कंपालीला सोमदेवराज याने उपद्रव

चालविलेला होता. बंडाळीचे गंभीर स्वरुप लक्षात घेऊन तघलघांची सत्ता दक्षिण हिंदुस्थानात टिकते किंवा नाही असा प्रश्न निर्माण झालेला होता. अशा स्थितीत आपल्या सल्लागार मंडळीशी सल्लामसलत करुन महंमद-बिनतघलघाने हरिहर आणि बुक्का यांना कपालीचे बंड मोडण्याकरीता पाठविण्याचे निश्चित केले. मलिक कफूरप्रमाणेच हे दोघेही बंधू आपलयाला एकनिष्ठ राहतील अशी सुलतानाची अपेक्षा होती. हरिहर आणि बुक्क हे सुलतानाचे सैन्य घेऊन कंपालीच्या प्रदेशात आले. यावेळी हिंदूचे मने संतप्त होती. तघलघ घराण्याचे अत्याचार असेच चालू राहिल्यास हिंदु धर्माचे नावानिशानसुध्दा उरणार नाही अशी परिस्थिती होती अशा स्थितीत शुंगेरी मठाचे प्रमुख शंकराचार्य, श्री मध्वाचार्य विद्यारण्य स्वामी यांनी पुढाकार घेवून या उभय बंधूना हिंदू धर्माचे रक्षण करण्यांचे आवाहन केले. मध्वाचार्यांनी आपले दोन बंधू सायन्ना आणि भोजनाथ यांच्यासह हरिहर आणि बुक्का यांच्याशी दीर्घ चर्चा केली. दोन्हीही बंधूना शुद्ध करुन हिंदू धर्मात घेण्यात आले आणि दोघां बंधूनी एका नवीन हिंदू राज्याची स्थापना करावी असे त्यांना आवाहन करण्यात आले. दोघांनीही शंकराचार्यांची ही आज्ञा मान्य केली. राजकारण आणि धर्म यांच्यात अशाप्रकारे परस्पर सहकार्य निर्माण झाल्यामुळे हिंदू जनतेत त्यामुळे मोठे चैतन्य निर्माण झाले आणि महंमद बिन तघलघ यांच्या सर्व योजना कोसळून पडल्या. शंकराचार्यांचा आर्शीर्वाद घेऊन हरिहर आणि बुक्का या दोघा बंधूनी तुंगभद्रा नदीच्या काठी एका नवीन साम्राज्याची स्थापना केली. लवकरच या साम्राज्याचे सामर्थ्य आणि वैभव वाढत जाऊन त्याचे रुपांतर पुढे विजय नगरच्या साम्राज्यात झाले. मुसलमानी आक्रमणाच्या लाटा दक्षिण हिंदुस्थानवर येऊन कोसळल्या तरी त्यांना थोपवून धरण्याचे महत्वाचे कार्य या विजयनगरच्या साम्राज्याने पुरे दोनशे वर्षे पावेतो केले.

विजयनगरची सत्ता आणि वर्चस्व दक्षिण हिंदुस्थानात वाढीला लागले असताना त्याच सुमारास दक्षिण हिंदुस्थानात आणखी एक मुसलमानी सत्ता उद्याला आली ही सत्ता

म्हणजे बहामानी राज्य होय. दिल्लीच्या महमंद बिन तघलघ यांच्या कारकिर्दीत जो गोंधळ निर्माण झाला त्याचा फायदा जसा विजयनगरने घेतला त्याचप्रमाणे दौलताबादेचा सुभेदार हसन उर्फ झाफरखान यानेही घेतला. त्याने इ.सन १३४७ मध्ये स्वतंत्र राज्याची नर्मिती केली. हाच जाफरखान पुढे हसन गंगू बहामनील या नावाने प्रसिद्धीस आला आणि म्हणून यास बहामानी राज्य असे नाव मिळाले. दक्षिणे त बहामानी आणि विजयनगर यांच्यात सतत संघर्ष निर्माण झाला. इ.सन १५२६ मध्ये बहामानी राज्याचा अस्त होऊन त्यातून आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही, ईमादशाही, बरीदशाही अशा पाच शाह्या उद्यास आल्या. त्याचाही विजयनगराशी सतत संघर्ष होत गेला. विजय नगरचा उत्कर्ष यांना पाहवत नव्हता. शेवटी ही पाचही राज्ये एकत्रित आलीत आणि त्यांनी तलिकोटच्या ऐतिहासिक लढाईत विजयनगरचा पूर्ण पराभव केला. विजय मुसलमान फौजांना विजयनगरचे सुंदर शहर पूर्णपणे उध्वस्त करुन टाकले.

ऐतिहासिक दृष्टीने पाहता विजयनगरपासूनच शिवाजी महारांना स्फूर्ती मिळाली असावी. शंकराचार्याचा आर्शीवाद घेऊन हरिहर आणि बुक्का यांना जे नेत्रदीपक कार्य करुन दाखविले त्याचा शिवाजीच्या मनावर मोठा खोल ठसा उमटला. मुसलमानांच्या अत्याचारांचा कळस झाला असतांना शिवाजीने तुकाराम आणि रामदास यांचे आशीर्वाद प्राप्त करुन अत्याचारांना तोंड दिले, आणि स्वतंत्र राज्याची निर्मिती केली. या दृष्टीने विजयनगरचे उदाहरण स्फूर्तीदायक ठरले[१]

अशा रितीने महाराष्ट्राची भौगोलिक स्थिती, मराठे, त्यांचा वंश, स्वभाव आणि भाषा यासंबंधीची माहिती आणि मुसलमानांचा दक्षिणेत प्रवेश कसा झाला यासंबंधीची माहिती पाहिल्यानंतर शिवाजी आणि शहाजी यांच्या उदयापूर्वी एकूण राजकीय, सामाजिक आणि धार्मिक स्थिती काय होती यांचा या ठिकाणी आढावा धेणे आवश्यक ठरते. शिवाजीचे कर्तत्व समजून घेण्याकरीता सोळाव्या शतकातील एकूण पार्श्वभूमी समजावून घेणे आवश्यक ठरते त्यांचा आढावा पुढीलप्रमाणे घेता येईल.

## १.३ सामाजिक आणि धार्मिक स्थिती :-

**१. सर्व समाज जाती- पोटजातीत विभागलेला :** सतराव्या शतकातील समाज हा जाती आणि पोटजाती ह्यांनी विभागला होता. या काळात जाती व्यवस्था कडक होती आणि त्यामुळे विषमताही मोठ्या प्रमाणात होती. अशा विषम समाजात राहूनच शिवाजी महारांजनी राष्ट्रनिर्मितीचे कार्य करावयाचे होते. शिवाजीने या भेदांची आणि विषमतेची पर्वा न करता त्या सर्वांना स्वराज्यकरिता एकत्रित आणण्यात यश मिळविले. जीवनाच्या सर्वच क्षेत्रात सर्वसाधारण माणसांवर इतके अन्याय होत होते की त्या सर्वांना आपसातील मतभेद मिटवून एकत्रित येणे आवश्यक होते. शिवाजीने काळाची गरज ओळखली आणि त्या सर्वांना उत्कृष्ट नेतृत्व दिले. शिवाजीची ही थोरवी लक्षात घेत असतांना शिवाजीला ज्या सामाजिक मर्यादांमध्ये काम करावे लागले. त्या मर्यादाही आपण लक्षात घेतल्या पाहिजेत. म्हणूनच शिवाजीनी रामोशी, मावळे, कोळी, महार इत्यादी समाजाच्या तळातील माणसे आपल्या भोवती एकत्रित केली आणि त्यांच्या मदतीने राष्ट्र उभारण्याचे कार्य आपल्या हाती घेतले.

**२) सामाजिक बंडखोरी** :- समाजातील विषमतेचे निर्मूलन व्हावे आणि सामाजिक समता निर्माण व्हावी असे निकाराचे प्रयत्न या काळातील थोर संतानी केले. १७ व्या शतकातील सामाजिक परिस्थितीचा आढावा घेत असतांना संतानी केलेल्या अभुतपूर्व कार्याची आपण दखल घेतली पाहिजे. या संतांनी आपली शिकवण देतांना पंडिती संस्कृत भाषेचा त्याग केला. भक्तीमार्गाचा त्यांनी पुरस्कार केला आणि साध्यासुध्या लोकभाषेतून त्यांनी आपल्या तत्वज्ञानाचा प्रसार केला या संतांनी उच-नीच या भावनेचा त्याग करुन ईश्वरभक्तीचा मार्ग त्यांनी सर्वाकरिता खुला करुन दिला. थोडक्यात शिवपूर्व काळात संतांनी ही जी बंडखोरी केली तिचा समाजावर

मोठा सखोल परिणाम घडून आला. या विषम समाजात संतांनी समता आणण्याचा केलेला तो प्रयत्न होता हे संत समाजाच्या विविध थरांतून आल्यामुळे त्याचाही जनमानसांवर सखोल परिणाम घडून आला. शिवाजी महाराजांनी जे नवीन राष्ट्र घडविले त्याकरिता संतांनी मोठी अनुकूल मानसिक परिस्थिती ह्या समाजात निर्माण केली हे आपण लक्षात घेतले पाहिजे. समतेची कल्पना प्रत्यक्षात आणण्याचे कार्य त्यामुळे अतिशय सुलभ झाले.

**३. मुसलमानी राजसत्तेचा एकूण समाजावरील परिणाम :** सत्ताधीश आपली संस्कृती पराभूत समाजावर नेहमीच लादत असतो. सत्ताधीशांनी एखादे वेळी आपली संस्कृती लादली नाही तरी अप्रत्यक्षपणे पराभूत समाजावर त्यांचा काहीना काही परिणाम होतच असतो. सोळाव्या शतकातील महाराष्ट्रातील समाजही या नियमाला अपवाद नव्हता.(इस्लाम मुळे महाराष्ट्रातील मराठा समाजाच्या रितिरिवाजांवर, पोषाखावर आणि भाषेवरसुध्दा मोठे दूरगामी परिणाम घडून आले होते. मराठा मंडळी सुरवातीस कुडता हा पोषाख पसंत करु लागले होते. मराठयांनी मुसलमानांकडून पडदा पद्धतीही उचलली होती. पारशी भाषा आता मराठ्यांमध्ये रुढ झाली होती. थोडक्यात सतराव्या शतकातील महाराष्ट्रातील मराठा वर्ग हा आपले स्वत:चे स्वप्न विसरुन इस्लामचे अनुकरण करु लागला होता आणि त्यामुळे मराठी संस्कृती टिकेल किंवा नाही अशी स्थिती निर्माण झाली होती.

**४. खेड्यातील जीवन :** राज्यकर्त्यामध्ये जरी वारंवार बदल झाले तरी त्यांचा धक्का खेड्यातील जीवनाला कधीही बसत नसे. सतरावया शतकातील महाराष्ट्रातील ग्रामीण जीवन हे असेच शांत आणि संथ असे . सर्वसाधारण खेड्यातील लोकांचा सरकारशी क्वचितच संबंध येई. पाटील आणि कुळकर्णी यांच्या मार्फतच ते सरकारी कामे करीत. गावातील भांडणे किंवा विवाद त्यांच्या मार्फत सोडविले जात. अशा सभांमध्ये गावातील निरनिराळ्या व्यवसायांचे लोक

हजर असत. त्यांना बारा बलूते म्हणत. धर्मशास्त्रसंबंधी एखादा विवाद असल्यास त्यांचा निकाल ब्राम्हणाांतर्फे केल्या जाई. थोडक्यात सतराव्या शतकातील ग्रामीण जीवन हे आर्थिक दृष्टया स्वयंपूर्णतेचे होते. शेती हा प्रमुख व्यवसााय होता. शिवपूर्व काळात आणि शिवाजीच्या काळातसुद्धा ग्रामीण जीवनात विशेषत: फरक पडलेला आपल्याला आढळून येत नाही.

**५. समाजावरील जहागिरदारी आणि वतनदारी ह्यांचे प्रभुत्व :-** सतराव्या शतकातील मराठा समाजात वतनदारीला फार महत्व होते. पाटीलकी, देशमुखी आणि कुळकर्णी ही वतने वंशपरंपरागत मिळत असत. वतनदारांना समाजात फार मोठी प्रतिष्ठा होती. वतनासाठी वाटेल अशा लबाड्या करण्यात येत. वतनदारांचा सर्वसाधारण प्रजेला अतिशय उपद्रव होत असे. सरकारच्या मदतीला वतनदारांनी धावून यावे अशा अपेक्षा होती. परंतु पुष्कळसे वतनदार सरकाविरुध्द प्रसंगी बंड करीत त्यामुळे राजांची सत्ता कमकुवत होई. सतराव या शतकातील मराठा समाजात पुष्कळसे वतनदार बलिष्ठ झाल्याची उदाहरणे आपल्याला आढळतात. शिवाजी महाराजाना अशा अनेक उपद्रवकारी वतनदारांचा बंदोबस्त करावा लागला.

**६. शिवपूर्व काळातील समाजात धर्मातरित मुसलमानांचे वर्चस्व :** सोळाव्या आणि सतराव्या शतकात धर्मातरित मुसलमांनांचे महत्व वाढीला लागले होते. तीनशे वर्षापर्यत मुसलमानांनी महाराष्ट्रात राज्य केल्याचाच तो परिणाम होता. राज्यकर्त्या मुसलमान शासकांनी धर्मातरित मुसलमांनाना जास्त सवलती दिल्या. परिणामी हा वर्ग समाजात अधिक शिरजोर बनला. त्यांच्या गुन्ह्यांकडे शासकांनी दुर्लक्ष केले . शिवाजी महाराजांना अशा धर्मातरित मुसलमांनांच्या अत्याचारापासून समाजाची सुटका करावी लागली.

धार्मिक स्थिती -

१. **मुसलमांनाचे अत्याचार :-** अल्लाउद्दिन खिलजीच्या कारकीर्दीपासून म्हणजे इ.सन १२९४ पासून दक्षिणेत मुसलमानांचा प्रवेश झाला. तोपर्यंत हिंदूच्या संस्कृतीला आणि हिंदूंच्या आत्मसन्मानाला कोणताही धक्का बसला नव्हता. परंतु अल्लाउद्दिन खिलजीच्या आक्रमणापासून सर्व परिस्थिती बदलली. अल्लाउद्दिन चा प्रमुख सरदार मलिक कफूर याने ठिकठिकाणी मंदिरे पाडण्याला आणि हिंदूंना जबरदस्तीने वाटविण्याला प्रारंभ केला. दक्षिणेतील हिंदू राज्यांनी या मुसलमानी आक्रमणाचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या प्रयत्नात त्यांना यश लाभले नाही. विजयनगर सारखे महाबलाढ्य साम्राज्यसुध्दा या मुसलमानी आक्रमणासमोर टिकू शकले नाही. मुसलमानी आक्रमक धोरणाचा परिणाम म्हणून दक्षिणेतील भव्य मंदिरे, सुंदर नगरे आणि उत्कृश्ट कलाकृती यांचा पूर्ण विध्वंस झाला. या काळातील वाड्.मयात आपल्याला मुसलमानांनी केलेल्या अत्याचारांचे मोठे हृदयद्रावक वर्णन आढळते. या अत्याचारांपासून आपल्याला कोण सोडविणार अशी सर्वत्र हताश परिस्थिती या समाजात निर्माण झाली. रामदासानी म्हटलयाप्रमाणे,

*म्लेंछ दुर्जन, उदंड ।*

*बहुता दिवसांचे माजले बंड ॥*

अशी दक्षिणेची आणि विशेषत: महाराष्ट्राची अवस्था झाली. हिंदूची देवळे पाडून त्या जागी मशिदी बांधण्याची चुरस निर्माण झाली. देवळे पाडण्याकरिता म्हणून खास मुसलमान अधिकारी नेमले जाऊ लागले. प्रत्येक अधिकाऱ्यांने किती देवळे पाडली याचे उल्लेख आजही आपल्याला जून्या कागदपत्रांतून पहावयास सापडतात. त्यावरुन तत्कालीन मुसलमान शासक किती क्रूर होते याचा साक्षात्कार आपल्याला क्षणोक्षणी होतो. शिवाजी महाराजांचा उदय होण्यापूर्वी धार्मिक अत्याचारांची परिसीमा गाठली होती आणि ईश्वरी प्रेरणेने एखादा अवतारी पुरुष अवतारल्याशिवाय आपली या अन्यायापासून या समाजाची सुटका व्हावी याकरिता प्रयत्न करीत

असलेल्या शिवाजी महाराजांनी या परिस्थितीचा पूर्ण अभ्यास केला व मगच त्यांनी आपले पुढील पाऊल उचलले.

२. **महाराष्ट्रीय संताची बहुमोल कामगिरी :** अत्याचारांनी पीडीत झालेल्या समाजाला जागृत करण्याचे महत्वाचे कार्य महाराष्ट्रातील संतांनी केले. संतांची कामगिरी पाहत असतांना आपल्याला तीन कालखंड दिसून येतात.

१. ज्ञानेश्वर आणि नामदेवाचा कालखंड ( १३ वे आणि १४ वे शतक)

२. एकनाथ आणि तुकाराम यांचा कालखंड .( १५ वे आणि १६ वे शतक )

आणि

३. रामदासाचा कालखंड ( १७ वे शतक )

या तिन्ही कालखंडातील संत हे अंधश्रद्धेविरुध्द लढणारे बंडखोर होते. या संतांनी भक्तिपंथाचा पुरस्कार केला. महाराष्ट्रात त्यांनी सांस्कृतिक जागृती घडवून आणली. या सर्व संतांनी अठराव्या शतकातील राजकीय जागृतीची आणि क्रांतीची जणू पार्श्वभूमी तयार केली. बेंडाचा पहिला बावटा ज्ञानेश्वार उभारला. मोक्षाचा मार्ग त्यांनी सर्वा करिता मोकळा केला. भक्तिची कास धरली तर मोक्षाचा मार्ग सर्वांनाच सापडतो असे त्यांनी आग्रहाने सांगितले. ज्ञानदेवांच्या काळात म्हणजे यादवांच्या काळात समाजामध्ये अनेक दोष शिरलेले होते. चातुर्वण्याला अवाजवी महत्व दिले जात होते. वरिष्ठ वर्ग शुद्र देवदेवतांच्या पूजे अर्चेमध्ये समाधान मानीत होता. समाजामध्ये ही जी अंधश्रध्दा बोगाळली होती त्याविरुध्द ज्ञानदेवांनी बंड पुकारले. ज्ञानदेवांच्या शिकवणूकीचा जनसामान्यांवर मोठा सखोल परिणाम घडून आला. नामदेवांनी सुद्धा ज्ञानेश्वरांना पूरक अशीच शिकवणूक समाजाला दिली. नामदेवाने भक्तिपंथाचा आणि वारकरी पंथाचा पुरस्कार केला. जाति व्यवस्थेचा त्यांनी निषेध केला. ज्ञानदेव आणि नामदेव यांच्या शिकवणूकीमुळे

समाजात मोठी वैचारिक जागृती घडून आली. त्या दोघांच्या शिकवणूकीचा परिणाम म्हणून महाराष्ट्रात मोठमोठे संत निर्माण झाले व त्यांनी ज्ञानदेवांच्याच विचारांचा महाराष्ट्रात सर्वत्र प्रचार केला. या संतांमध्ये आपल्याला सावता माळी, गोरा कुंभार, चोखा मेळा, नरहरी सोनार इत्यादी संतांचा विशेष उल्लेख करावा लागेल. या संतांना महाराष्ट्रात वैचारिक आणि सांस्कृतिक जागृती घडवून आणली. हे सर्व संत समाजाच्या विविध थरांतून वर आले होते. त्यांचा महाराष्ट्रात सर्वत्र संचार होता. त्यामुळे महाराष्ट्रातील परिस्थितीची त्यांना खडानखडा माहिती होती. या संतांनी दोन प्रकारे कार्य करुन दाखविले एकतर आजपर्यंत जे ज्ञान संस्कृतमध्ये बंदिस्त झाले होते ते त्यांनी लोकभाषेचा आश्रय घेऊन सर्वसामान्य लोकांपर्यंत आणून पोहोचविले. त्यांची दुसरी कामगिरी म्हणजे त्यांनी भक्तिमार्गाचा अत्यंत तळमळीने पुरस्कार केला. मुसलमानांच्या अत्याचारांपासून देवाने आपल्याला सोडवावे अशी त्यांनी देवालाच आळवणी केली. हिंदू धर्मात त्यांनी समन्वयाची भूमिका आणली. या सगळ्या भक्ति संप्रदायाच्या चळवळीचे आणि महाराष्ट्रातील सुधारणावादी चळवळीचे नेतृत्व वारकरी पंथाने केले.

वारकरी संप्रदयाला उर्जितावस्था जरी तुकारामाच्या काळी प्राप्त झाली तरी या संप्रदायाचा प्रारंभ ज्ञानेश्वराच्या काळातच झाला होता असे दिसून येते. ज्ञानेश्वरांच्या काळात या संप्रदायाला भागवत धर्म असे नाव मिळाले होते. ज्ञानेश्वराच्या काळात अंधश्धदा आणि बाह्य अवडंबर यांना अतिशयच महत्व आले होते. धर्माचा ख़रा परमात्मा लोक विसरलेले होते. चातुर्वण्य आणि जातिव्यवस्था अत्यंत कडक बनलेली होती. मोक्षाचे दरवाजे या सर्व अन्यायाविरुध्द ज्ञानेश्वरांनी प्रथम बंड पुकारले. हे वरिष्ठ वर्गापुरतेच मोकळे होते. स्त्रिया आणि शुद्र यांना मोक्षाचा अधिकार नव्हता. भक्तिमार्गांचा अवलंब केल्यास सर्वांनाच परमेन्वराची प्राप्ती होवू शकते अशी त्यांनी समाजाला शिकवण दिली.

ज्ञानेश्वरांच्याच काळात नामदेव हा दुसरा श्रेष्ठ संत होऊन गेला. नामदेवानीही भक्तिमार्गाचा पुरस्कार करुन जातिव्यवस्थेचा निषेध केला. ज्ञानेश्वर आणि नामदेव ह्यांच्या या भक्तिमार्गाच्या शिकवणुकीमूळे महाराष्ट्रात मोठाच आत्मविश्वास निर्माण झाला. मुसलमानी अत्याचारांना तोंड देण्याकरिता या पिडित समाजाला मोठे सामर्थ्य प्राप्त झाले. सामाजिक समतेची एक मोठी लाट महाराष्ट्रात निर्माण झाली.

बहामनी राजांनी बहुसंख्य हिंदू प्रजेवर ज्यावेळी मोठ्या प्रमाणात धार्मिक अत्याचार चालविलेले होते त्यावेळी संत एकनाथांचा उदय झाला. एकनाथांनी भागवत धर्माच्या पुनरुज्जीवनाचे कार्य करुन दाखविले. समाजिक समतेचा त्यांनी पुरस्कार केला. मराठी भाषेचा त्यांनी अभिमान धरला, त्यामुळे सर्वसाधारण लोकांपर्यत खरे ज्ञान पोहोचू शकले. एकनाथी भागवत आणि भारुडे यातून सर्वसामान्यांमध्ये जागृती घडून आली.

परंतु या सर्व संतामध्ये संतश्रेष्ठ म्हणून आपल्याला तुकारामाचाच उल्लेख करावा लागेल. तुकारामाने आपल्या भक्तीचा माल महाराष्ट्रातील खेड्यापाड्यात पोहोचविला. तुकारामाने पंढरपुरच्या विठोबावर प्रेम करण्यास शिकविले. सर्व महाराष्ट्र न्हाऊन निघाला. तुकारामाच्या अभंगामुळे महाराष्ट्रातील साध्यासुध्या शेतकऱ्यांची मने जिंकल्या गेली. तुकारामाने आणलेल्या विठ्ठल भक्तितून महाराष्ट्राचा पुर्नजन्म घडून आला.

तुकारामाच्या समकालीन असणारा दुसरा संत म्हणजे रामदास. भक्तिमार्गाचा पुरस्कार करणाऱ्या सर्व संतापेक्षा रामदास हा अगदी वेगळ्या व्यक्तिमत्वाचा संत होता. अद्यात्मापेक्षा त्याने सामाजिक आणि राजकीय अन्यायांकडे विशेष लक्ष पुरविले. मुसलमानांचे अत्याचार पाहून त्याला तीव्र चीड वाटत असे. या अन्यायाविरुद्ध बहुसंख्य हिंदू समाजाने ठामपणे उभे राहिले पाहिजे आणि अन्यायाचा प्रतिकार केला पाहिजे अशी शिकवण त्याने आपल्या वाङ्मयातून

दिली. शिवाजीने आपल्या कार्याची स्फूर्ती रामदासापासूनच घेतली आणि स्वराज्य स्थापन केले ही गोष्ट आपल्याला विसरता येत नाही. रामदासाचे कार्य असामान्य महत्वाचे मानले जाते. कारण गलितगात्र समाजात त्यांनी मोठा आत्मविश्वास निर्माण केला. [२]

## १.४ मराठयांच्या इतिहासाची साधने :-

इतिहास लेखन हा साहित्य प्रकार मराठेशाहीतही अस्तित्वात होता. मराठयांच्या इतिहासावर प्रखर रुपाने अनेक ग्रंथ मराठेशाहीच्या कालखंडात निर्माण झाले तथापि इतिहासाकडे व ऐतिहासिक व्यक्तीकउे बघण्याची आमची दृष्टी शास्त्रीय नव्हती. आमच्या बखरकांरावर पुराणांची फार मोठी छाप पडलेली दिसते. पुरावे गोळा करावेत त्यांची छाननी करावी, त्यांचे मूल्यमापन करावे व त्यातून निष्कर्ष काढून इतिहास लिहावा, हा शास्त्रीय दृष्टिकोण बखरकांत दिसत नाही.

मराठेशाहीचा शास्त्रीय दृष्टीने इतिहास लिहिला तो युरोपियनांनी. मराठेशाहीचा अद्यापि अस्तही झालेला नव्हता त्या वेळी स १८१० साली स्कॅाट वेअरिंग या इंग्रज इतिहासकाराने आपला मराठ्यांचा इतिहास प्रसिद्ध केला. त्यांसाठी त्यांने इंग्रज प्रवाश्यांचे वृत्तांत व इतर ग्रंथ वापरले होते. पुढे मराठ्यांची सत्ता स. १८१८ साली नष्ट झाली. सातऱ्यांच्या गादीचे इंग्रजांनी पुनरुज्जीवन केले व सातऱ्यास ग्रँट डफ हा रेसिडेंट त्यांनी पाठवला. हा ग्रँट डफ मोठा चौकस, जिज्ञासू व इतिहासाचा अभ्यासू होता. ज्याचे राज्य नष्ट करुन आपण हिंदुस्थानातील सत्ता आपल्या हाती घेतली, त्या मराठ्यांच्या सत्तेच्या इतिहासाचे आपण आकलन करुन घेतले पाहिजे असे त्यास वाटून त्यांने मराठी कागदपत्रे जमविण्यास व त्यांचा अभ्यास करण्यास सुरुवात केली. त्यांच्या अविश्रांत परिश्रमातून व चिकाटीतून मराठ्यांचा इतिहास हा ग्रंथ तीन खंडात

ाशित झाला. ( स १८२६ ) मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनसारख्या मुत्सद्दयाचे प्रोत्साहन ळाल्यामुळे ग्रँटला महाराष्ट्रातील अनेक घराण्यांतून महत्वाची कागदपत्रे सुलभपणे प्राप्त करता ली.

पुढे बरीच वर्षे ग्रँट डफचा इतिहास प्रमाण मानला जात होता. महाराष्ट्रीय समाजात ग्रापि जागृती न झाल्याने त्यांना आपल्या इतिहासाचे महत्वही कळत नव्हते. पण इंग्रजी क्षणाच्या प्रसाराबरोबर महाराष्टत्रीय मंडळीत इतिहासाबद्दलची आस्था जागृत होऊ लागली. ोपियन इतिहासकारांनी आपल्या मराठ्यांच्या इतिहासात केलेल्या चुका त्यांच्या लक्षात ऊ लागल्या. या चुका युरोपियनांच्या एतद्देशीय संस्कृतीच्या अज्ञानामुळे तर अनेक वेळा ग्रहदूषित दृष्टीमुळे घडल्या होत्या. तेव्हां आपल्या पूर्वजांचा खरा इतिहास समाजापुढे ठेवला हिजे, ही जाणीव मराठी सुशिक्षित विचारवंतांत निर्माण झाली. अशा विचारवंतांत रावबहादूर ळकंठ जर्नादन कीर्तने हे आद्य होत. त्यांनी सन १८६७ साली एक लेख लिहून ग्रँट डफच्या तिहासातील चुका प्रथम दाखवून दिल्या. या लेखामुळे तर अनेक विचारवंताच्या नजरा ाठ्यांच्या इतिहासाकडे वळल्या. डफच्या चुका दुरुस्त करावयाच्या व स्वदेशाचा खरा इतिहास हावयाचा तर मुख्य अडचण साधनांची होती. महाराष्ट्रात शेकडो ऐतिहासिक घराणी होती व ांच्या जवळ असणाऱ्या दप्तरखान्यात लक्षावधी कागदपपत्रे वाळवी लागून नष्ट होत होती. कागदपत्रे शोधून त्यातील मराठ्यांच्या इतिहासाला उपयुक्त असणारी कागदपपत्रे छापण्याच्या मास आता अनेकांनी प्रारंभ केला. त्यात जिनसीवाले, कीर्तने, चिपळूणकर, साने, मोडक हे ुख होत. विविधज्ञानविस्तार यासारख्या मासिकातून कागदपत्रे व बखरी आता प्रकाशात ऊ लागल्या. पुढे खास ऐतिहासिक कागदपत्रे व बखरी छापणारी काव्येतिहासंग्रह भारतवर्ष, ी मासिके सुरु झाली. त्यांच्यामधून शेकडो कागदपत्रे प्रसिध्द झाली.

परंतू कागदपत्रे शोधून, ती संकलित करुन ती आपल्या भाष्यासह प्रसिद्ध करण्याचे महान कार्य जर कोणी केले असेल तर ते इतिहासाचार्य राजवाडे यांनी, राजवाड्यांजवळ प्रगाढ बुध्दिमत्ता, इतिहासाचे मार्मिक विवेचन करु शकणारी दृष्टी, विविध भाषांवरील प्रभुत्व व सर्वांत महत्वाचे म्हणजे इतिहासाबद्दलची तळमळ हे गुण असल्यामुळे त्यांच्या हातून इतिहास संशोधनाच्या क्षेत्रात महनीय कार्य झाले. राजवाड्यांनी अनंत संकटे सोसून, प्रसंगी पायी प्रवास करुन व डोईवर कागदपत्रांची ओझी वाहून, आपल्या मराठ्यांच्या इतिहासाची साधने या मालेचे २२ खंड प्रकाशित केले व हजारो कागदपत्रे प्रकाशात आणली. पुण्याच्या भारत इतिहास संशोधन मंडळा ची स्थापना त्यांनी केली ( सन १९१०) तेव्हापासून हे मंडळ मराठ्यांच्या इतिहासाला उपयुक्त असणारी साधने सातत्याने प्रकाशित करत आहे. धुळे येथील राजवाडे संशोधन मंडळ व सत्कार्योत्तेजक सभा या संस्थानीही अशाच स्वरुपाची कामगिरी केली आहे.

इतिहासाचार्य राजवाड्यांशिवाय महाराष्ट्रात रावबहादूर द.ब. पारसनीस, रावबहादूर गणेश चिमणाजी वाड, पुरुषोत्तम विश्राम मावजी, वासुदेवशास्त्री खरे इत्यादी पंडितांनी मराठ्यांच्या इतिहासाची बहुमोल साधने स्वदेशप्रेमापोटी प्रसिद्ध केली. यानंतरच्या पिढीत रियासतकार सरदेसाई, वा.सी. बेंद्रे मा.वि. गुजर, ग.ह. खरे, न.र. फाटक, आप्पासाहेब पवार, सेतुमाधवराव पगडी, स.मा. गर्गे , स.शं. देसाई इत्यांदी संशोधकांनी मागील पिढीचे कार्य पुढे चालूवन अनेक प्रकारची ऐतिहासिक साधने प्रसिद्ध केली आहेत.

मराठ्यांच्या इतिहासाची साधने ही फक्त मराठीमध्येच नाहीत. इंग्रजी, फ्रेंच, डच, पोर्तुगीज, फारसी हिंदी, कानडी, संस्कृत अशा अनेक भाषांमध्ये आहेत. येथे एक मुद्दा लक्षात ठेवला पाहिजे तो असा की, शिवशाहीतील हजारो अस्सल कागदपत्रे काळाच्या ओघात नष्ट झालेली आहेत. छत्रपती शिवाजी महाराजांच्या कार्याचा व्याप किती मोठा होता, तरीही त्यांची आतापर्यंत उपलब्ध असणारी पत्रे फार तर शे-दीडशेच्या घरात जातील. शिवाजी

महाराजानंतरच्या संभाजी, राजाराम व ताराबाई या राज्यकर्त्यांच्या बाबतीतही त्यांची कर्तबगारी समजून घेण्याच्या दृष्टीने हवी तेवढी साधने मिळत नाहीत. त्यांची दोन कारणे आहेत. पहिले म्हणजे शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रमध्ये २६-२७ वर्षे मोगलांशी जो संघर्ष झाला, त्या संघर्षात महाराष्ट्रातील प्रत्येक गाव केव्हा ना केव्हा तरी शत्रूचा जीव वाचवणे महत्वाचे असते. अशा वेळी कागदपत्रांचा कोण विचार करणार ? तेव्हा शिवशाहीतील लक्षावधी कागदपत्रे अशा जाळपोळीत नष्ट झाली. स १६८९ साली जुल्फिकारखानने रायगड घेतला, त्यावेळी त्यांने शिवाजी महाराजांचा प्रचंड दप्तरखाना जाळून टाकला. त्यामुळे आपण मराठयांच्या इतिहासाची केवढी हानी करत आहोत, हे त्या यवनी सेनापतीस काय समजणार ? त्यांच्या दृष्टीतून रायगडावरील दप्तरखाना म्हणून शत्रूच्या राज्यकारभाराची त्यास निरुपयोगी असणारी कागदपत्रे होती. दुसरे शिवशाहीच्या ऐतिहासिक कागदपत्रांच्या दुष्काळास खुद्द मराठा घराणी कारणीभूत आहेत. मराठ्यांनी इतिहास घडविला, पण त्यांना इतिहासाचे महत्व कधीच वाटले नाही. पूर्वजांच्या पराक्रमाचा मराठ्यांनी अभिमान धरला, पण हे पराक्रम ज्यांच्या आधारे भावी पिढ्या खरे मानणार आहेत, त्या साधनांकडे दुर्लक्ष केले, परिणामी महाराष्ट्रातील अनेक घराण्यांतील कागदपत्रे वाळवीचे भक्ष्य बनून नष्ट झाली. अशी ही शिवशाहीच्या साधनांची शोकांतिका आहे. जी काही साधने आजपर्यंत उपलब्ध झालेली आहेत, त्यातून निर्माण होणारा शिवशाहीचा इतिहास तेजस्वी भासतो. जर सर्वच साधने जतन करुन ठेवली असती, तर आमचा इतिहास आजच्याहून कितीतरी तेजस्वी व उदात्त वाटला असता, यात शंका नाही.

ज्यांच्या आधारे इतिहास लिहिला जातो, त्यांना इतिहासाची साधने असे म्हणतात, शिवशाहीची साधने म्हणजे शिवशाहीचा इतिहास ज्यांच्या आधारे लिहिला जातो, ती साधने. शिवाजी महाराजांची कारकीर्द स १६३० ते स १६८० अशी जरी धरली जात असली, तरी

शिवशाहीचा काल शिवजन्मापूर्वी २५ वर्षे व शिवमृत्यूनंतर २५ वर्षे असा धरला जातो. त्या अर्थाने शहाजी राजे, शिवाजी महाराज, संभाजी महाराज, राजाराम महाराज व ताराबाई या सर्वांच्या कारकीर्दी शिवशाहीतच मोडतात, या शिवशाहीचा इतिहास उभा करण्यासाठी कागदपत्रे, बखरी, प्रवासवर्णने, आत्मचरित्रे, तवारिखा इत्यादी साधनांचा उपयोग होतो. शिवशाहीतील साधनांचे दोन प्रमुख प्रकार पाडता येतील ते असे:

१) भारतीय भांषातील साधने व (२) परकीय भाषांतील साधने.

भारतीय भाषांतील साधनांमध्ये संस्कृत, मराठी, हिंदी, कानडी इत्यादी भाषांतील साधने मोडतात, तर परकीय भाषांतील साधनांमध्ये फारसी, इंग्लिश, डच, पोर्तुगीज व फ्रेंच या भांषातील साधने मोडतात[३] प्रस्तूत संशोधनाच्या अनूषंगाने मराठी साधना विषयी माहिती पुढील प्रमाणे.

मराठी साधनांमध्ये प्रामुख्याने मराठी कागदपत्रे, बखरी, शकावल्या, आज्ञापत्रासारखे ग्रंथ, पोवाडे इत्यादी साधनांचा समावेश होतो. प्रथम मराठी कागदपत्राविषयी माहिती पाहू.[४]

**मराठी कागदपत्रे :**मराठ्यांच्या इतिहासासाठी जी साधने आहेत, त्यामध्ये पहिला दर्जा मराठी कागदपत्रांना दिला जातो. या कागदपत्रांत शिवाजी महाराज, संभाजी महाराज, राजाराम महाराज व महाराणी ताराबाई या राजकर्त्यांची आज्ञापत्रे वतनपत्रे , इनामपत्रे, निवाडे इत्यादी कागदपत्रांचा समावेश होतो. तसेच ठाणेदारांनी, किल्लेदारांनी, सुभेदारांनी व प्रधानांनी लिहिलेल्या पत्रांचाही समावेश होतो. गोतसभा, देशकसी, ब्रह्मसभा, यांनी दिलेली निवाडापत्रेही त्यात मोडतात. वतनासंबंधी व इतर खटल्यासंबंधी लिहिलया गेलेल्या पत्रांची संख्या बरीच मोठी आहे. ही कागदपत्रे प्रकाशात आणण्याचे प्रारंभीचे काम जिनसीवाले, चिपळूणकर, कीर्तने, साने, मोडक इत्यादी महाराष्ट्रीय संशोधकांनी सुरु केले. त्यासाठी त्यांनी स. १८७८ साली. काव्येतिहास संग्रह नावाचे एक मासिक काढण्यास सुरुवात केली. पुढे स १८९६ साली रावब पारसनीस यांनी भारतवर्ष मासिक काढून अनेक बखरी व कागदपत्रे त्यामध्ये प्रसिद्ध केली. याच

सुमारास कोल्हापुरात प्रो. विजापूरकर यांनी ग्रंथमाला नावाचे मासिक चालविले होते. या मासिकातून मराठ्यांच्या इतिहासाची अनेक कागदपत्रे प्रकाशात आणण्यात आली. या सर्वामध्ये इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांची कामगिरी अत्यंत मोलाची आहे. महाराष्ट्रातील शेकडो गावी पायपीट करुन त्यांनी लाखो कागद जमविले आणि त्यातून निवडून हजारो कागद मराठ्यांच्या इतिहासाची साधने या मालेतून प्रसिद्ध केले. या ग्रंथमालेचे २२ खंड प्रसिद्ध झाले आहेत. राजवाड्याशिवाय वा.वा. खरे , भावे, वाड, मावजी, सरदेसाई, बेद्रे, ग.ह. खरे, आप्पासाहेब पवार, मा.वि. गुजर, स.मा. गें इत्यादी संशोधकांनी मराठ्यांच्या इतिहासाची हजारो कागदपत्रे प्रसिद्ध केली आहेत. स. १९१० साली पुण्यास स्थापन झालेल्या भारत इतिहास संशोधक मंडळाने व धुळ्यातील राजवाडे संशोधक मंडळाने आपल्या अनुक्रमे त्रैमासिक व संशोधक या मासिकांतून हे कार्य चालू ठेवले.

शिवाजी विद्यापीठाने डॉ. अप्पासाहेब पवार यांच्या मार्गदर्शनाखाली स १६८० -१७२० या शिवशाहीच्या शेवटच्या कालखंडावर प्रकाश टाकणारी अनेक कागदपत्रे ताराबाईकालीन कागदपत्रे या ऐतिहासिक ग्रंथमालेत प्रकाशित केलेली आहेत. ही कागदपत्रे संभाजी महाराज, राजाराम महाराज व ताराबाई साहेबांच्या हालचालींवर व कामगिरीवर महत्वांचा प्रकाश टाकतात.

कागदपत्रे प्रकाशात आणण्याचे सर्वात मोठे काम पुण्याच्या भारत इतिहास संशोधन मंडळाने केले आहे. आपल्या त्रैमासिकातून आतापर्यत शेकडो कागदपत्रे व निबंध या संस्थेने प्रकाशित आणण्याचे सर्वात मोठे काम पुण्याच्या भारत इतिहास संशोधन मंडळाने केले आहे आपलया त्रैमासिकातून आतापर्यत शेकडो कागदपत्रे व निबंध या संस्थेने प्रकाशित केले आहेत. आजपर्यंत या संस्थेने शिवचरित्र साहित्य या मालेत १३ खंडाच्यावर खंड प्रकाशित केले आहेत. याशिवाय तिने प्रकाशित केलेल्या शिवचरित्रप्रदीप या ग्रंथात अनेक शिवकालीन शकावल्या प्रसिद्ध झाल्या आहे. सुप्रसिद्ध जेधे शकावली याच ग्रंथात आहे. याशिवाय या संस्थेने

शिवशाहीतील कागदपत्रांचे एकत्रित असे शिवकालीन पत्रसारसंग्रह या मालेचे तीन खंड प्रसिद्ध केले आहेत.

**जेधे शकावली** : शिवकालात काही प्रसिद्ध घराण्यांत ऐतिहासिक घटना स्मरणाने लिहून ठेवण्याची पद्धती होती. त्युनसार काही घराण्यांनी लिहून ठेवलेल्या नोंदी इतिहास संशोधकांना सापडल्या आहेत. अशा एकत्रित नोंदी असणाऱ्या कागदास शकावली असे म्हणतात. कारीचे जेधे - देशमुख यांच्या घराण्याच्या दप्तरात अशीच एक शकावली लोकमान्य टिळकांना मिळाली व ती त्यांनी शिवचरित्र प्रदिप या भारत इतिहास संशोधक मंडळाने प्रसिद्ध केलेल्या ग्रंथात छापली.

**कान्होजी नाईक**-जेधे, बाजी सर्जेराव जेधे मंडळीनी शिवाजी महाराज, संभाजी महाराज इत्यादीची सेवा केली होती. अशा प्रकारे छत्रपती घराण्याशी निगडित असणाऱ्या घराण्यांत ही शकावली त्या काळात लिहिली गेली. तिच्यातील नोंदी व तारखा अचूक आहेत अशा प्रकारच्या आणखी १०-२०शकावल्या सापडल्या तर मराठ्यांच्या इतिहासात मोलाची भर पडली असती. ऐतिहासिकदृष्ट या या शकावलीचे अपूर्व असे मोल आहे . ही शकावली शक १५४० पासूनच्या ( इ.सन १६१८ ) नोंदी देते व ती शके १६१९ ला ( इ.सन १६९७ ) संपते. शिवाजी महाराज, संभाजी महाराज व राजाराम महाराज यांच्या चरित्र्यातील अनेक घटना कालक्रमाने तिच्यामध्ये दिल्या आहेत. मराठ्यांच्या बाजूने त्यांचा इतिहास समजून घेण्याचे हे उत्कृष्ट साधन आहे. पण इतिहासाभ्यासूंच्या दुदैवाने या नोंदी अतिशय त्रोटक आहेत. उदा. स. १६८९ साली स्वराज्यावर मोगलांचे मोठे आक्रमण झाले व त्यांनी मराठ्यांचे सर्व स्वराज्य घशाखाली घातले, या घटनेविषयशी माहिती देतांना जेधे शकावली म्हणते, ते वर्षी ( स १६८९) कुल ( सर्व ) गड मोगले घेतले असे असले तरी ही शकावली आपणास प्रथम दर्जाची माहिती

देते. शिवाजी महारांच्या जन्म कालाची शके १५५१ फाल्गुन वद्य ३ शुक्रवार ही तारीख ( ता. १९ फेब्रु. १६३० ) याच शकावलीने महाराष्ट्रास दिली आहे आणि या शकावलीच्या इतर नोंदी इतक्या अचूक आहेत कीख, त्यामुळे ही नोंद अनेक इतिहासकारांनी ग्राह्य धरली आहे.

**आज्ञापत्र :**

आज्ञापत्र हा ग्रंथ शिवशाहीमधील प्रधान रामचंद्रपंडित अमात्य याने सन १७१५ च्या सुमारास लिहिला. शिवाजी महाराजांच्या तालमीत रामचंद्रपंत वाढल्यामुळे त्यांची राजनीती त्यास पूर्ण समजली होती. महाराजोंची ही राजनीती त्यांच्या वारसांना मार्गदर्शक ठरावी, म्हणून रामचंद्रपंताने हा ग्रंथ लिहिला या ग्रंथात एकूण ९ प्रकरणे आहेत. या प्रकरणामध्ये राजा, त्यांचे प्रधानमंडळ, व्यापार, सावकार, वतने व वतनदार, वृत्ती, किल्ले, जंजिरे, आरमार इत्यादी विषयांवर आमात्याने आपले विचार मांडले आहेत हे विचार म्हणजे शिवाजी महाराजांची राजनीतच आहे. खजना म्हणजे राज्याचे जीवन, राजे लोकी परिमित बोलत जावे, प्रधान म्हणजे नृपसत्ता प्रसारक, साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा नूतन वृत्ती करुन देऊ नये, गडकोट हेच राज्य, आरमार म्हणजे एक स्वतंत्र राज्यांगच आहे. अशी राजनैतिक तत्वे या ग्रंथात आढळतात. या ग्रंथाचे एक संपादक डॉ. व दी. राव हे आपल्या प्रस्तावनेत म्हणतात, ,आज्ञापत्रात शिवकालीन राजनीतचे उत्कृष्ट प्रतिबिंब दृष्टीस पडते. राज्यकारभाराच्या अनेक बारीकसारीक बाबीबद्दल यात विवेचन केलेले आहे. राज्यकारभाराविषयी नुसती तात्विक चर्चा किंवा राज्यकारभाराची मूलभूत तत्वे यांचे विवेचन न करता मराठी राज्यांची उभारणी ज्या काही विशिष्ट पद्धतीवर आधारलेली होती त्या पद्धतीचे सांगोपांग दर्शन या ग्रंथात घडते... थोडक्यात सांगावयाचे म्हणजे प्रत्यक्ष शककर्त्या युगपुरुषाच्या राजकीय तत्वांचे आणि अनुभवांचे बोल ह्या ग्रंथात प्रतिबिंबित झालेले आहेत. हा ग्रंथ सुप्रसिद्ध विविध ज्ञान विस्तार या मासिकात पहिल्यांदा प्रसिद्ध झाला.

**बखरी :-** विविध बखरी बाबत माहिती पुढील प्रमाणे आढळून येते.

१. **छत्रपती श्री शिवाजी राजे यांची बखर ( सभासद बखर )**

शिवाजी महाराजांवरील बखरी ही सर्वात जुनी व शिवकालात लिहिली गेलेली बखर आहे. हिचा कर्ता कृष्णाजी अनंत सभासद हा असून त्याने शिवाजी महाराजांचा पराक्रम स्वत: पाहिलेला व ऐकिलेला आहे. राजाराम महाराजांच्या पदरी हा जिंजी येथे असतांना त्यांच्या आज्ञेने आपण ही बखर लिहिली, असे तो प्रारंभीच सांगतो. ही बखर सन १६९७ च्या सुमारास जिंजीच्या किल्ल्यात लिहिली गेली. या बखरीत शिवाजी महाराजांचे प्रथमपासून मृत्यूपर्यतचे सर्व पराक्रम वर्णिलेले आहेत. मराठी इतिहासाच्या अभ्यासूंच्या दुर्दैवाने सभासदाने ही बखर फार संक्षिप्त अशी लिहिली आहे. तरीही महाराजांच्या काळातील ही बखर असल्याने तिला अनन्यसाधारण महत्व प्राप्त झाले आहे. या बखरीत महाराजांची राज्यकारभार व्यवस्था, लष्कर व्यवस्था, प्रदेश किल्ले, खजिना, सरदार इत्यादी अनेक बाबीवर प्रकाश टाकलेला आहे ही माहिती बहुमोल आहे.

२. **श्री शिवछत्रपती ९१ कलम बखर** :

ही बखर ९१ कलमी बखर या नावाने प्रसिद्ध आहे. म्हणजे या बखरीत ९१ कलमे असून या कलमांतून मालोजी राजे भोसले यांच्यापासून यशिवाजी महाराजांच्या मृत्यूपर्यतचा इतिहास कथन केला आहे. या बखरीची काही कलमे प्रथम भारतवर्ष, प्रभात या मासिकां तछापली गेली, तथापि सर्वच्या सर्व म्हणजे ९१ कलमे छापून प्रसिद्ध करण्याचे श्रेय संशोधक वि.स. वाकसकर यांच्याकडे जाते (स.१०३० ) वाकसकरांच्या मते ही बखर मंत्री दत्ताजी त्रिमळ वाकेनिविस याने तयार केली . तिचा लेखनकाल स. १६८६ ते १७०७) या दरम्यानचा असावा असे ते म्हणतात.

३. **श्री शिवछत्रपती महाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र ( चिटणीस बखर ):**

सातार्‍याचे छत्रपती साहू महाराज ( दुसरे ) यांच्या पदरी असलेल्या मल्हार रामराव चिटणीस याने ही सात प्रकरणांची बखर स. १८११ मध्ये लिहली मल्हार रामराव हा बाळाजी आवाजी, खंडो बल्लाळ यांच्या घराण्यातील होय, खंडो बल्लाळ हा मल्हार रामरावाचा पणजा होय, ही बखर प्रथम विविध ज्ञान विस्तार या मासिकात भागश: प्रसिद्ध झाली ( सन १८७७ साली) सातार्‍याच्या दप्तरखान्यातील कागदपत्रे ऐकीव माहिती, परंपरने चालत आलेल्या आख्यायिका यांच्या आधारावर मल्हार रामराव याने ही बखर समजवली आहे. या बखरीवरील भाष्य करतांना इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात, वडिलर्जित कारकीर्दी, दिनचर्या, शिवाजीने पाठविलेली व शिवाजीला आलेली अस्सल पत्रे व नकला यांचा उपयोग मल्हार रामरावाने केला होता. तरी ग्रँट डफच्या ग्रंथातही न सापडणार्‍या अशा काही गोष्टी मल्हार रामरावाच्या चरित्रात सापडतात . मल्हार रामराव चिटणीसकृत चरित्राचा इतिहासकाराला बराच उपयोग होईल यात संशय नाही. निदान या चरित्रापासून नाना प्रकारच्या शंका घेण्यास अवकाश होईल हे खास आहे.

४. **चित्रगुप्ताची बखर** :

ही बखर सभासद बखरीवर आधारित आहे. हिचा कर्ता रघुनाथ यादव चित्रगुप्त ( चित्रे ) हा असून बखरीच्या मयजकुरात अधून मधून त्याने आपल्या कविता घुसडल्या आहेत. हा बखरकारही बाळाजी आवजी चिटणीस यांच्याच घराण्यातील होता. या बखरीचे मूल्यमापन करतांना इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात, रधुनाथ यादवला परंपरेने ऐकिलेली शिवाजी महाराजांची व त्यांच्या वेळच्या कर्त्या पुरुषांची माहिती सडकून होती. सभासदी बखरीत ज्या पुरुषांची आडनावे दिली नाहीत, त्यांची आडनावे चित्रगुप्त लिहिण्याच्या झोकात सहजासहजी

देऊन जातो व कधी कधी वर्णनात सभासदी बखरीत जी नावे मुळीच नाहीत, ती हा नव्या देतो, सारांश रघुनाथ यादव हा महितगार मनुष्य असल्यामुळे शिवाजीचा इतिहास लिहिणाऱ्य त्याचे मत वेळोवेळी घेणे जरुर पडेल ही बखर स १७६५ च्या सुमारास लिहिली गेली असावी.

**५. दलपतरायांची बखर :**

शिवाजी महाराजांच्या विरोधी पक्षात असणाऱ्या तत्कालीन मंडळीचे त्यांच्या कार्याविषयी काय मत होते, हे अजमाविण्यासाठी या बखरीचा उपयोग होतो. या बखरीतील तारखाही शिवचरित्राच्या दृष्टीने महत्वाच्या आहेत.

**६. शिवदिग्विजय बखर :**

ही बखर स १८१८ साली लिहिली गेली आहे. तिचा कर्ता अज्ञात आहे. इतिहास संशोधक नंदुरबारकर व दांडेकर यांनी तिचे संपादन केले व ती स १८९५ साली प्रसिद्ध केली शिवाजी महाराजांच्या चरित्रामधील अनेक घटना व पराक्रम यांचे वर्णन या बखरीत आहे. हे वर्णन करण्यासाठी आपण बारनिशी , दाखले, पत्रे व जुने ग्रंथ यांचा आधार घेतल्याचे बखरकार नमूद करतो, इतिहासचार्य राजवाड्यांच्या मते या बखरीचा मजकूर एखाद्या जुन्या बखरीवरुन घेतला असावा, राजाराम महाराजांना राजपद मिळावे म्हणून राणी सोयराबाईने केलेल्या कृत्यांचे सविस्तर वर्णन या बखरकाराने केले आहे.

**७. मराठी साम्राज्याची छोटी बखर** :

या बखरीची रचना स. १८१७ साली झाली असावी, इतिहासकार बाळाजी जनार्दन मोडक यांनी ती काव्येतिहाससंग्रह या मासिकात छापून काढली, स्थल, काल व व्यक्ती यांचा बराच विपर्यास या बखरीत आहे. तरीही शिवचरित्रामधील काही नव्या बाबी या बखरीतून पुढे येतात. त्या दृष्टीने ही बखर महत्वाची वाटते.

## ८. चिटणीसकृत संभाजी महाराजांची बखर व राजाराम महाराजांची बखर :

शिवाजी महाराजांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र लिहिणाऱ्या मल्हार रामराव चिटणीसानेच या दोन बखरी लिहिल्या आहेत. मराठ्यांच्या बाजूकडून संभाजी महाराज व राजाराम महाराज यांची चरित्रे कळण्यासाठी याच बखरीचा उपयोग होतो. हा बखरकार संभाजी, राजाराम यांची चरित्रे लिहितांना संभाजी महाराजांच्या विरोधात लिहितो व राजारामंच्या संबंधी प्रशंसेचे उद्गार काढतो. या बखरीच्या लेखनाची पद्धती पूर्वीच्या शिवचरित्राप्रमाणेचे आहे. चिटणीसांच्या या तीन बखरीमुळे शिवशाहीतील अनेक सरदार घराणी व त्यांचे पराक्रमी पुरुष यांच्या हकीकती आपणापुढे येऊ शकल्या आहेत.

वरीलप्रमाणे शिवशाहीवर प्रकाश टाकणाऱ्या काही महत्वाच्या बखरी आहेत. या बखरींमध्ये अनेक दोष आहेत. बखरकारांनी ठिकाणे, काल, प्रसंग यांचे अनेक ठिकाणी अनेक घोटाळे केले आहेत. त्यामुळे सर जदुनाथ सरकारसारख्या इतिहासकाराने त्यांची इतिहास साधन म्हणून हेटाळणी केली आहे. तथापि बखरकारांना शास्त्रीय लेखन पद्धती व विचार पद्धती माहित नव्हती. त्यांची शैली पौराणिक थाटाची होती, पण त्यांचा प्रयत्न प्रमाणिक होता, या गोष्टी लक्षात घेतल्या तर बखरीतील उणिवा क्षम्य ठरतात. कृष्णाजी अनंत सभासद व मल्हार रामराव चिटणीस यांसारख्या बखरकारांनी जुनी कागदपत्रे अभ्यासली होती, त्यांचा काही ठिकाणी त्यांनी आधारही घेतला होता. आता ती कागदपत्रे आपल्यास मिळत नाहीत तेव्हा त्यासाठी बखरीवरच विसंबून राहणे आवश्यक ठरते. शिवशाहीच्या इतिहासात जेथे त्रृटी आहेत, मोकळ्या जागा आहेत, तेथे बखरी आपल्या साहाय्यास येऊ शकतात. जोपर्यंत अस्सल कागदपत्रांच्या आधारे बखरीतील विधान खोडून टाकता येत नाही, तोपर्यंत ते विधान खरे धरुन चालावयास हरकत नाही.

**मराठी शिलालेख, नाणी इत्यादी :-**

शिलालेख, नाणी, हत्यारे ही सुद्धा इतिहासाची अमोल अशी साधने आहेत. मुंबई, पुणे, अहमदनगर, कोल्हापूर इत्यादी ठिकाणी जी पुराणवस्तु संग्रहालये आहेत तेथे शिवशाहीकालीन नाणी, हत्यारे, पोषाख, चित्रे इत्यादी वस्तू जपून ठेवलेल्या आढळतात. विशेषत: पुण्यातील भारत इतिहास संशोधक मंडळामध्ये निजामशाही, आदिलशाही फर्माने, शिवाजी महाराज, संभाजी, राजाराम, यांची अस्सल आज्ञापत्रे, नाणी, चित्रे यांचा उत्कृष्ट संग्रह आहे. शिलालेखात तंजावर येथील बृहदीश्वरा मंदिरात कोरलेला शिलालेख महत्वाचा आहे. हा शिलालेख सरफोजी राजांच्या कारकीर्दीत स १८०३ साली कोरला गेला. या शिलालेखात भोसले राजघराण्याचा इतिहास सांगितलेला आहे. परमानंदकृत शिवभारत या काव्यग्रंथाचा आधार या शिलालेखकाराने घेतलेला दिसतो.

**१.५ मराठी सत्तेच्या उद्याची कारणे :-**

ग्रँट डफ हा मराठ्यांचा पहिला इतिहासकार. त्याने आपल्या पुस्तकात मराठ्यांची सत्ता कशी उद्यास आली याची चर्चा केली आहे. मराठ्यांची राज्यस्थापना म्हणजे अरण्यात अचानक पेटलेला वणवा असल्याचे त्याने म्हटले आहे. तो म्हणतो महाराष्ट्रातील उच्छंखल आणि लुटारु वृत्तीचे हिंदू काही काळ दडपले गेले असले तरी त्यांच्या ठिकाणी गुप्तपणे जिवंत असलेली आग त्यांच्यावर राज्य करणाऱ्या मुसलमान विजेत्यांच्या आपसातील भांडणानी हडबडून, सह्याद्रीच्या रानात वाळलेले गवत ज्याप्रमाणे पेटते, त्याप्रमाणे ते ( मराठे ) वाढत्या ज्वालानिशी भडकून उठले आणि दूरचे लोक या वणव्याचे आश्चर्य करु लागले.

महाराष्ट्रातील स्वराज्य स्थापनेची क्रांती म्हणजे एक मोठा वणवाच होता, हे खरे परंतु तो मराठ्यांच्या उच्छखल अथवा लुटारु वृत्तीने पेटलेला नसून त्यांच्या स्वातंत्र्यप्रेमाने चेतविला गेला होता. रानडे, राजवाडे, सरदेसाई, सरकार इत्यादी अनेक इतिहास संशोधकांनी या राजकीय क्रांतीची पार्श्वभूमी शोधून काढण्याचा व या पार्श्वभूमीत लपून बसलेली क्रांतिसूत्रे उघड करुन सांगण्याचा प्रयत्न केला आहे. याउलट प्रा. न.र. फाटक, श्री सेतु, माधवराव पगडी, प्रा. सदाशिवराव आठवले या इतिहासकारांनी महाराष्ट्रातील स्वराज्य स्थापनेचे सर्व श्रेय शिवाजी महारांजाना दिले आहे. महाराष्ट्रातील स्वराज्य स्थापनेस पूरक ठरणाऱ्या बाबी पुढील प्रमाणे आढळून येतात.[५]

१. मराठ्यांचा डोंगराळ प्रदेश :

ज्यांनी या हिंदुस्थानावर आक्रमण करुन उत्तर काबीज करुन दक्षिणेवर ही आपले वर्चस्व निर्माण केले ते मुसलमान युद्धशास्त्र व युद्धतंत्र यामध्ये हिंदूहून प्रगत होते. हे ऐतिहासिक सत्य आहे. तरीही मराठ्यांनी त्यांच्याविरुद्ध बंड पुकारुन त्यांना नामोहरम केले. त्यांच्या फौजा गारद केल्या याचे कारण दुर्गयुद्धात त्यांना गती नवहती आणि सह्याद्रीमुळेच आम्ही दुर्गयुद्धात प्राविण्य मिळवू शकलो. सह्याद्रीचा उत्तुंग शिखरे, निबिड अरण्ये, यामधील अवघड किल्ले, प्रचंड पाऊस, हिंस्त्र पशू या निसर्गात राहण्याची मराठ्यांना सवय होती. कारण त्यांचा जन्मच सह्याद्रीच्या कुशीतील होता. परंतु अशा प्रदेशात प्रवेश करणे आणि युद्ध करणे ही गोष्ट शत्रुला मात्र अशक्य नसली, तरी फार अवघड वाटत होती. अफझल प्रसंग, शाहिस्तेखान प्रसंग, राजाराम-ताराबाईकालीन औरंगजेबची मोहीम ही त्यांची चांगले उदाहरणे आहेत.

सह्याद्रीशिवाय महाराष्ट्रामध्ये महादेव डोंगर, चांदोर डोंगर यासारख्या अनेक डोंगर रांगा आहेत. या डोंगररागांनी महाराष्ट्राची भूमी बाह्य शत्रूच्या हालचालींना प्रतिकूल बनली आहे.

याउलट हे डोंगर मराठी लष्कराची नेहमीची आश्रयस्थाने बनली होती. उदाहरणार्थ, पुढे औरंगजेबाला ज्याने सळो की पळो करुन सोडले त्या संताजी घोरपडयाचे आश्रयस्थान महादेव डोंगर हेच होते.

## २. मराठ्यांची शरीर प्रकृती :

उत्तरेकडील पंजाबी अथवा पठाणी माणसांसारखी मराठी माणसे उंच व धिप्पाड नाहीत. ती मध्यम उंचीची आणि मध्यम बांध्याची आहेत. तथापि काटकपणा, चपळाई, सावधपणा, धाडस व चिवटपणा या गुणांमध्ये हिंदू जमातीमध्ये ते कोणास हार जाणार नाहीत, शिवकालात मराठे एका दिवसात घोड्यावरुन ५० ते ६० मैल मजल सहज मारु शकत. अशा सतत मजला मारुनही तेदमून जात नसत. रायगड, सिंहगड या किल्लयावर मोकळे चढणेही आज आपणास अवघड वाटते मराठे या किल्लयावर धान्याची पोती व तोफा नेत असत. हा काटकपणा मोंलाजवळ नव्हता. गंगा-यमुनेच्या मुलुखात जिथे साधी टेकडीसुद्धा बघावयास मिळत नाही, त्या मुलुखातील मंडळीना आमचे किल्ले घेताना काय कष्ट पडले असतील, याची कल्पनाही करवत नाही.

## ३. मराठ्यांची स्वभावप्रकृती :

मराठ्यांच्या स्वभावाचे अनेक इतिहासकारांनी गुणगान केले आहे. मागे उल्लेखलेला चिनी प्रवासी युआन श्वांग म्हणतो, सध्या ( इ.स. ६२१ ) शिलादित्य महाराजांनी पूर्वेपासून पश्चिमेपर्यत सर्व देश जिंकला आहे. त्यांच्या फौजांनी दूरवरच्या प्रांतावर आपले वर्चस्व निर्माण केले आहे. परंतु महाराष्ट्रातील लोक मात्र त्यास शरण गेलेले नाहीत. ते स्वातंत्र्यप्रेम शिवाजी महाराजांच्या कालातही मराठ्यांच्या रक्तात होते. बऱ्याच वेळा हे स्वातंत्र्यप्रेम सवत्या सुभ्याच्या स्वरुपात दिसून येते. न्या. रानडे म्हणतात, महाराष्ट्रातील राज्यवस्थेचा मुख्य विशेष म्हणजे विभक्तपणाची आवड हा आहे व कोणत्याही मध्यवर्ती सत्तेच्या व्यवहाराचा पगडा दीर्घकाल आपल्यावर बसू देण्याला विरोध हा दुसरा विशेष आहे.

सर जदुनाथ सरकार यांनी उद्योगीपणा, धाडस, स्वावलंबन, स्वाभिमान आणि समतेची आवड ही मराठ्यांची स्वभाववैशिष्टये सांगितली आहेत. ते म्हणतात की, १४ व्या शतकात कृष्णा आणि गोदावरी या नद्यांच्या खोऱ्यातील नगरातून शत्रूने मराठ्यांना सह्याद्रीच्या प्रदेशात रेटत नेले आणि मराठे अधिकच गरीब व इतरांपासून अलग झाले. तेथे निसर्ग आणि हिस्त्र पशु यांच्याशी झगडत असता ते अधिकच चतुर बनले याच वेळी त्यांनी आपले शौर्य व काटकपणा हे गुण गमावले नाहीत. खरोखर, धाडस, चातुर्य आणि सेशिकपणा या गुणांत अचानक हल्ले व रात्रीचे छापे यांच्या योजना आखण्यात व त्या पार पाडण्यात, कठीण प्रसंगातून आपली सुटका करुन घेण्यात अगर युद्धातील बदलत्या स्थितीप्रमाणे सेनापतीच्या आज्ञेची वाट न पाहता आपल्या युक्त्या बदलण्यात आशिया खंडातील फक्त पठाण ही जमातच त्यांची बरोबरी करु शकेल. शिवाजी महाराजांना आपल्या स्वातंत्र्य उद्योगात अशा मराठ्यांचे सहाय्य लाभले.

## ४. मराठयाच्या भाषेची कामगिरी :-

बाराव्या तेराव्या शतकापासून मराठी भाषेची घोडदौड सुरु झाली. विवेकसिंधु, लीळाचरित्र, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चतु:श्लोकी, भागवत एकनाथी भागवत, नामदेव व तुकाराम यांचे अभंग, रामदासांचे श्लोक, या सीहित्याने मराठी भाषेचे वैभव वाढले. घरोघरी वाचली जाणारी ज्ञानेश्वरी, गायिले जाणारे अभंग हे मराठी माणसांना एकत्र आणणारे दुवे होते. आपण सर्व मराठी माणसे आहोत. एकाच संस्कृतीचे घटक आहोत, ही भावना दृढ करण्याचे काम या मराठी साहित्याने व त्यामधील विचाराने केले आहे.

## ५. मराठ्यांची तीर्थक्षेत्रे :-

मराठी साहित्याने जे कार्य केले तसेच मराठी तीर्थस्थानांनी केले आहे. पंढरपूर , आळंदी, देहू, पैठण, नाशिक, नेवासे इत्यादी अनेक तीर्थस्थाने म्हणजे मराठी माणसांना धर्मभावनेने एकत्र आणणारी शक्ति स्थाने होती, पंढरीचा पांडुरंग हा महराष्ट्रातील पाटील देशमुखांपासून

महार मांगापर्यंतचा सर्वाचा देव होता. चंद्रभोगच्या तीरी वारीच्या वेळी जो भव्य मेळावा भरत असे, त्यात उचनीच भाव पळून जात असे, भक्ती हाच भाव, काही काल का होईना परंतु सर्वत्र भरुन राहील.

## ६. मराठ्यांच्या ग्रामसंघटनेचे स्वातंत्र :

शिवकालीन ग्रामसंघटना स्वतंत्र व स्वायत्त कशी होती, याची माहिती आपण मागेघेतलीच आहे. आर्थिक बाबतीत प्रत्येक खेडे स्वयंपूर्ण असे. शासकीय बाबतीतही एकदा सरकारचा महसूल दिला की गावाचा कारभार पाटील-कुळकर्णी पंचायतीच्या मदतीने करीत असते. न्यायनिवाडा शक्यतो गावाचया वेशीच्या बाहेर जात नसे, गावातच तो होई. अशा स्वतंत्र ग्रामसंघटना देशात इतर प्रांतात नव्हत्या. या ग्रामसंघटनेमुळे मराठ्यांची स्वातंत्र्यप्रिय वृत्ती जोपासली गेली. तसेच इस्लामचे आघात सोसण्याची शक्तीही त्यांना प्राप्त झाली.

## ७. प्राचीन राजघराण्यांचा मराठ्यांकडे चालत असलेला वारसा :-

महाराष्ट्रात प्राचीन काळी चालुक्य , नलवडे, कदम, मोरे, शिलहार, अहीर, यादव इत्यादी अनेक राजघराण्यांची राज्ये होऊन गेली होती. पैठण, बदामी, मालकेड, गोवे, कोल्हापूर, कल्याणी देवगिरी अशा अनेक ठिकाणी त्यांच्या राजधान्या निर्माण झाल्या होत्या. मराठे हे अशा शुर व कर्तबगार घराण्यांचे वंशज होते. हा प्राचीन वारसा त्यांच्याकडे शिवकालापर्यंत चालत आला होता. देवगिरीच्या यादवांचे राजघराणे तर सर्वाच्या अद्यापही स्मरणात होते. खुद्द लखोजी हा या देवगिरीच्या यादवाच्या वंशजापैकीच होता. शिवाजी महाराजांची माता जिजाबाई ही लखोजीची कन्या होती.

## ८. विजयनगरने मराठ्यांना दिलेली प्ररेणा :-

मुसलमान शाहांनी विजयनगरचा केलेला विध्वंस आपण पाहिला आहे. या हिंदू राज्यांच्या नाशामुळे दक्षिणेतील प्रत्येक हिंदूचे ह्दय तळमळत होते. या भयानक विध्वंसाचे हिंदूना विस्मरण

होणे अवघड होते. हरिहर व बुक्का यांनी जशी देवगिरीच्या नाशानंतर विजयनगरच्या हिंदू सत्तेची स्थापना केली, तसे आता कुणी तरी विजयनगरच्या नाशानंतर हिंदू सत्तेचे पुनरुज्जीवन करणे गरजेचे आहे, ही इच्छा दक्षिणेत प्रबल झाली होती, खुद्द शिवाजी महाराजांच्या बालपणाची एाक -दोन वर्षे या विजयनगरच्याराज्याच्या परिसरात गेली होती. या राज्यांच्या भग्न अवशेषांनी त्यांच्या मनावर खोल ठसा उमटवला असेल व स्वतंत्र राज्यांची प्रेरणाही त्यांना दिली असेल, असे अनेक इतिहासकारांचे मत आहे.

## ९. मराठी घराण्यांचा दक्षिणेतील शाह्यांच्या दरबारी उदय :

सोळाव्या शतकाच्या अखेरीस व सतराव्या शतकाच्या सुरुवातीला अनेक पराक्रमी मराठे घराण्यांचा दक्षिणेतील निजामशाही व अदिलशाही यांच्या दरबारात उद्य झाल्याचे दिसून येते. लखुजी जाधव, मालोजी भोसले, फलटणचे निंबाळकर, मळवडीचे घाटगे,मोरे, शिर्के, सुर्वे, महाडिक, इत्यादी अनेक घराणी पाच-दहा हजाराच्या फौजा बाळगून या शाह्यांच्या दरबारी मानमरातब मिळवून बसली होती. दक्षिणेतील लढायांत या घराण्यांनी शौर्य व पराक्रम हे आपले अंगचे गुण दाखवून दिले होते. त्यांनी आपल्या जहागिरीत आपली सत्ता केंद्रेच स्थापन केली होती, हे सांगत असतांना नया. रानडे म्हणतात, देशभर लहान लहान विखुरलेल्या केंद्रातून मराठ्यांची सत्ता अगोदरच सिद्ध झालेली होती. सर्वांना सारख्याच प्रमाणात रगडू पाहणाऱ्या संकटाविरुध्द उच्च हेतू प्रित्यार्थ शिवाजीने ती सत्ता एकत्र आणली.

## १०. दक्षिणेतील शाह्यांच्या दरबारातील अंतर्गत संघर्ष आणि मराठ्यांचा फायदा :-

सतराव्या शतकाच्या प्रारंभी दक्षिणेत निजामशाही, आदिलशाही व कुतुबशाही ह्या शाह्यांत फारसे सहकार्य कधी होऊ शकलेच नाही. अदिलशाही व निजामशाही यांच्या ततर वारंवार लढाया होत राहिल्या. परिणामी मराठी सरदारांच्या लष्करी सामर्थ्यास बराच वाव

मिळाला. या शाह्यांनाही मराठा सरदारांच्या सहाय्याची गरज भासू लागली. याशिवाय या शाह्यांमध्ये आपणाला श्रेष्ठ समजणारे परदेशी मुसलमान व स्थानिक मुसलमान यांच्यातही स्पर्धा असे. एक बाजू दुसऱ्या बाजूवर मात करण्याचा व शाहीचा कारभार आपल्या वर्चस्वाखाली घेण्याचा सतत प्रयत्न करत असे. अशा संघर्षाचा अर्थातच मराठे फायदे घेत असत व आपले स्थान अधिक बळकट करण्याचा प्रयत्न करत. शिवकालपूर्व मराठ्यांचा दक्षिणेत उद्य होण्यास ही एक गोष्ट कारणीभूत झाल्याचे इतिहासकार सांगातात.

**११. दक्षिणेतील शाह्या व मोगल यांचा दुरंगी सामना मराठ्यांना अनुकूल :-**

दक्षिणेत फक्त आदिलशाही व निजामशाही यांच्यातच संषर्घ होत असे नाही, तर नंतर आदिलशाही व मोगल या दोन सत्तातही संघर्ष चालू राहिला. मोगलांना आदिलशाहीबद्दल प्रेम नव्हते, त्यांना ती शाही बुडवायची होती, आदिलशहाला मोगलापासून संरक्षण करावयाचे होते, आणि शिवाजी महाराजांना या दोघाविरुध्द युद्ध करुन स्वराज्य स्थापावयाचे होते. शिवचरित्राकडे नजर टाकल्यास असे दिसते की, आदिलशहा व औरंगजेब यांच्यातील शत्रुत्वाचा महाराजांनी बऱ्याच वेळा आपल्या फायद्यासाठी उपयोग करुन घेतला आहे. ( शहाजीराजांना आदिलशहाने कैद केले तेव्हा महाराजांनी शहावर मोगल सत्तेचे दडपण आणून त्यांची सुटका केली, हे त्यांचे एक चांगले उदाहरण आहे.) महाराजांचे आदिलशाही राज्यातील बंडखोरी प्रयत्न पाहून मोगलांना प्रारंभी आनंदच वाटला होता. कारण त्यामुळे आदिलशाही खिळखिळी होणार होती,. आणि अशी आदिलशाही जिंकून घेणे सोपे जाणार होते. विशेष म्हणजे पुढे महाराजांची सत्ता वाढल्यावर त्यांच्या सत्तेचा आदिलशहाला आधार वाटू लागला व आपल्याला मोगलाविरुद्ध महाराजांनी सहाय्य करावे म्हणून याचना करण्याची पाळी आदिलशहावर आली. सारांश , मोगल-आदिलशहा यांच्या संघर्षात महाराजांनी कधी मोगलांना अनुकूल तर कधी अदिलशहाला अनुकूल अशी भूमिका घेऊन आपल्या राज्यांचे संरक्षण केले.

## १२. मराठ्यांची गनिमी काव्याची परंपरा :

मराठी गनिमी काव्याने लढण्यात प्रसिद्ध होते. निजामशाहीचा वजीर मलिक अंबर याने गनिमी काव्यानेच मोगल व आदिलशाही यांच्याशी लढून आपल्या शाहीचे संरक्षण केले. मलिक अंबरची परंपरा शहाजीराजांनी चालविली व पुढे शिवाजी महाराजांनी तिचा विकास केला. महाराजांची अनेक युद्धे ही गनिमी काव्यांची नमुनेदार उदाहरणे आहेत. ही तेजस्वी परंपरा संभाजी महाराज, धनाजी- संताजी यांनी सांभाळली. संताजी हा तर सतराव्या शतकातील गनिमी काव्याचा सर्वश्रेष्ठ सेनानी समजला जातो. त्यांच्यापराक्रमानेच औरंगजेबाला हतबल करुन सोडले आणि त्यांची सत्ता महाराष्ट्रात स्थिर होऊ दिली नाही.

## १३. मुसलमानांच्या धार्मिक अत्यांचारांची मराठ्याविरुध्द प्रतिक्रिया :

बहामनी सुलतानांपासून ते औरंगजेबापर्यंत बहुतेक सर्व मुसलमान राज्यकर्त्यांनी दक्षिणेतील हिंदू प्रजेवर अनन्वित अत्याचार केले. १४ व्या शतकातील मराठी राज्याच्या स्थापनेस हा धार्मिक अत्याचार बऱ्याच अंशी कारणीभूत झाला, तसे पाहिले तर मराठ्यांचा राजकीय उठाव म्हणजे मुसलमानांच्या धार्मिक अत्याचाराची प्रतिक्रियाच होती. मल्हार रामराम चिटणीस या बखरकाराने आपल्या शिवचरित्रात महाराजांचे स्वराज्य-स्थापनेचे ध्येय म्हणजेच वर सांगितलेली प्रतिक्रिया स्पष्ट करुन सांगितली आहे. तो म्हणतो, वडिलांनी मिळविले ते खाऊन राहणे योग्य नाही. आपण हिंदु, दक्षिण म्लेच्छांनी ग्रासिली, देव, ब्राह्मण, खेत्रे, गाई यास बहुत पीडा झाली. धर्म अगदी बुडाला. तेव्हा धर्म रक्षणार्थ प्राणहि वेचून धर्म रक्षावा आणि म्हणूनच रामदासाने महाराजांबद्दल म्हटले आहे.

देवधर्म गो-ब्राह्मण । करावया संरक्षण
हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥

## १४. मराठी संतांची समाजिक कामगिरी :-

ईश्वर आणि धर्म तत्वज्ञान संस्कृत भाषेच्या गहन ग्रंथात अडकून पडले असताना त्यांना मुक्त करुन त्यांना बहुजन समाजापर्यत नेण्याचे महान कार्य संतांनी केले होते. त्यांच्या मते यज्ञयाग व कर्मकांड या साधनांपेक्षा देव भक्तीने प्रसन्न होतो आणि भक्ती ही कुणाचीच मक्तेदारी नाही. त्यांच्या या शिकवणूकीनेच महाराष्ट्रात शिवजन्मपूर्व तीनशे वर्षात ब्राह्मण, मराठा, न्हावी, कुंभार, साठी, माळी, चांभार, महार इत्यादी अनेक जातीत संतांचा उद्य झाला. सामाजिक समता स्थापन करण्याचा हा एक प्रयत्न होता. ही एक सामाजिक चळवळ होती, जेव्हा महाराजांच्या प्रयत्नातून राजकीय चळवळ सुरु झाली तेव्हा पूर्वीच सुरु झालेली समाजिक चळवळ तिला उपकारक व सहाय्यक ठरली.

## १५. महाराष्ट्र धर्माच्या कल्पनेचा प्रभाव :-

इतिहासचार्य राजवाडे यांच्या मते १७ व्या शतकातील विचारी पुरुषांची मने महाराष्ट्रधर्माच्या कल्पनेने भारुन गेली होती. राजवाडे यांनी महाराष्ट्रधर्माची हिंदुधर्म, धर्मस्थापना, गोब्राह्मण प्रतिपाल, स्वराज्य, स्थापना,. एकीकरण, धुरीधरण अशी उकल केली आहे. मराठी सत्तेच्या उदयाला व विस्ताराला ही कल्पना प्राणभूत ठरली असे त्यांचे म्हणणे आहे.

## १६. शहाजीराजांचा वारसा :

शहाजीराजाकडून शिवाजी महाराजांना कोणता वारसा मिळाला हा इतिहासकारांमध्ये मोठा वादाचा विषय आहे. रियासतकार गो.स. सरदेसाई, यांचे मत शिवाजीला जर राज्य संस्थापक म्हणावयाचे तर शहाजीला राज्य संकल्पक असे पद देण्यास हरकत नाही से आहे. तर प्रा. सदाशिव आठवले यांचे मत स्वराज्याचा मामला हा सर्वस्वी शिवाजीचा आहे. शहाजीकडून मिळाला तो फक्त पुण्याचा जमीनजुमला असे आहे. असे असले तरी शहाजीराजांकडून भोसले

घराण्याची प्रतिष्ठा , जहागीर, लष्करी सामर्थ्य, शौर्य व धाडस इत्यांदीचा वारसा शिवाजी महाराजांकडे चालत आला होता हे मान्य करावयास हरकत नसावी आणि हा वारसा मराठी सत्तेच्या स्थापनेच्या कामी महाराजांना उपयुक्त ठरला याबद्दलही दुमत असण्याचे कारण नाही. कारण महाराजांच्या स्वराज्य स्थापनेच्या कार्याचा प्रारंभ वाडवडिलांच्या जहागिरीतच झाला, ते लक्षात ठेवले पाहिजे. वरिल कारणांशिवाय, दक्षिणेत मोगलांची सत्ता खालवण्यास व हिंदूचा ( मराठयांचा ) प्रभाव वाढण्यास पुढील काही गोष्टी कारणीभूत झाल्याचे न्या. रानडे सांगतात. त्या गोष्टी अशा.

**१७. दक्षिणेतील शाह्यांमध्ये तुर्क इराण्यांची खंडित परंपरा.:-**

न्या. रानडे म्हणतात दिल्लीस ज्याप्रमाणे अफगाण, गिलचे, तुर्क, उझबेग, आणि मोगल यांच्या एकामागून दुसरी अशा स्वाऱ्या होत जाऊन नवी स्वारी मुसलमानी परंपरा निर्विघन राखत होती, त्याप्रमाणे दक्षिणेच्या मुसलमानांमध्ये नव्या स्वारीतील माणसांची भरती झाली नाही. दक्षिणेत या प्रकारची उणीव होती आणि येथे जे साहासी तुर्क, इराणी व हबशी आले त्यांच्यात नियमित वेळोवेळी नव्या स्वकीयांची भरती झाली नाही.

**१८. दक्षिणेतील मुसलमानी राज्यांवर हिंदू प्रभाव :-**

बहामनी राज्य हसन नावाच्या गुलामाने स्थापन केले. पूर्वी दिल्लीतील गंगू नावाच्या ब्राह्मणी राज्य असे नाव दिले. हसनने आपल्या पूर्वीच्या मालकाला बोलावून आपल्या राज्याची फडणिशी दिली. न्या रानडे म्हणतात. ही गोष्ट हिंदू प्रभावाचा पुरावा असून दक्षिणी मुसलमान व उत्तरेकडील मुसलमान यांच्यातील भेद सिद्ध करणारी आहे. या व्यवस्थेचा परिणाम म्हणजे जमाबंदी खाते व खजिना यांचा व्यवहार सदैव हिंदूच्या दिल्लीतील ब्राह्मण व खत्री यांच्या हाती राहिला. पुढे कालाच्या ओघात त्यांच्या जागी दक्षिणी ब्राह्मण व प्रभू हे आहे. दक्षिणेतील शाह्यांवरील मराठ्यांचा प्रभाव स्पष्ट करतांना ते पुढे म्हणतात, (पुढे जेव्हा ) बहामनी राज्यांची

पाच वेगवेगळी विभक्त राज्ये अस्तित्वात आली तेव्हा खेड्यांच्या व महालांच्या जमाबंदीचा हिशेब फारसी किंवा उर्दू भाषेऐवजी येथील भाषेत (मराठीत) ठेवला जाऊ लागला.

**१९. दक्षिणी सुलतानांच्या हिंदू राण्या व काही शाह्यांचे संस्थापक बाटके मुसलमान :**

दक्षिणी सुलतानांच्या दरबारात हिंदूचा प्रभाव वाढविण्यासत्यांच्या जनानखान्यातील हिंदू राण्या कारणीभूत झाल्याचे न्या. रानडे सांगतात. विजयनगरची राजकन्या ७ व्या बहामनी सुलतानास दिली होती. ९ व्या बहामनी सुलतानास सोनखेडच्या राजाने आपली मुलगी दिली होती. क्मुकूंदराव या ब्राह्मणाने आपली बहीण विजापूरचा पहिला सुलतान युसूफ आदिलशहा यास दिली होती. तिचे मुलगे पुढे सुलतान बनले. साबाजी या मराठा सरदाराने आपली कन्या बरीदशाहीच्या राजपुत्रास दिली होती. अशा प्रकारे हिंदूशी रक्ताचा संबंध आल्यामुळे दक्षिणी सुलतानांच्या ठिकाणी पूर्वीचा कडवेपणा राहिला नाही, असे न्या. रानड्यांचे मत आहे. तसेच काही शाह्यांचे संस्थापकच बाटके मुसलमान होते. उदा. निजामशाहीचा संस्थापक हा वऱ्हाडातील पाथरी गावाचा कुलकर्णी होता. बाटून तो मुसलमान झाला होता. इमादशाहीचा संस्थापकही मूळचा ब्राह्मण होता. त्यांचा परिणाम सांगताना न्या. रानडे म्हणतात, या प्रकारांनी एकंदर वातावरणात असा प्रभाव उत्पन्न झाला की, दक्षिणेतील मुसलमान सत्ताधाऱ्यांना स्वधर्माचा कडवा अभिमान व क्रूर माथेफिरुपणा टिकवणे अशक्य झाले. न्या रानडे यांच्या वरील दोन विधानांशी अनेक इतिहासकार फारसे सहमत होत नाही. कारण सुलतांनांच्या अत्यांचाराची व शौर्याची अनेक उदाहरणे इतिहासात सापडतात.

**२०. सर्वात प्रभावी कारण म्हणजे शिवाजीच होय :**

वर दिलेली सर्व कारणे ही मराठी सत्तेच्या उद्यासपूरक ठरणारी कारणे आहेत. मराठी सत्तेच्या उठावाचे सर्वात प्रभावी कारण म्हणजे खुद्द शिवाजी महाराजच होत. महाराजांचा जन्म होण्यापूर्वीही सह्याद्री होता, काटक मावळे होते, सर्व काही होते व या गोष्टी नंतरही होत्या व

आहेत. तथापि म्हणून काही महाराष्ट्रात शिवाजीपाठीमागून शिवाजी निर्माण झाले नाहीत. या सर्व अनुकूल गोष्टींचा राष्ट्राच्या उद्धारासाठी उपयोग करुन घेणारा असामान्य नेता निर्माण व्हावा लागतो. तेव्हा अशी क्रांती होते.

याच संदर्भात प्रा.न. र. फाटक म्हणतात, महाराज हे स्वयंभू होते. त्यांच्या कर्तबगारीच्या उभारणीस दुसऱ्या कोणाही कारागीराचा हात लागलेला नाही. प्रा. सदाशिव आठवले यांचेही मत असेच आहे. ते म्हणतात, सगळ्याच सत्ता झुगारुन देऊन शिवाजी पुढे जी स्वराज्याची भाषा बोलला आणि त्याप्रमाणे त्याने कृतीही करुन दाखविली ते सारे शहाजीला झेपण्यासारखे व पचण्यासारखे नव्हते. शिवाजीची ध्येयसृष्टी ही शिवाजीची स्वत:चीच तिथे तो कुणाचेही काही लागत नाही.

श्री सेतु माधवराव पगडी यांनी आपल्या Chhatrpati Shivaji या ग्रंथात या मुद्याची विस्ताराने चर्चा केली आहे. ते म्हणतात, नवा मार्ग, स्वातंत्र्याकडे जाणारा मार्ग, पूर्वी कधी अनुभवलेले नव्हते असे स्वभिमानी व संपन्न जीवन जगण्याचा मार्ग शोधून काढण्याचे काम शिवाजीने केले. खरे म्हणजे त्या काळी नाव घेण्यसारखी कोणतीही राष्ट्रीय चळवळ नव्हती. तेव्हा अशा चळवळीचा तो प्रतीक होता अगर प्रतिनिधी होता असे समजणे चूक आहे. आपल्या लोकांमध्ये राष्ट्रीय भावना जागृत करण्याचे, आपल्या नेतृत्वाखाली त्यांना एक करण्याचे आणि स्वराज्याची स्थापना करुन त्यांना संपन्न जीवन देण्याचे कार्य शिवाजीने व शिवाजीनेच केले, ते अन्य कुणीही केले नाही. अशा प्रकारे हिंदुस्थानच्या इतिहासात जनतेचा नेता नव्या मार्गाचा शोधक म्हणून त्याचे स्थान आहे. राष्ट्रीय चळवळीने त्यांला निर्माण केले नाही. धडपडण्याची व यश मिळविण्याची प्रेरणा त्याने दुसऱ्यांना दिली. अशा प्रकारे खरोखरच तो एक स्वयंभू कर्तबगारीचा नेता होता.

## १.६ जातीची उत्पत्ती [६]:

जातीची उत्पत्ती नेमकी कशी झाली ? हा नेहमीच वादाचा विषय राहिला आहे. अनेक समाजशास्त्रज्ञांनी जातीच्या निर्मितीबाबत आप -आपले सिद्धांत प्रतिपादन केले आहेत. या ठिकाणी आपण सामाजिक स्तरीकरणाचा एक प्रकार म्हणूनच जातीसंस्थेवर किंवां जाती व्यवस्थेची माहिती पाहणार आहोत व त्यास अनुरुप असे जातीसंस्थेच्या उगमासंबधीचे विचार पाहणार आहोत. एका भारतीय समाजशास्त्रज्ञाने असे म्हटले आहे की, जातीचे निर्मूलन ही गुंतागुंतीची प्रक्रिया आहे. स्वातंत्र्यप्राप्ती नंतर जातीनिर्मूलनाच्या अनेक कायद्यांची तरतूद करुनही जातीचे अस्तित्व आजही, ५० वर्षापेक्षा जास्त कालावधी जाऊनही कायम आहे. म्हणून हे समाजशास्त्रज्ञ विनोदाने असे म्हणतात की, जात म्हणजे काय ? तर जी जाता जात नाही ती जात, जातीसंस्थेची व्याख्या पाहण्याच्या अगोदर जात ह्या शब्दांची व्याप्ती पाहणे आवश्यक ठरते.

१) पाश्चिमात्य विचारवंताच्या विचारानुसार जात या संकल्पनेची व्युप्तत्ती पाहतांना एक गोष्ट लक्षात येते ती ही की जात हा शब्द कास्ट ( Caste) या इंग्रजी शब्दांचे रुपांतर आहे. इंग्रजीत कास्ट हा शब्द पोतुगीज भाषेतील कास्टा रक्तासंबधी (Caste ) असा होता. पोर्तुगीजांनी वंशाची शुध्दता (Breed) असा होतो. पोर्तुगीजांनी वंशाची शुद्धता या अर्थाने हा ( म्हणजे कास्टा -Caste ) शब्द वापरला. कास्टा (Casta) हा शब्दसुद्धा मूळ पोर्तुगीज भाषेतील नसून त्यांनी तो लॅटिन भाषेतील कास्टस ( Castus) हा शब्दांचा लॅटिन ाषेतील, अर्थ आहे शुद्ध (Pure) किंवा निष्कलंक (Chaste) पोर्तूगीज लोकांनी भारतात आल्यावर भारतातील जातीसाठी त्यांनी वरील शब्द ( म्हणजे कास्ट, कास्टा ) प्रथम वापरला व नंतर तो रुढ झाला.

२) भारतीय दृष्टिकोनातून जातीची व्युत्पत्ती पाहावयाची झाल्यास प्रथमत: आपणास संस्कृत भाषेचा आधार घ्यावा लागेल. जर आपण संस्कृत भाषेचा विचार केला तर जात हा मराठी जन या संस्कृत क्रियापदापासून बनला असून त्याचा अर्थ आहे जन्माने अस्तित्वात येणारा गट वा समूह असा आहे.

भारतातील हिंदू समाजाची जातीवर आधारलेली स्तररचना ही वैशिष्टयपूर्ण बाब आहे. जातीची निर्मिती कशी झाली असावी ? याबाबत विविध मत असून त्यांचा थोडक्यात आढावा पुढील प्रमाणे. काही विचारवंताच्या मताने व विशेषत धर्मशास्त्रज्ञानुसार हा समाज प्रथम परमेश्वराने निर्माण केला व समाजाचे कार्य चालविणे सुलभ जावे म्हणून त्यांचे चार गटात विभाजन केले. हा प्रत्येक गट वर्ण संज्ञेने ओळखला जातो. प्रत्येक वर्ण हा परमेश्वराच्या एकेक अवयवयाचे प्रतीक मानले गेले आहे तर काही धर्मतज्ज्ञ असे मानतात की, त्या त्या वर्णाचा प्रथम पुरुष त्या अवयवाच्या माध्यमातून जन्माला आले व वंश व स्तरातून ते वर्ण विस्तारीत झाले त्याचे स्वरुप खालीलप्रमाणे :-

१) **ब्राह्मण** :- हे परमेश्वराच्या तोंडाचे प्रतीक आहेत किंवा परमेश्वराच्या तोंडातून ब्राह्मणांचा जन्म झाला असावा.

२) **क्षत्रिय :-** हे परमेश्वराच्या बाहूचे प्रतीक आहेत किंवा त्यांच्या बाहूतुन क्षत्रियांचा जन्म झाला असावा.

३) **वैश्य :-** हे परमेश्वराच्या मांड्याचे प्रतीक आहेत अथवा त्या परमेश्वराच्या मांड्यातून वैश्य जन्माला आले असावेत.

४) **शूद्र :-** हे परमेश्वराच्या पायाचे प्रतीक आहेत अथवा परमेश्वराच्या पायातून त्यांनी जन्म घेतला असावा.

या चार वर्णातून कालांतराने वर्ण संकर प्रक्रियेतून हजारो जाती व उपजाती अस्तित्वात आल्या. काही विचारवंताच्या मताने परमेश्वर पूजनाच्या भिन्नभिन्न पद्धतीतून भिन्नभिन्न देवतांच्या उपासनाप्रकारातून काही जातीची उत्पत्ती झाली असावी. काही जाती अभ्यासकांच्या मताने व्यक्तीनी स्वीकारलेल्या व्यवसाय भिन्नतेतूनही जातीची निर्मिती झाली असावी.

काही समाजशास्त्रज्ञ वंशिक भिन्नता हे जातीनिर्मितीचे एक कारण सांगतात . जातीच्या उत्पत्तीबाबत जरी विद्वानात मतभेद असले तरी जातीसंस्थेचे अस्तित्व ही एक वास्तवता आहे व भारतीय समाजाच्या स्तररचनेचे ते एक अंग आहे. त्या दृष्टीने जातीचा अर्थ स्पष्ट होण्यासाठी जातीच्या काही व्याख्यांचा विचार करणे प्रस्तूत संशोधनाच्या अनुषंगाने आवश्यक ठरते.

**जातीची व्याख्या :-**

जातीचा अभ्यास जगातील अनेक समाजशास्त्रज्ञांनी केला असून त्यातील काही व्याख्या पुढील प्रमाणे :-

१) **डॉ. मदन आणि डॉ. मुजूमदार** :- या दोन भारतीय समाजशास्त्रज्ञांनी जातीची अत्यंत सरळ व सोपी व्याख्या एका वाक्यात केली आहे ती पुढीलप्रमाणे जात म्हणजे साचेबंद वर्ग (Closed Class) होय या व्याख्येतील साचेबंद वर्ग या संज्ञेचे राष्ट्रीयकरण होण्याची आवश्यकता आहे. साचेबंद वर्गाप्रमाणेच काही समाजाचा खुला वर्ग (Open Class) अस्तित्वात असतो. खुल्या किंवा मुक्त वर्गव्यवस्थेत व्यक्तीच्या सामाजिक संबंधावर कोणत्याही प्रकारची बंधने नसतात . व्यक्तीला तिच्या इच्छेनुसार तिचा व्यवसाय तिच्या भूमिका यांची निवड करता येते. शिवाय व्यक्तीला अन्य कोणत्याही वर्गातील व्यक्तीशी किंवा कोणत्याही समूहाशी सामाजिक संबंध प्रस्थापित करण्यास मुक्त द्वार असते. या उलट साचेबंद वर्गव्यवस्थेत व्यक्तीवर अनेक प्रकारची बंधने लादली जातात. ही बंधने पुढील व्यवहाराच्या संबंधात असतात(अ) रोटी -

बेटी व्यवहार ( ब) धार्मिक व्यवहार (क) शैक्षणिक व्यवहार (ड) सामाजिक व्यवहार हे व्यवहार पार पाडतांना व्यक्तीवर अत्यंत कडक बंधने लादली जातात. अशी बंधने न पाळल्यास व्यक्तीला वर्गाबाहेर हाकलले जाते. वर्गाच्या या स्वरुपास साचेबंद वर्ग असे म्हणतात. सर्वसामान्यपणे जातीचे स्वरुप हे साचेबंद वर्गासारखे असते.

२) **प्रा.सी.एच. कुले** :- यांच्या विचारानुसार आनुवंशिकतेच्या तत्वावर आधारलेला गट किंवा वर्ग म्हणजे जाती होय. प्रा. कुले यांच्या व्याखेत त्यांनी आनुवंशिकतेला जास्त महत्व दिले आहे. जातीपुरताच जर विचार करावयाचा असेल तर अनुवंश म्हणजे एखाद्या समूहाने आपला व्यावसायिक गुण आणि सामाजिक दर्जा पुढील पिढीला हस्तांतरित करणे होय.

३. **प्रा. डेव्हिड मायकेल ऑरेनसटाईन –** सामाजिक स्तरीकरणाचा एक प्रकार म्हणून ऑरेनस्टाईन यांनी जातीव्यवस्थेची व्याख्या केली असून अन्य पारंपरिक व्याख्या पेक्षा ती थोडी वेगळी असल्यामुळे तिचा या ठिकाणी विचार करणे आवश्यक ठरते. ती व्याख्या पुढीलप्रमाणे जाती व्यवस्थेवर आधारित समाजिक स्तरीकरण म्हणजे वंशिक, मानवजातीय आणि जन्मजात धार्मिक शुद्धता यांवर आधारित जीवन जगण्याच्या संधीद्वारे व्यक्ती किंवा गट ( समूह) यांना वेगळे करण्याची व्यवस्था होय. दुसऱ्या शब्दात असे म्हणता येईल की जातीवर आधारित स्तरीकरणाच्या प्रक्रियेत जन्मावर आधारित स्तरात अथवा थरात समाजाचे विभाजन करण्याची क्रिया समाविष्ट आहे.

४) **प्रा. आर.सी. वालेस आणि डब्ल्यू डी वालेस :–** या दोन समाजशास्त्रज्ञांनी पण समाजिक स्तरीकरणाच्या दृष्टिकोणातून जाती व्यवस्थेची व्याख्या केली असून ती पुढीलप्रमाणे आहे. सामाजिक स्तरीकरणाचा जाती हा असा एक प्रकार आहे की, ज्यात व्यक्तीला तिच्या माता पित्यांच्या दर्जा कायम स्वरुपात बहाल करण्यात येतो वा बहाल केला जातो.

जाती संस्थेच्या वरील व्याख्यावरुन खालील गोष्टी आपल्या सहज लक्षात येतात. त्या म्हणजे

* जातीचे स्वरुप एखाद्या बंद वर्गासारखे आहे.
* जात निर्धारित करण्यात आनुवंश महत्वाची भूमिका बजावते.
* कोणत्याही व्यक्तीची जात तिच्या जन्मावरुन ठरते.

दुसऱ्या शब्दात ज्या जातीदर्जाच्या मातापित्यांच्या पोटी मुलाचा जन्म झाला असेल तो जाती, दर्जा मुलाला पण आपोआप प्राप्त होतो. जन्माने प्राप्त झालेला जाती, दर्जा, कायम स्वरुपाचा असतो व तो बदलता येत नाही. सामाजिक स्तरीकरणाचा एक प्रकार म्हणून जातीकडे पाहिले जाते. तसेच प्रस्तूत संशोधन विषयाच्या अनुषंगाने जाती व्यवस्थे संबंधी सविस्तर माहिती पुढील मुद्दयात दिलेली आहे.

## १.७ जाती व्यवस्था[७] :-

जाती व्यवस्थेचा एक स्तरीकरण प्रकार म्हणून विचार करतांना आपणास हे लक्षात घ्यावे लागेल की, जाती व्यवस्था हे भारतीय समाजाचे नव्हे तर हिंदू समाजाचे एक व्यवच्छेदक लक्षण आहे. जातीच्या कल्पनेचा प्रभाव भारतातील मुसलमान व ख्रिश्चन समुदायांवरही पडला असला तरी ज्या प्रमाणे हिंदुसमाज हा नानाविध जातीमध्ये विभागला गेलेला आहे. त्याचप्रमाणे मुसलमान वा ख्रिश्चन समाज विभागले गेलेले नाहीत. जात असणारा तो हिंदू अशी हिंदू या शब्दांची व्याख्या आपणास करता येईल. हिदूसमाज हा जातीमध्ये तर विभागला गेलेला आहेच पण त्याचबरोबर या जातीची त्यांच्या सामाजिक श्रेष्ठतेनुसार अधिक्रमित स्वरुपाची रचना झाली असल्याचेही आपणास आढळेल. स्तरीकरणाचे विवेचन करतांना आपण प्रतिष्ठा व सत्ता यांचे विषम वितरण हाच स्तरीकरणाचा मुख्य आधार मानला आहे. जाती व्यवस्था हा जर एक स्तरीकरण प्रकार आहे . असे म्हटले तर सहाजिकच हिंदू समाजातील विभिन्न जातीमधून प्रतिष्ठा व सत्तेचे झालेले वितरण विषमच होते असे आपल्याला मान्य करावे लागेल. म्हणूनच हिंदू समाजातील जातीव्यवस्थाचा एक स्तरीकरण प्रकार म्हणून विचार करताना आपल्याला

खालील गोष्टीचा स्पष्ट उलगडा करुन घ्यावा लागेल (१) ज्याप्रमाणे वर्गाची म्हणून काही व्यवच्छेदक लक्षणे आहेत. त्याप्रमाणे जातीची ठळक लक्षणे कोणती , ही लक्षणे अर्थातच सर्व जातीना लागू पडणारी असावयास पाहिजे. (२) जातीचा अधिक्रम किंवा जातीची श्रेष्ठता कनिष्ठता निर्धारित करणाऱ्या कसोटया कोणत्या व (३) जातीजातीमधील परस्परसंबंधाचे स्वरुप काय ? (४) जाती व्यवस्थेत काही कारणांमुळे बदल घडून येत आहेत काय ? आणि जातीव्यवस्थेत घडून येणाऱ्या परिवर्तनाची दिशा कोणती ? या प्रश्नांच्या संदर्भातच जातीव्यवस्थेचे विवेचन सदर संशोधना करीता करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

## (अ) जातीची प्रमुख लक्षणे :-

जातीव्यवस्थेचे अध्ययन करणाऱ्याकडून जाती - व्यवस्थेचे स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. या प्रयत्नात जातीव्यवस्थेच्या अध्ययनकर्त्या कडून या व्यवस्थेच्या ठळक लक्षणांचे विवेचन करण्यात आले असल्याचे आढळते. जातीची व्याख्या प्रस्तुत करतांना किंवा जातीच्या ठळक लक्षणांचे विवेचन करतांना आपल्याला जातीच्या लक्षणांमध्ये व जातीव्यवस्थेच्या लक्षणांमध्ये असणारा फरक लक्षात ठेवावयास हवा. जातीच्या ठळक वैशिष्टयांचे वर्णन खालील प्रमाणे करता येईल.

**१) जात हा कुटूंबसमुचय आहे** : म्हणजे वर्गाप्रमाणे जातीसाठीही कुटूंब हाच एकक आहे. प्रत्येक जात अनेक कुटुंबे मिळूनच बनत असते. वर्ग स्वरुपाचे विवेचन करतांना कुटूंब हा वर्गाचा एकक असतो म्हणजे काय याचे स्पष्टीकरण आपण केले आहे तेच जातीलाही लागू पडते.

**२) विशिष्ट नांव :** प्रत्येक जातीला विशिष्ट असे नाव असते. जातीला असणाऱ्या व्यवसायावरुन असे नाव पडते. त्याचप्रमाणे काही जातीची नावे स्थल निदर्शकही असतात.

उदा. देशस्थ ब्राह्मण, कऱ्हाडे, निरनिराळ्या कारणांमुळे जरी जातींना नावे मिळाली असली तरी नामाभिधान नसलेली कोणतीच जात नसते व नाही.

३) **विशिष्ट व्यवसाय :-** पारंपारिकत: प्रत्येक जातीला विशिष्ट व्यवसाय लावून देण्यात आलेला आहे. धंदा किंवा व्यवसाय वंशपरंपरागत असतो म्हणजे पिढ्यानपिढ्या जातीत समाविष्ट होणाऱ्या कुटूंबाकडून तोच व्यवसाय केला जातो.

४) **जन्मजात सभासदत्व :-** जातीच्या लक्षणांमध्ये आपण जात हा कुटूंब समुचय आहे असे म्हटले आहे व या दृष्टीने वर्ग व जात यांच्यात लक्षण साम्यच आहे. पण जात हा कुटूंबसमुच्चय असला तरी कोणत्याही एका जातीच्या कुटूंबाला दुसऱ्या जातीत प्रवेश करण्याचे स्वातंत्र्य नसते. व्यक्तीसाठी व्यक्तीची जात तिच्या जन्माप्रमाणे निर्धारीत होत असते. व्यक्ती ज्या कुटूंबात जंन्म घेतो त्या कुटूंबाची जात हीच व्यक्तीची जात ठरते. पण जन्मानुसार ठरणारी ही स्थिती व्यक्तीला तर बदलता येत नाहीच पण पिढ्यानपिढ्या व्यक्तीच्या कुटूंबालाही बदलता येत नाही. सामाजिक गतिशीलतेचा विचार करतांना या गोष्टीविषयी सविस्तर माहिती पाहणे आवश्यक ठरते. ती माहिती पुढील प्रमाणे :-

५) **जात हा अंतर्विवाही गट आहे :** जातीव्यवस्थेत एका जातीच्या व्यक्तीला दुसऱ्या जातीत विवाह करता येत नाही. त्या बाबतीत जाती व्यवस्थेत स्पष्ट असे निर्बध घालून देण्यात आले असून या नियमांचा भंग करणाऱ्यांना कडक दंड देण्याची तरतूद जातीव्यवस्थेत करण्यात आली आहे.

६) **सामाजिक संबंधावरील निर्बध हे प्रत्येक जातीचे आणखी एक लक्षण आहे:** ज्या प्रमाणे निरनिाळ्या जातीच्या कुटुंबामधील सोयरिकीवर बंधने आहेत त्याचप्रमाणे निरनिराळ्या जातीच्या व्यक्तीमध्ये येणाऱ्या परस्परसंबंधाबाबत प्रत्येक जातीने नियम घालून दिलेले आढळतात. बेटी व्यवहारावरील बंदीप्रमाणेच रोटी व्यवहारावरही बंधने असतात. कोणत्या

जातीच्या व्यक्तीच्या हातचे अन्न घेता येते या विषयी प्रत्येक जातीचे नियम आहेत. सामान्यत हया नियमाप्रमाणे श्रेष्ठ जातीला कनिष्ठ जातीच्या व्यक्तीने शिजविलेले अन्न घेता येत नाही . खानपानावरील निर्बधाप्रमाणेच अन्य प्रकारच्या समाजिक संबंधाबाबतही नियम आहेत. सार्वजनिक स्थानी विभिन्न जातीच्या व्यक्तीमध्ये येणाऱ्या संबंधाबाबत जसे नियम आहेत त्याप्रमाणे खाजगी स्वरुपाच्या संबंधाबाबतही नियम आहेत,, सामाजिक संबंधावरील निर्बध हे प्रामुख्याने जातीच्या विधिगत पावित्र्यावर आधारलेले आहेत.

७) **जात व जीवनपद्धती :-** जातीच्या वरील लक्षणांचा विचार केला तर प्रत्येक जातीचे आचारविचार व जीवनपद्धती अन्य जातीच्या जीवनपद्धतीपेक्षा निराळी का होत जाते याचे स्पष्टीकरण आपल्याला करता येईल. विवाहावरील निर्बधामुळे विभिन्न जातीमध्ये व्यक्तीची अदलाबदल किंवा देवाण-घेवाण होऊ शकत नाही. त्यामुळे एका जातीचे आचारविचार दुसऱ्या जातीत प्रविष्ट होऊ शकत नाही. प्रत्येक जातीस व विशिष्ट व वंशपरंपरागत असा व्यवसाय असल्यामुळे प्रत्येक जातीच्या व्यक्तीवर व्यवसायाचा पडणारा प्रभाव वेगवेगळाच राहील. व्यवसाय व व्यक्तिमत्व यांचा संबंध या ठिकाणी लक्षात घेणे योग्य ठरेल. प्रत्येक व्यवसायाच्या गरजा निराळ्या, व्यवसायासाठी लागणारे संस्कार निराळे म्हणूनच निरनिराळ्या व्यावसायिकांच्या जीवनशैलीत फरक येत जाणे स्वाभाविकच ठरते. सामाजिक निर्बधामुळे एका जातीच्या जीवनशैलीचे अनुकरण दुसऱ्यांकडून होण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. या सर्व कारणांमुळे प्रत्येक जातीची जीवनशैली वैशिष्टयपूर्ण होत जाते.

**(आ) जातीय श्रेष्ठत्व व कनिष्ठत्व ठरविणाऱ्या कसोट्या :** हिंदू समाजातील जातीव्यवस्थेत जातीची एक निश्चित रचना किंवा अधिक्रम लावून देण्यात आल्याचे आढळून येते. भारतातील निरनिराळ्या भागांमधून जातीची संख्या, जातीवाचक नावे याबाबतीत भिन्नता

आढळत असली तरी विभिन्न प्रदेशातून जातीच्या श्रेष्ठत्व कनिष्ठत्वाच्या निर्धारणासाठी चातुर्वण्यांच्या चौकटीचाच उपयोग केला जातो. हिंदू समाज चारवर्णात विभागला गेला असून या प्रत्येक वर्णात अनेक जाती समाविष्ट केल्या जातात. ब्राह्मण , क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे हिंदू समाजातील चार वर्ण असून त्यांच्या सामाजिक श्रेष्ठतेप्रमाणे त्यांचा क्रम ब्राह्मण प्रथम, नंतर क्षत्रिय, त्यानंतर वैश्य व शेवटी शूद्र असाच लावण्यात येतो जातीचा अधिक्रम ठरवितांना सामान्यपणे चातुवर्ण्याच्या चौकटीचा उपयोग करण्यात येत असल्याने ब्राह्मण म्हणविणाऱ्या जातीजातीच्या अधिक्रमात शिरस्थानी असतात. ब्राह्मण जातीनंतर स्वत:स क्षत्रिय मानणाऱ्या जाती येतात. क्षत्रिय जातीनंतर वैश्य जाती व शेवटी शुद्र जाती असा जातीक्रम लावण्यात आला आहे. प्रतिष्ठा व सत्ता दृष्टया चार वर्णाचा विचार केला तर आपणास हेच आढळून येईल की, धनसत्ता वैश्यांच्या व  राज्यसत्ता क्षत्रियांच्या हाती केंद्रित झाल्यामुळे याच वर्णांना समाजात प्रतिष्ठा व सत्ता जास्त असावयास हवी होती. जाती करीत असलेल्या व्यवसायांच्या प्रकार्यात्मक महत्वाच्या अनुषंगानेही जरी चारी वर्णाच्या प्रतिष्ठेचा विचार केला तरी काही व्यवसाय समाजदृष्टया प्रकार्यात्मक महत्वाचे असून देखील हे व्यवसाय करणाऱ्या जातीची प्रतिष्ठा कनिष्ठच मानली जात असे. ब्राह्मण जातीना प्राप्त झालेली सर्वोच प्रतिष्ठा ह्या जातीच्या व्यवसायाला असणाऱ्या प्रकार्यात्मक महत्वाचया अनुषंगाने स्पष्ट करता येत नाही. विशिष्ट व्यवसाय करण्यास आवश्यक ती पात्रता अंगी कसणाऱ्या व्यक्तीची कमतरता ही देखील ब्राह्मण जातीच्या समाजिक प्रतिष्ठेचे निर्धारण करणारी कसोटी ठरत नाही.  कारण  जातीव्यवस्थेत व्यक्तीची व्यावसायिक पात्रता जन्मानुसारच ठरुन आलेली असते. म्हणून जातीव्यवस्थेत विभिन्न  जातीचे श्रेष्ठत्व कनिष्ठत्व ठरविणाऱ्या कसोट्या यासंबंधी विचार करतांना आम्हास पवित्र्याच्या कल्पनेचाच आधार घ्याव लागतो.  हिंदू समाजातील प्रत्येक जातीला विशिष्ट व्यवसाय असतो. विभिन्न जातीच्य

व्यवसायांची समान दृष्टया असणाऱ्या प्रकार्यात्मक महत्वाऐवजी त्यांच्या विधियुक्त पावित्र्याची तुलना केली तर जातीचा त्यांच्या श्रेष्ठत्व कनिष्ठत्वाप्रमाणे अधिक्रम कसा लावला जातो हे आपल्या लक्षात येऊ शकेल. ब्राह्मण जातीचा म्हणून जो व्यवसाय किंवा ब्राह्मणांची जी कार्ये होती त्या कार्यासाठी शुर्चिर्भूतपणा अत्यावश्यक मानला जात असे. सहाजिकच ही कार्ये पार पाडणाऱ्या व्यक्ती व गटांकडून पावित्र्याचे अपेक्षित प्रमाण जास्त असे. ब्राह्मणांची कार्येच आर्थिक दृष्टया पवित्र्याशी संबंधित असल्याने आणि विधियुक्त पावित्र्य हीच व्यवसायाच्या श्रेष्ठत्वाची कसोटी ठरविण्यात आल्यामुळे ब्राह्मण जातीची सामाजिक प्रतिष्ठा सर्वोच्च ठरली. ब्राह्मणानंतर अन्य जातीचे सामाजिक श्रेष्ठत्व वा कनिष्ठत्व ठरवितांना दोन कसोट्या वापरण्यात आल्या व या कसोट्या लावून त्या जातीचा दर्जा ठरविण्यात ाअला. या कसोट्या म्हणजे १) जातीच्या व्यवसायाचे विधियुक्त पावित्र्य व २) ब्राह्मण जातीशी त्या जातीचा असणारा संबंध, जातीच्या लक्षणांचे विवेचन करतांना आपण जाती जातीमधील परस्परसंबंधावर असणाऱ्या निर्बधांचा उल्लेख केला आहे. खानपानावरील निर्बधांच्या संदर्भात याठिकाणी विचार करतांना आपल्याला असे म्हणता येईल की, ज्या जाती बाबत ब्राह्मणावरील हे निर्बध शिथिल असत, त्या जातीची समाजिक प्रतिष्ठा जास्त मानली जात असे. ब्राह्मण जातीशी जातीच्या असणाऱ्या वा येणाऱ्या संबंधामध्ये जवळीक जितकी जास्त तितकी इतर जातीच्या तुलनेत त्या जातीची सामाजिक प्रतिष्ठा जास्त असे आपणास म्हणता येईल. या विवरणा वरुन हे आपल्या लक्षात येण्यासारखे आहे की, विभिन्न जातीमधून प्रतिष्ठा व सत्ता यांच्या विषम विवरणाचा आधार व्यवसायाच्या विधियुक्त पावित्र्याची कल्पना हाच राहिला आहे. जातीव्यवस्था, जातीची वैशिष्टये व जातीचा त्यांच्या श्रेष्ठत्व कनिष्ठत्वानुसार लावण्यात येणारा अधिक्रम या संबंधीचे आतापर्यंत करण्यात आलेले विवेचन वर्तमान हिंदू समाज स्थितीस लागू पडणारे नाही, शतकानुशतके भारतात

ाती व्यवस्था अस्तित्वात आहे व स्वातंत्र्य प्राप्तीनंतर पाव शतक ओलांडले तरी जाती व्यवस्था नष्ट होण्याची चिन्हे दिसत नाही. पण असे जरी असले तरी शतकानुशतके अस्तित्वात असणाऱ्या या व्यवसथेत नेहमीच बदल होत आले आहेत. व्यवसायांची वाढती संख्या, जातीचे पोट जातीमध्ये होणारे विभाजन, प्रदेशांतर आदी अनेक कारणांमुळे जातीव्यवस्थांतर्गत असे बदल येथे नेहमी होत आलेले आहेत. जातीच्या संख्येवरुनच हे आपल्या स्पष्टपणे लक्षात येईल. भारतीय समाजात वर्ण जरी चार असले तरी जाती मात्र निश्चित किती आहेत हे सांगणे कठीण आहे. जातीव्यवस्थेत नेहमीच बदल घडून आलेले असले तरी ब्रिटिश पूर्वकालात व ब्रिटिश राजवटीत जातीव्यवस्थेत झालेल्या परिवर्तनामध्ये एक मूलभूत फरक आहे. ब्रिटिश राजवटीपूर्वी झालेल्या परिवर्तनामुळे चातुवर्णर्याची चौकट अभंग राहिली, ती तुटली नाही पण ब्रिटिश राजवटीत मात्र भारतीय समाजात जे शैक्षणिक , सामाजिक व आर्थिक बदल होत गेले, त्यांनी चातुवर्णण्यांच्या चौकटीस खिळखिळे करुन टाकले आहे. ब्रिटीश राजवटीत झालेली स्थित्यांतरे ही जातीव्यवस्थेवर आघात करणारी स्थित्यंतरे असल्यामुळे त्यांचा संक्षिप्त विचार करणे आवश्यक वाटते.

(इ) **जातीव्यवस्थैतील स्थित्यांतरे :** ब्रिटिश राजवटीत जातीव्यंवसथेत घडून आलेल्या परिवर्तनांच्या कारणांचा विचार करणे योग्य ठरते. ब्रिटिश राजवटीत हिंदूसमाजात घडून आलेल्या स्थित्यांतराचे स्वरुप समजावून घेताना आपणास हे लक्षात घ्यावे लागेल की, ब्रिटिशांनी भारतीय समाजात जी मूलभूत क्रांती घडवून आणली तिचे मूळ ब्रिटिशांनी घडवून आणलेल्या आर्थिक स्थित्यंतरामध्ये आहे. ब्रिटिश राजवटीतच भारतात औद्योगीकरणाचा पाया घातला गेला व भारतात उद्योगधंद्याचा पाश्चात्य धर्तीवर विकास होण्यास सुरुवांत झाली. औद्योगिकरणाबरोबरच भारतातील नगरांची संख्या वाढू लागलीआणि शहरांचे मध्ययुगीन

स्वरुपही पालटू लागेल. औद्योगिकरण व नागरीकरण, बदललेली शिक्षण पद्धती व कायद्याधिष्ठित सत्ताव्यवस्था या सर्वच कारणांचा परिणामा जातीव्यवस्थेवर कशाप्रकारे होत गेला हे पुढील विवरणावरुन आपल्या लक्षात येईल.

(अ) **व्यक्तिस्वातंत्र्यवाद :** पाश्चात्य समाजाने ब्रिटिश भारतात येण्यापूर्वी अनेक मन्वंतरे बघितले. स्वातंत्र्य , सत्ता व बंधुत्व या कल्पनांची पाळेमुळे पाश्चात्य विचारसरणीत खोलवर रुजण्यास बराच कालावधी लागलेला असला तरी ब्रिटिशांच्या भारतातील आगमनापूर्वी व्यक्तिस्वातंत्र्यवाद ब्रिटनमध्ये चांगलाच जोपासला गेला होता. या व्यक्तिस्वातंत्र्या वादाचे लोण ब्रिटिश स्वातंत्र्यवाद ब्रिटनमध्ये चागलाच जोपासला गेला आहे. या व्यक्तिस्वातंत्र्या वादाचे लोण ब्रिटिशांबरोबरच भारतात आले आणि पुरोगामी विचारणीचा कानोसा आपण गिरविण्यास सुरवात केली. इंग्रजी भाषेच्या संपर्कामुळे पाश्चात्य पंडितांचे विचार एतद्देशीय सुशिक्षतांना तीव्रेतने जाणवू लागली. सुशिक्षितांना अंतर्मुख होऊन हिंदुसमाजातील दोषांचे विश्लेषण करण्याचा प्रयत्न करु लागले. समाजाने व गटाने व्यक्तिजीवनास जिथें तिथे जाचक बंधनानी जखडून टाकले आहे. हा आमच्या समाजातील एक सर्वात मोठा दोष आहे असे प्रकर्षाने वाटू लागले. त्यामुळे व्यक्तीला प्रथम समाजात तिचे वाजवी स्थान प्राप्त करुन घ्यावयास हवे तिच्यामतांना किंमत यावयास हवी , स्वताचे बरेवाईट ठरविण्याचा अधिकार तिला मिळावयास हवा असे व्यक्तिस्वातंत्र्यास पोषक विचार सुशिक्षितांमध्ये मूळ धरु लागले. व्यक्तिस्वातंत्र्याच्या चळवळीची पददलितांचा उद्धार व स्त्रीदास्यविमोचन ही मुख्य अंगे ठरली. अस्पृश्यांच्या उद्धाराचे प्रयत्न होऊ लागले. अश्याप्रकारे व्यक्तिस्वातत्र्याच्या कल्पनांमुळे प्रथमत: जातीची व्यक्तीवर असलेली पकड सैल करण्यासाठी आवश्यक वैचारिक पार्श्वभूमी तयार होण्यास सुरुवात झाली.

ब्रिटिशांनी व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचारसरणीला केवळ वैचारिकच नव्हे तर सक्रिय प्रोत्सहन दिले. राज्यकारभारात व्यक्तीच्या अधिकारांची बाजू उचलून धरण्यास त्यांनीच प्रथमतः सुरुवात केली. जमिनीच्या मालकी हक्कासंबंधी निर्णय देतांना वैयक्तिक अधिकारांचे समर्थन व वैयक्तिक अधिकार समर्थनार्थ करण्यात आलेले कायदे या सर्व गोष्टीमुळे व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचारसरणीस असणारा विरोध उत्तरोत्तर कमी झाला.

व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचारसरणी जातीव्यवस्थेस मारक ठरते, कारण जाती व्यवस्थेची उभारणी हीच मुळात गटप्राधान्याच्या कल्पनेवर झाली आहे. व्यक्तीला मिळणारी प्रतिष्ठा तिच्या कर्तृत्वाचा भाग नसून तिच्या विशिष्ट जातीत जन्म घेण्यावर अवलंबून असते, ही विचारसरणी व्यक्ती ऐवजी गटास महत्व देणारी आहे. त्यामुळेच कर्णासारख्या अनेक महापुरुषांची समाजात पदोपदी मानखंडना होत असते. सूतपुत्र, सूतपुत्र म्हणून हेटाळताच दैवायत्त कुले जन्म मदायंत्त तु पौरुषम् असे जरी कर्णाने गर्वाने म्हटले तरी त्यांच्या सारख्याच्या कर्तृत्वास वाव देणारी आहे. प्रतिष्ठीचे मोजमाप विशिष्ट गटात जन्म हे नसून व्यक्तीचे कर्तृत्व हे आहे असे मान्य केले तर त्याचबरोबर प्रतिष्ठची वितरण व्यवस्थाच बदलावी लागते. व्यक्तीने गटाच्या प्रतिष्ठेऐवजी तिने अर्जिलेली प्रतिष्ठाच आपणास हवी असे म्हटले म्हणजे प्रतिष्ठेनुसार पडणारे गट आवृत्त राहूच शकत नाहीत. त्यांना मुक्तच व्हावे लागेल. म्हणूनच व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचारसरणीचा प्रचार जातीव्यवस्थेला मारक ठरल्या ख़ेरीज राहत नाही.

**शिक्षण पद्धती :-** ब्रिटिशांनी भारतात आणलेली उदारमतवादी शिक्षणपद्धती जातीव्यवस्थेवर आघात करणारा दुसरा घटक होय. व्यक्तिस्वातंत्र्यवादाची भारतातील जोपासना शाळा-महाविद्यालयामधून झाली. शिक्षणक्रमाची आखणीच अशा प्रकारे करण्यात आली की, त्यामुळे येथील सुशिक्षितांमध्ये उदारमतवादी विचार रुजावेत व वाढावेत. विष्णुशास्त्रीनी इंग्रजी भाषेला

वाघिणीचे दूध म्हटले ते एवढ्याचसाठी की, तिच्या परिशीलनाने निर्भिडता, स्वातंत्र्यप्रियता इत्यादी गुणांची जोपासना झाली. शाळा महाविद्यालयामधून शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्यांमध्ये जातीच्या आधारावर पक्षपात न करण्याचे धोरण ब्रिटिशांनी प्रथमपासूनच स्वीकारले. शिक्षणाचे दरवाजे सर्वांना खुले केले. एवढेच नव्हे तर मागासलेल्या जातीतील व्यक्तींना शिक्षण घेण्यास प्रोत्साहित केले. त्यामुळे उच्च जातीप्रमाणे खालच्या जातीमध्येही शिक्षणप्रसार होऊ लागला व शतकानुशतके अधिकारवंचित ठेवलेल्या जाती स्वत:च्या हक्कासांठी लढा देण्यास उद्युक्त झाल्या.

खालच्या जातीमध्ये ज्याप्रमाणे शिक्षणामुळे स्वधिकारांविषयी जागरुकता व त्यासाठी लढण्याची वृत्ती निर्माण झाली त्याचप्रमाणे उच्च जातीमध्ये शिक्षणाने सामाजिक औदार्य व सहिष्णुता निर्माण झाली. शतकानुशतके खालच्या जातीतील लोकांवर समाजाने अन्याय केलेला आहे. त्यांचे परिमार्जन आपणासच करावयास पाहिजे अशी विचारसरणी उच्च जातीमध्ये मूळ धरु लागली. म्हणूनच जाती भेदांवर टीकास्त्र सोडण्यात, पददलितांच्या उद्धारार्थ प्रयत्न करण्यात उच्चजातीतील सुशिक्षित सुधारक आघाडीवर राहिले आहेत. तेव्हा शिक्षणामुळे खालच्याच्या उदग्र विकासास वरच्याकडून होणाऱ्या विरोधाची तीव्रता कमी होत गेली. याचा परिणाम जातीबंधने शिथिल होण्याकडे झाला.

ब्रिटिशांनी प्रस्थापिलेल्या राजवटीसाठी त्यांना नोकरवर्गाची आवश्यकता होती. ह्या नोकर वर्गात, विशेषत: दुय्यम पातळीवरील नौकर वर्गात येथील सुशिक्षितांचा मोठ्या प्रमाणावर भरणा करण्याता आला. ही भरती करतांना ब्रिटिशांनी जातीपातीचा विचार न केल्याने सरकारी नोकऱ्यांमध्ये सर्व जातीच्या लोकांचा भरणा झाला. साहेबांच्या राज्यात प्रतिष्ठेच्या कल्पना बदलत चालल्या होत्या व सरकारी नोकर हा नवीनच प्रतिष्ठीत वर्ग निर्माण होण्यास सुरुवात झाली होती. त्यामुळे प्रतिष्ठेच्या निर्धारणात जन्माऐवजी नोकरीधंद्यास महत्व प्राप्त होऊ लागले. सहाजिकच जन्मानुसार व्यक्तीची प्रतिष्ठा ठरविणारी जातीव्यवस्था विस्कळीत होऊ लागली.

तेव्हा शिक्षणामुळे जातीव्यवस्थेवर तीन बाजूंनी आघात झाले १) खालच्या जातीमध्ये स्वत:च्या हक्काविषयी निर्माण झालेली जागरुकता व हक्कासाठी लढा देण्याची तयारी (२) उच्च जातीमध्ये शिक्षणाने निर्माण केलेली उदारमतवादी विचारसरणी व खालच्या जातीतील लोकांच्या उद्धारासाठी प्रयत्न करण्याची तळमळ व ३) नोकरीच्या क्षेत्रात शैक्षणिक पात्रतेस देण्यात आलेले महत्व आणि त्यामुळे प्रतिष्ठेचे निर्धारण करण्यात शिक्षण या घटकाला प्राप्त झालेले महत्व या तिन्ही बाजूंनी झालेल्या हल्यांमुळे जाती व्यवस्थेचा अभेद्य कोट अजिंक्य राहिला नाही.

व्यक्तिस्वातंत्र्यवाद व पाश्चात्य शिक्षण पद्धतीमुळे जातिव्यवस्थे विरुध्द वैचारिक पार्श्वभूमी तयार झाली. जाति व्यवस्थेविरुध्द विचारसरणीस प्रत्यक्ष कृतीत उतरविण्याच्या प्रयत्नाचाही जातीबंधने शिथिल करण्यात महत्वाचा हिस्सा आहे. या प्रकारचे समाजबाह्य प्रयत्न म्हणजे विदेशीयांनी वा ब्रिटिश राज्यकर्त्यांनी केलेले प्रयत्न आहे. या प्रकारचे समाजबाह्य प्रयत्न म्हणजे विदेशीयानी वा ब्रिटिश राज्यकर्त्यांनी केलेले प्रयत्न होत असे प्रयत्न राज्यकर्त्याकडून कोणत्या बुध्दीने करण्यात आले हा प्रश्न बाजूला ठेवून आपण एवढे निश्चित म्हणू शकतो की, राज्यकर्त्यांनीच प्रयत्न सुरु केल्याने त्याचा परिणाम घडून आला. समाजांतर्गत प्रयत्न म्हणजे हिंदू समाजातील व्यक्तीनी केलेले प्रयत्न होत. या प्रयत्नामध्ये समाजसुधारकांचे कार्य महत्वाचे आहे. हिंदूसमाजावर त्यांनी उठविलेल्या टीकेच्या झोडीचा अतिरेकी भाग सोडला तर सुधारकांनी निश्चितच काही भरीव कामगिरी केली आहे. समाज सुधारकांनी हिंदू समाजातील बुरसट कल्पनाविरुध्द व सामाजिक भेदभावाविरुध्द स्विकारलेल्या चळवळीचा जोर प्रथमत: महाराष्ट्रात व बंगाल प्रांतात विशेषेकरुन जाणवू लागला. याच भागामधून पहिले सुधारका अग्रनी पुढे आले. महादेव गोविंद रानडे, गोपाळ गणेश आगरकर ,ज्योतीबा फुले वगैरे सुधारकांनी महाराष्ट्रात आघाडी उघडली. राजा राममोहनरॉय, केशव सेन, ईश्वरचंद्र विद्यासागर यांनी बंगालप्रांत पेटविला केवळ भाषेचे नव्हे तर कृतीने देखील ही मंडळी पुढे होती. सुधारकांच्या

जातिव्यवस्थेला मोडून काढण्याच्या प्रयत्नानी अनेक रुपे घेतली. आंतरजातीय विवाहाचा पुरस्कार, सहभोजनादी अनेक उपायांनी जातीबंधनाना मूठमाती देण्याचे कार्य सुधारकांनी चालविले. त्यांच्या प्रयत्नांना हिदुत्वानिष्ठाचाही भरघोस पाठिबा मिळाला. स्वातंत्र्यविर. सावरकांरानी जातिव्यवस्थेविरुध्द मांडलेले विचार सर्वश्रुतच आहेत. जाती मोडून काढल्याशिवाय हिंदुसमाज एकसंघ होऊ शकणार नाही आणि त्याशिवाय धर्मातराने गंडातर टाळता येणार नाही हे ओळखून हिंदुत्वाचा असीम अभिमान असणाऱ्यांनी हिंदुत्वाची व्याख्या बदलली आणि जातिभेद नेस्तनाबूत करण्यासाठी प्रयत्न सुरु केले. सनातनी लोकांनी हिदुत्वाची व्याख्या बदलली आणि जातिभेद नेस्तनाबूत करण्यासाठी प्रयत्न सुरु केले. सनातनी लोकांनी जरी या प्रयत्नांना तीव्र विरोध करण्याचा प्रयत्न केला तरी विवेकी धर्मपरायणांना जातिभेद निर्मुलनाची आवश्यकता पटली. अशा प्रकारे जाति व्यवस्थे विरुध्द सुधारकांनी आरंभिलेल्या प्रयत्नांना उत्तरोत्तर अधिकाधिक पाठिंबा मिळावयास सुरुवात झाली.

राजकीय, उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी जातीजातीमधील फुट मोडून एकजूट निर्माण करणे आवश्यक होते. स्वातंत्र्य प्राप्तीसाठी ब्रिटिशसत्तेविरुध्द एकजुटीने लढा देण्याची आवश्यकता होती. त्यामुळे राजकीय पुढाऱ्यांनी देखील जातिव्यवस्थे विरुद्ध एकजुटीने लढा देण्याची आवश्यकता होती. त्यामुळे राजकीय पुढाऱ्यांनी देखील जाति व्यवस्थेविरुद्धच प्रचार केला. महात्माजी तर जातिव्यवस्थेचे कट्टर विरोधक होते. महात्माजीसारख्या लोकोत्तर पुढाऱ्यांनी जातिव्यवस्थे विरुद्ध भूमिका घेतल्याने सर्वसाधारण व अशिक्षित जनतेतही जातीविरुद्ध मनोवृत्ती तयार होण्यास मदत झाली. राजकीय संग्रामात सर्व जातीच्या लोकांनी खांद्याला खांदा लावून ब्रिटिशांशी टक्कर दिल्याने जाती जाती मध्ये येणारे संबंध वाढीस लागले. एवढेच नव्हे तर संबंधामध्ये जिव्हाळा उत्पन्न झाला. अशाप्रकारे स्वातंत्र्यप्राप्ती हे सर्व जातीच्या व धर्माच्या लोकांचे ध्येय बनल्याने त्यांच्यात एकात्मता निर्माण होण्यास पोषक असे वातावरण तयार झाले.

ब्रिटिशांनी भारतात घडवून आणलेल्या भौतिक सुधारणाही जातिव्यवस्थेस मारक ठरल्या. औद्योगिकरण व नागरीकरणाची वाढ जातिव्यवस्थेस मारक ठरते. कारण उद्योगधंद्याच्या विकासाबरोबर विशिष्ट जात - विशिष्ट व्यवसाय असे समीकरण कायम राहू शकत नाही. उद्योगधंद्याच्या विकासामुळे गिरण्या कारखान्यांमधून भिन्न जातीचे लोक परस्परांच्या खांद्याला खांदा लावून काम करतांना दिसू लागले. अशा परिस्थितीत परस्परसंबधात जातीबंधनाचे पालन शक्यच नसते. नगरांच्या वृद्धीमुळे व शहरामधील नोकरीच्या सहजशक्यतेमुळे अनेक जातीचे लोक शहरात येऊन स्थायी होऊ लागले. मुंबईसारख्या शहरामधून सर्व जातीचे लोक आढळून आले तर नवल नाही. शहरे विभिन्न जातीची माहेरघरे होऊ लागल्यानंतर विभिन्न जातीमध्ये आपसात मुळीच संबंध येणार नाही हे शक्यच नव्हते, शिक्षण , शहरीकरण, नोकरीला मिळू लागलेली प्रतिष्ठा आदि विभिन्न कारणांमुळे रोटी-बेटी व्यवहारावरील कडक बंधने सैल होण्यास सुरुवात झाली. मधुन मधून आंतरजातीय विवाह होऊ लागले. स्वातंत्र्योतर काळात हा वेग अधिकच वाढला आहे.

दळवळणाची आधुनिक साधनेही जातीनियम पाळण्याच्या आड येतात. प्रवास म्हटला म्हणजे मग शिवशिवीच्या कल्पना बाजूस साराव्या लागतात. स्टेशनवर मिळेल त्यांच्या हातून पाणी प्यायची तयारी ठेवावी लागते. खाण्यापिण्याच्या बाबतीतील नियम बाजूस सारावे लागतात. यांचा परिणाम असा झाला की, जातीबंधने अनिवार्य नाहीत ही कल्पना लोकमनात रुजत गेली. सहाजिकच उत्तरोत्तर जातीनियम झुगारुन देण्याची प्रवृत्ती वाढीस लागली.

स्वातंत्र्योत्तर काळात राष्ट्रीय सरकारने जातीविरुद्ध मोहीम हे राज्यधोरणाचे एक अंग करुन टाकले. प्रचार, कायदे, मागासलेल्या जातींना शैक्षणिक सवलती, आर्थिक मदत व राखीव नोकऱ्या देऊन राष्ट्रीय सरकारने जातीविरुध्द मोहीम राज्यधोरणाचे एक अंग करुन टाकले. प्रचार, कायदे, मागासलेल्या जातींना शैक्षणिक सवलती आर्थिक मदत व राखीव नोकऱ्या देऊन

राष्ट्रीय सरकारने जातीव्यवस्था मोडून काढण्याचे प्रयत्न अहर्निशपणे चालू ठेवले आहेत. कारण जगातील प्रमुख लोकशाही राष्ट्रामध्ये भारताचा क्रमांक बराच वरचा आहे. तेव्हा लोकसत्तेचे पोवाडे गाणाऱ्या राष्ट्रात जन्माधरे व्यक्तीमध्ये विषमता करणे मान्यच असू शकत नाही. लोकशाहीची आधारभूत तत्वेच जातीव्यवस्थेच्या विरुद्ध असल्याने लोकशाही भारतात जातीव्यवस्था कायम राहू शकत नाही हे ओघानेच आले. सरकारने या संबंधात केलेल्या प्रयत्नांना बरेच यश आलेले असून मागासलेल्या जातीमध्ये शिक्षणाचे प्रमाण वाढत आहे. जितक्या प्रमाणात खालच्या जाती सुशिक्षित होत जातील तितक्या प्रमाणात जाती जातीमधील दूरत्व विलयास जाईल.

वरील सर्व कारणांमुळे जातीव्यवस्थेत अनेक स्थित्यांतरे होऊन ती मोडकळीस आलेली आहेत. पण आजही भारतातून जातीव्यवस्थेचे संपूर्ण उचाटन झालेले नाही. आम्ही भारतीय समाजातील वर्तमान स्तरीकरण व्यवस्थेंसंबधी बोलावयाचे झाल्यास एवढे म्हणुन शकतो की, आज भारतीय समाज हा वर्ग व जाती यांच्या सीमारेषेवर उभा आहे.

**जातीव्यवस्थे बाबत भारतातील सद्यःस्थिती :-**

जातीव्यवस्थेबाबत आज भारतात परिस्थिती काय आहे असा प्रश्न कोणी विचारल्यास त्यांचे उत्तर देणे वाटते तितके सोपे नाही. भारतीय राज्याच्या अधिकृत धोरणात जातीव्यवस्थेस मुळीच स्थान नाही. सरकारच्या डोळ्यात जातीव्यवस्था केव्हाच गेली आहे. शहरवासियांच्या व सुशिक्षितांच्या दृष्टीनेही जातीव्यवस्था मृतप्रायच झाली आहे. पण भारतीय समाज हा काही सरकार सुशिक्षित व शहरवासी मिळूनच बनत नाही कोट्यावधी ग्रामवासी अशिक्षितही भारतीय समाजाचे घटक आहेत. त्यांच्या दृष्टीने जर विचार केला तर जाती आजही अस्तित्वात आहेत. एवढेच नव्हे तर जातीभावना आज भारतीय राजकारणात महत्वाचा भाग खेळत आहे. पण त्याचे विवेचन करण्यापूर्वी, आम्ही भारतीय जातीव्यवस्था अनवत झाली आहे, या विधानास पुष्टी

देणाऱ्या पुराव्यांची छानणी करु इच्छीतो. अशी छानणी केल्यावरच जातीच्या सद्य:परिस्थितीची कल्पना येण्यासारखी आहे.

जातीव्यवस्था आज भारतात टिकून आहे की नाही याचे विवेचन आपण खालील घटकांच्या आधारे करण्याचा प्रयत्न करणार आहोत. जातीव्यवस्थेचे अस्तित्व खालील पाच बाबींवर अवलंबून आहे. (१) जन्मानुसार प्रतिष्ठेचे निर्धारण, (२) व्यवसाय - निवडीवर प्रतिबंध (३) रोटीबेटी व्यवहार - बंदी (४) सामाजिक, राजकीय व धार्मिक अधिकारांबाबत जातीजातीमध्ये केला जाणारा पक्षपात व ५) ब्राह्मणजातीचे सर्वश्रेष्ठत्व ह्या त्या पाच बाबी होत. त्यांच्या समाजातील अस्तित्वामधून जातीच्या जीवंतपणाची कल्पना येण्यासारखी आहे. म्हणूनच या पाच बाबींच्या आधारे जाती व्यवस्थेच्या अस्तित्वाची चर्चा आता आपण करु या. जातीव्यवस्थेच्या अध्ययन कर्त्यांच्या मते जाती व्यवस्थेचे निर्मूलन झालेले आहे. व्यक्ती कोणत्या जातीत जन्माला येते यावर तिची प्रतिष्ठा आज अवलंबून नाही. व्यवसाय निवडीचे स्वातंत्र्य घटनेने प्रत्येकास बहाल केले आहे. रोटी-बेटी व्यवहारावरील निर्बंध पूर्णपणे नष्ट झाले तरी विजातीय विवाह कपिलाषष्ठीचे व योग राहिले नाहीत. ब्राह्मणाचे सामाजिक श्रेष्ठत्व यांच्याकडून केव्हाच हिसकावून घेण्यात आलेले आहे. या सर्व गोष्टीवरुन असा निष्कर्ष काढावयास हरकत नाही की, जातीव्यवस्था नष्टप्राय झालेली आहे.

जन्मावर व्यक्तीची सामाजिक प्रतिष्ठा अवलंबून असणे जातीव्यवस्थेचे एक ठळक लक्षण मानले जाते. वर्तमानकालीन भारतीय समाजाचा विचार केल्यास याबाबतीत सामाजिक कल्पना निश्चितच बदलल्या आहेत. जन्माऐवजी कर्तृत्व हाच प्रतिष्ठेचा मापदंड असावयास पाहिजे हे सर्व साधारणत: मान्य केले जाऊ लागले आहे. शिक्षण व पैसा ह्या घटकांना प्रतिष्ठेच्या निर्धारणात महत्व प्राप्त झालेले आहे. सर्वश्रेष्ठ मानल्या गेलेल्या ब्राह्मण जातीकडून समाजाचे धुरीणत्व काढुन घेण्यात आले आहे.

## १.८ सामाजिक गतिशीलता [८]:-

Mobility या शब्दांचा अर्थ एखाद्या स्थानातील सापेक्ष बदल भौतिक असेल किंवा सामाजिक आपल्या परिचित भाषेत सांगायचे झाल्यास एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणे, एका स्थितीतून दुसऱ्या स्थितीत जाणे गतिशीलता होय या गतिशीलतेला भौगोलिक, आर्थिक, सामाजिक असे अनेक सदंर्भ आहेत. येथे आपल्याला गतिशीलतेचा विचार हा मुख्यत: सामाजिक स्तरीकरणाच्या संदर्भात करायचा आहे. म्हणून आपल्याला सामाजिक गतिशीलता म्हणजे काय ते समजावून घेतले पाहिजे यासाठी सामाजिक गतिशीलतेच्या काही व्यांख्याचा विचार करणे क्रमप्राप्त ठरते.

**व्याख्या –**

१.. हॅार्टन आणि हंट : एका सामाजिक स्थितीतून दुसऱ्या सामाजिक स्थितीत जाण्याची कृती म्हणजे सामाजिक गतिशीलता होय.

२. पीटर रोझ इ. एका स्तरातून दुसऱ्या स्तरात जाणे म्हणजे गतिशीलता होय.

३. टिश्लर, व्हाइटन इ. स्तरीकरण व्यवस्थें अतर्गत व्यक्ती किंवा समूहाचा समाजातील दर्जा बदलण्याची स्थिती म्हणजे सामाजिक गतिशीलता होय.

४. ड्रेलसर, विलिस व्यक्तीची समाजाच्या एका स्तरातून दुसऱ्या स्तरात जाण्याची स्थिती म्हणजे सामाजिक गतिशीलता.

वरील व्याख्यांच्या वरुन आपल्या असे लक्षात येते की, गतिशीलतेमध्ये एका स्थितीतून दुसऱ्या स्थितीत जाणे अपेक्षित आहे . येथे स्थिती हा शब्द Position किंवा Status ला पर्यायी शब्द म्हणून योजला आहे. सामाजिक गतिशीलतेचे प्रमाण सर्व प्रकारच्या समाजा मध्ये सारखे असत नाही. येथे प्रामुख्याने दोन समाजाचा विचार करायचा आहे. खुल्या समाजामध्ये

Open Society एखाद्या व्यक्तीचे जन्मठिकाण, तो पुरुष आहे की स्त्री, गोरा की काळा, हिंदू की ख्रिश्चन प्रतिष्ठित घराण्याची पार्श्वभूमी आहे का म्हणजे थोडक्यात वंश, धर्म, लिंग, कौटुंबिक पार्श्वभूमी इ. न पाहता त्यांला स्वत:चा दर्जा उंचावण्याची समान संधी असते. अशा समाजात एखादा लारेहार हॉटेलचा मालक होऊ शकतो. या उलट बंदिस्त समाजामध्ये एखाद्या व्यक्तीचा जन्म कोणत्या स्तरात / जातीत / झाला आहे हा घटक त्यांचे एकूणच जीवन नियंत्रित करण्यामध्ये महत्वाचा ठरतो आणि अखेरपर्यत तो तसाच राहतो.

वास्तविक पाहता कोणताही समाज शुद्ध स्वरुपात पूर्णपणे खुला अगर बंदिस्त असत नाही, उदा. भारतामध्ये जातीव्यवस्था आहे. जात जन्माने ठरते आणि अखेरपर्यत तीच राहते. बदलता येत नाही हे जरी खरे असले तरी भारतीय समाजात गतिशीलता नाही असे कसे म्हणता येईल ? अमेरिकेत काळे आणि गोरे आहेत.तेथे काळे किंवा कृष्णवर्णीय सुध्दा आपापल्या सामाजिक दर्जात बदल करण्यासाठी झगडत नाहीत का ? उदा. भारतात प्रत्येक जात उपजातीमध्ये विभागली आहे. सामाजिक दृष्ट्या कनिष्ठ मानलेले जातीचे समूह आर्थिक बळावर उच्च, घरंदाज, उच्चजातीशी विवाह संबंध जोडून समाजामध्ये आपले सामाजिक स्थान उंचावण्याचा प्रयत्न करतांना दिसतात. थोडक्यात एखाद्याने आपला घाणेरडा व्यवसाय टाकून नविन व्यवसाय स्वीकारला, किंवा दुसऱ्या स्तरातील कुटूंबाशी विवाह संबंध केला आपले गाव सोडून दुसऱ्या गावा शहराला गेला तरी सामाजिक गतिशीलता घडून येते. अर्थात या गतिशीलतेचे स्वरुप प्रमाण सर्वत्र सारखे नसते. गतिशीलतेच्या प्रकारा आधारे आपल्याला हा मुद्दा आणखी स्पष्ट करता येतो.

## १.९. सामाजिक गतिशीलतेचे प्रकार :-

वास्तविक पाहता व्यक्तीगत जीवनाशी निगडित असे कितीतरी घटक उदा. शिक्षण आर्थिक दर्जा, व्यवसाय, सत्ता , सांस्कृतिक घटक आहेत की या प्रत्येक घटकाबाबत व्यक्ती जागृत असते आणि त्या- त्या बाबतीत आहे त्या स्थितीतून अपेक्षित स्थितीत जाण्यासाठी व्यक्ती समूह प्रयत्नशील असतात. उदा. एखाद्या जुन्या वळणाच्या गावामध्ये राहणारे एखादे कुटूंब मोठ्या शहराकडे स्थलांतरीत होते. याला भौगोलिक गतिशीलता म्हणायचे का ? नागपूरच्या जिल्हा पोलीस अधिक्षकांची बदली औरंगाबादला त्याच पदावर झाली तर ही व्यक्ती गतीशिलता ? परळी वैजनाथ येथील हवालदारांची बदली प्रमोशनवर अंबाजोगाई येथे फौजदार म्हणून बदली झाली तर ती भौगोलिक उर्ध्वगामी गतिशिलता म्हणायची का? एखाद्या भंग्याने आपला व्यवसाय सोडून एखादे दुकान थाटले तर त्याला व्यावसायिक गतिशीलता म्हणायची का ? हे प्रकार परस्परव्याप्ती आहेत. तसेच अगदी काटेकोरपणे ते शुद्ध म्हणजे जसेच्या तसे आहेत असे म्हणता येणार नाही. त्यासाठी आपण सामाजिक गतिशिलतेचे प्रकार पाहण्याआधी एक _ômñ[1>H$ `m. Mobility म्हणजे गतिशीलता या गतिशीलतेचे भौगोलिक गतिशीलता, समाजिक गतिशीतला, व्यक्तीगत गतिशीलता, सामूहिक गतिशीलता, व्यावसायिक गतिशलता असे प्रकार आहेत. तथापी, या सर्व प्रकारामध्ये एक समान सूत्र आहे. त्या आधारे सामाजिक गतिशीलतेचे मुख्य दोन प्रकार व त्या अनुषंगाने इतर प्रकारांचा विचार करणे आवश्यक ठरतो.

१) समांतर सामाजिक गतिशीलता.

२) स्तंभीय सामाजिक गतिशीलता

पहिल्या प्रकारामध्ये समांतर हा शब्द असे भौगोलिक अर्थाने योजला आहे. यालाच क्षितिजासमांतर किंवा समल असेही शब्दप्रयोग योजले जातात. जेव्हा एखादी व्यक्ती किंवा समूह

सध्य आहे त्याच सामाजिक स्थितीतून तसल्याच दुसऱ्या सामाजिक स्थितीमध्ये जाते तेव्हा त्याला समांतर सामाजिक गतिशीलता म्हणतात. येथे त्यांच्या सामाजिक पातळी मध्ये बदल होत नाही.

ड्रेसलर सारखे समाजशास्त्रज्ञ या प्रकाराच्या गतिशीलतेमध्ये व्यवसायाला महत्व देतात. ते म्हणतात जेव्हा एखाद्याच्या दर्जामध्ये बदल न होता फक्त व्यवसायातच बदल होतो तेव्हा समांतर सामाजिक गतिशीलता अस्तित्वात येते. हाच प्रकार टिश्लर, व्हाइटन इ. दर्जा आणि सामाजिक वर्गाच्या संदर्भात स्पष्ट करता. ते म्हणतात. अशी कृती की जेव्हा एखाद्याच्या दर्जामध्ये बदल होतो पण त्या अनुषंगाने त्यांच्या सामाजिक वर्गात बदल होत नाही. तेव्हा समांतर सामाजिक गतिशीलता असे म्हणतात.

समांतर सामाजिक गतिशीलतेची कितीतरी उदाहरणे आपणास ठाऊक आहेत. उदा. वकिली करणारे, गृहस्थ वकिली व्यवसाय सोडून लॉ कॉलेजमध्ये प्राध्यापक म्हणून काम करु लागतात. कॉलेजमध्ये शिकविणारे प्राध्यापक प्राध्यापकी सोडून पूर्णवेळ क्लासेस घेऊ लागतात किंवा चार्टर्ड अकाऊंटट म्हणून काम करु लागतात. एखदा कापड दुकान बंद करुन तयार कपड्याचे दुकान उघडतो.

या उदाहरणांमध्ये आपणास असे दिसते की या सर्वाची सामाजिक पातळी एक समान राहिली आहे. फक्त त्यांच्या दर्जामध्ये बदल झाला आहे . हा बदल करण्यापूर्वी ही मंडळी उच्चमध्यमवर्गीय होती. बदल केल्यानंतरही ती उच्च मध्यमवर्गीयच राहिली. अशाप्रकारे कार्यक्षेत्रामध्ये बदल झाल्याने व्यक्तीची प्रतिष्ठा, सत्ता किंवा संपत्तीमध्ये बदल होतोच असे नाही झाला तर फारच थोडा बदल होता.

पण समाजामध्ये ज्या प्रमाणे समांतर सामाजिक बदल ( म्हणजे गतिशीलता ) घडून येत असतात त्याचप्रमाणे समाजामध्ये स्तरीय सामाजिक स्थित्यांतरे किंवा बदल पण होत

असतात. सयमांतर समाजिक गतिशीलतेमध्ये व्यक्ती / समूहाचा दर्जाच तेवढा बदलतो, सामाजिक वर्ग तोच राहतो. त्यांच्या संपत्ती प्रतिष्ठा इ. मध्ये पण ( फार ) बदल होत नाही. पण एरवी समाजामध्ये अशी स्थित्यांतरे होत असतात की ज्यामुळे व्यक्ति / समुहाचा दर्जा तर बदलतोच पण त्याचबरोबर त्यांचा वर्गही बदलतो. त्यांची संपत्ती, प्रतिष्ठो मध्ये पण कमी जास्त बदल होतो अशा प्रकारच्या गतिशीलतेचा सामाजिक स्तरीकरणामध्ये विचार करणे अपिरहार्य ठरते. आता आपण सामाजिक गतिशीलतेचा दुसरा प्रकार पुढील प्रमाणे आढळून येतो.

**स्तंभीय सामाजिक गतिशीतला :**

सामाजिक स्तरीकरणामध्ये वेगवेगळे स्तर असतात. हे स्तर सारखे असत नाहीत तर ते श्रेष्ठ कनिष्ठ असतात. त्यांच्यात विषमता असते. प्रत्येक स्तराला सामाजिक जीवनात मिळणारी संधी समान नसते. तसेच प्रतिष्ठा , संपत्ती, सत्ताही समान नसते. सहाजिकच खुल्या समाज व्यवस्थेमध्ये व्यक्ती समूह आपली बुद्धिमत्ता , गुणवत्ता, पात्रता, इ. चे आधारे स्वत:चा सामाजिक सतर उंचावण्याचा प्रयत्न करतात. हे एक सामाजिक स्तरातून दुसऱ्या सामाजिक स्तरात जाणे चित्रबद्ध केले तर ते एका उभ्या रेषेप्रमाणे किंवा स्तंभाप्रमाणे दिसते म्हणून याला स्तंभीय गतिशीलता म्हणतात.

जेव्हा सामाजिक श्रेणी मध्ये वर किंवा खाली असा बदल होतो परिणामात: सामाजिक वर्गात बदल होतो तेव्हा स्तंभीय गतिशीलता अस्तित्वात येते असे टिश्लर, व्हाइटन इ. म्हणतात.

ब्रूम आणि सेल्झनिक म्हणतात व्यक्ती किंवा समूहाच्या दर्जामध्ये पूर्णत: सापेक्षत: होणारा कोणताही श्रेष्ठ किंवा कनिष्ठ बदल म्हणजे स्तंभीय गतिशीलता होय.

**स्तंभीय गतिशीलतेचे पुन: दोन प्रकार पडतात.**

१) उर्ध्वगामी गतिशीलता आणि

२) अधोगामी गतिशीलता

उर्ध्वगामी म्हणजे वर जाणारी भारतीय समाजा मध्ये जातीना एक परंपरागत व्यवसाय होता. काही व्यवसाय असे होते की, ज्यांना कमी प्रतिष्ठा होती. आपल्याला जास्त प्रतिष्ठा मिळावी, आपला सामाजिक स्तर उंचवावा म्हणून भंग्याने टेलरचा व्यवसाय सुरु केला किंवा एखादा हवालदार फौजदार झाला, एखादा शिपाई लेखनिक झाला तर ही उर्ध्वगामी सामाजिक गतिशीलता म्हणता येईल. डॅा. एम.एन श्रीनिवास यांनी सांगितलेल्या संस्कृती करणाच्या प्रक्रियेमध्ये पण कनिष्ठ जाती उच्च जातीच्या जीवनपद्धतीचे अनुकरण करतात हा उर्ध्वगामी गतिशीलतेचाच प्रयत्न होय. ही गतिशीलता एका व्यक्तिच्या नव्हे तर संपूर्ण समूहाच्या पातळीवर घडत असते. या उलट आणखी एक प्रकारे स्तंभीय गतिशीलता स्पष्ट करता येते ती म्हणजे अधोगामी गतिशीलता . अधोगामी म्हणजे खाली जाणारी. या प्रकारामध्ये व्यक्ती किंवा समूह स्वत: अशा प्रकारे वर्तन करता की, त्यांना पदच्यूत व्हावे लागते. उदा. भ्रष्ट आचरण किवा तत्सम कारणामुळे एखाद्याला पदच्यूत व्हावे लागते किंवा आहे त्यापेक्षा कमी दर्जाच्या स्थानावर येणे भाग पडते. कर्जाची परतफेड न केल्याने अनावस्था प्रसंग ओढवतो, आपल्यापेक्षा कमी दर्जाच्या कुटुंबाशी विवाहसंबंध जोडल्यामुळे जाती बहिषकृत व्हावे लागते. एखाद्याला सक्तीची निवृत्ती घ्यायला लागणे वगैरे उदाहरणे अधोगामी गतिशीलता स्पष्ट करतात. हॅरी जॅान्सनने या संदर्भात मांडलेला मुद्दा विचारार्ह आहे अधोगामी गतिशीलता पण समाजाने स्वीकारलेलीच असते. शिपायाचा लेखनिक झाला म्हणून त्याचा सत्कार करतील, अभिनंदन करतील, पण उलटे झाले तरी समाज त्यांला मान्यता देतो. स्वीकारतो कारण सामाजिक मूल्यांचे झालेले उल्लंघन समाज खपवून घेत नाही. त्याबद्दल संबंधिताला शिक्षा मिळाली हे योग्यच झाले अशी समाजाची धारणा असते. सामाजिक गतिशीलतेचे प्रमाण किती आहे हे त्या त्या समाजावर अवंलबून असते. अमेरिकेमध्ये सामान्यातला सामान्य माणूससुध्दा राष्ट्राध्यक्ष होऊ शकतो. हॅाटेल वेटर उद्योगपती होऊ शकतो वगैरे हा गतिशीलतेचा दर किंवा प्रमाण किती आहे हे समाजशास्त्रज्ञ दोन प्रकारे ठरवितात.

**आंतरपिढी गतिशीलता :**

म्हणजे दोन पिढ्यामधील गतिशीलता की ज्यामध्ये एका पिढीचा सामाजिक दर्जा दुसऱ्या पिढीमध्ये बदललेपा असतो. उदा . वडील शेतकरी होते पण त्यांचा मुलगा इंजिनिअर झाला. येथे एका पिढीचा सामाजिक दर्जा दुसऱ्या पिढीत बदलला आहे.

**पिढी अंतर्गत गतिशीलता :-**

यालाच Carrer Mobility असे पण म्हणतात, उदा. एक साधा पोलिस शिपाई म्हणून भरती झालेला तरुण स्वकर्तृत्वावर पोलीस अधिक्षक, पोलीस, महानिरीक्षक होतो. या उदाहरणामध्ये उर्ध्वगामी ( करिअर) कर्तृत्व गतिशीलता आहे असे म्हणता येईल.

## १.१० सामाजिक गतिशीलतेवर परिणाम करणारे घटक :-

आतापर्यंत आपण सामाजिक गतिशीलतेचे विविध प्रकार पाहिले, ही गतिशीलता समाजातील अनेक घटकांनी नियंत्रित झालेली असते. समाजातील किती तरी घटक सामाजिक गतिशीलतेला चालना देतात किंवा या गतिशीलतेमध्ये बाधा उत्पन्न करतात. सामाजिक गतिशीलतेवर परिणाम करणाऱ्या या घटकांचा आपल्याला आता विचार करायचा आहे. गेल्या दोन-तीन दशकांमध्ये सामाजिक गतिशीलतेवर परिणाम करणाऱ्या धटकांचा समाजशास्त्रज्ञांनी अभ्यास केला त्यामध्ये सामान्यत: खालील घटकांचा अंतर्भाव होतो.

**१) सामाजिक परिवर्तनाचा उच्च दर :**

जलद गतीने होणाऱ्या सामाजिक परिवर्तनाचा परिणाम सामाजिक गतिशीलतेवर होतो. इतिहासातील धर्मयुद्धे, वेगवेगळ्या क्रांत्या, हेच दर्शवितात. अठराव्या शतकात इंग्लडमध्ये झालेली औद्योगिक क्रांती विज्ञान, तंत्रज्ञानामध्ये लागलेले शोध, दळववळणाच्या साधनांतील वाढीमुळे अंतर्गत व बहिर्गत व्यापार वाढला, उद्योगधंद्यामुळे रोजगार वाढला, नगरे शहरे वाढली,

ग्राम नगर स्थलांतर वाढले, भारतीय समाजाच्या बाबतीतही आपल्याला बदलती सामाजिव मूल्ये, पारपारिक संयुक्त कुटुंबाचे विघटन, शिक्षण प्रसार इ. चे संदर्भात सामाजिक गतिशीलते विश्लेषण करता येईल.

## २) संप्रेषणातील अडथळे :-

वेगवेगळया सामजिक समूहांमध्ये दळणवळणाचा अभाव असणे किंवा अल्प संप्रेष असल्याने सामाजिक गतिशीलता सीमित होते. सामाजिक , सांस्कृतिक, आर्थिक,भौगोलिव इ. कारणांमुळे विविध सामाजिक समूहातील भेदरेषा आणखी स्पष्ट होऊन त्या त्या सामाजिव समूहातील वर्गातील ताठरता दृढ होते. परस्परांशी देवाणघेवाणीचा, संपर्काचा किंवा आंतरक्रियांच अभाव यामुळे या वर्गातील किंवा समहातील सामाजिक , भौगोलिक अंतर तसेच राहते, परिणाम त्यांच्यांत गतिशीलतेवर मर्यादा येतात. उदा. आजही भारताच्या जंगली प्रदेशातून विखुरले आदिवासी या आदिवासींना मुख्य प्रवाहात सामावून घेण्याबाबत बोलले जाते. चंद्रपूर , गडचिरोल जिल्हयाच्या जंगली भागात राहणारा आदिवासी - माडिया गोंड आजही प्राथमिक अवस्थे जीवन जगतो आहे. आजही कित्येक वाडया वस्त्यांना जोडणारे रस्तेच नाहीत रस्ते नाही म्हणून वाहतुकीच्या साधनांची सोय नाही. परिणामी डोंगरातील आदिवासी डोंगरात राहिला

सुमारे तीस-चाळीस वर्षापूर्वी महाराष्ट्रातील खेडीपाडी व शहरे यांच्यात एक प्रकारच अलिप्तपणा होता. शेतकरी, यांचा परंपरागत शेती व्यवसाय, अलुते-बलुतेदार , साधी राहर्ण प्राथमिक शाळा आणि आठवडा बाजार एवढेच मर्यादित जीवन होते. विवाहसंबंधसुद्धा बहुध पंचक्रोशीतच होत असते. रस्ते , वाहतूकीची, दळणवळणाची साधने फारच मर्यादित होर्त परिणामी सामाजिक गतिशीलता पण फारच मर्यादित होती.गेल्या दोन दशकापासून मा खेड्यातला तरुण महाविद्यालयीन , शिक्षण रोजगार इ साठी शहराकडे जावू लागला, रस्त

वाहतुकीची साधने, दळणवळणाच्या सोयी इ लक्षणीय वाढ झाली, त्यामुळे खेडी आणि शहरे यातील भौगोलिक अंतर कमी झालेच पण त्याचबरोबर पारंपरिक शेतकरी कुटूंबातील आधुनिक पिढी शिक्षण, व्यवसाय, रोजगार इ क्षेत्राकडे आकृष्ट झाली, त्यांनी शहरी मूल्ये, आकांक्षा, पोषाख,, भाषा, किंवा थोडक्यात नागरी जीवनपद्धतीचा अंगिकार केला परिणामी सामाजिक गतिशीलता वाढली, आज पश्चिम महाराष्ट्रातील खेडी ही समृध्द , संपन्न दिसत आहेत. तेथील पारंपारिक शेतकरी हा पारंपारिक राहिला नसून तो आधुनिक बागायतदार, निर्यातदार होऊ लागला आहे. याचाच अर्थ त्यांच्या दर्जामध्ये बदल झाला आहे. विवाह संबधाचे क्षेत्रही विस्तारु झालेले दिसते. खेड्यापाडयातील मुले-मुली उच्चशिक्षणासाठी मोठमोठ्या शहरात राहत आहेत हे गतिशीलता वाढल्याचेच दर्शविते.

### ३) औद्योगीकरण :

औद्योगिकीकरण हा सामाजिक गतिशीलतेवर परिणाम करणारा आणखी एक महत्वपूर्ण घटक होय, उद्योगधंद्याच्या केंद्रिकरणामुळे रोजगार, व्यापाराच्या संधीमुळे मोठ्या प्रमाणात औद्योगिक शहराकडे खेड्यापाडयातील लोकांचे स्थलांतर होते. या स्थलांतरामुळे भौगोलिक गतिशीलतेला चालना मिळते, मुंबई मध्ये भारताच्या सर्व काना कोपऱ्यातून किती तरी लोक कामा धंद्यांच्या निमित्ताने स्थलांतरित झाले आहेत. उद्योगधंद्याची निर्मिती त्यावर अवलंबून असणाऱ्या इतर छोट्या मोठ्या उद्योगांची , व्यापार - व्यवसायाची निर्मिती व त्यात सतत असणारी माणसांची मागणी इ. मुळे गतिशीलतेला वाव मिळतो.

विसाव्या शतकातील सांस्कृतिक आणि वैज्ञनिक विकासाचा अभ्यास करणाऱ्या विचारवंतानी असे स्पष्ट केले आहे की, जगात जेथे - जेथे औद्योगिकरण झाले तेथे-तेथे व्यवसायांच्या संरचनेमध्ये आमूलाग्र परिवर्तन झाले. या परिवर्तनातून आणखी इतर परिवर्तनांना चालना मिळाली. अकुशल कामगारांचे कुशल कामगार होतात. तर अभियंते, व्यवस्थापक,

तंत्रज्ञ, विक्रेते इ. नवीन स्थाने निर्माण होतात. कनिष्ठ स्थानांवर काम करणाऱ्यांना वरिष्ठ स्थानांवर काम करण्याची संधी मिळणे त्यामुळे शक्य झाले. स्वयंचलित यंत्रे, संगणकाचा वाढता उपयोग इ. मुळे ही कामगारांच्या स्थानामध्ये, दर्जामध्ये बदल होत आहे. नवीन तंत्रज्ञानामुळे परंपरागत व्यवसाय बदलू लागले. उदा खेड्यातील बलुतेदारांचे परंपरागत व्यवसाय आज मोठ्या प्रमाणावर यंत्रावर केले जात आहेत. परिणामी खेड्यातील परंपरागत बलुतेदारांनी आपल्या पिढीजात व्यवसायांचा त्याग करुन नवीन व्यवसाय स्वीकारले . काहीनी आपल्या पंरपरागत व्यवसायांना आधुनिक तंत्रज्ञानाची जोड देऊन आपला दर्जा उंचावला. एकुणच नविन उद्योगधंद्यामुळे विशेषत: आधुनिक व्यवस्थापकीय कौशल्ये, विक्रय कला, कुशल तंत्रज्ञ, संगणक , प्रशासक, आणि पांढरपेशी कामगार White Coller Workers इ. चा प्रभाव अकुशल कामगार, लघु उद्योजक, व्यावसायिक इ. वर पडला.

**४) नागरीकरण :**

ग्रामीण समाजाच्या तुलनेत नागरी समाजामध्ये सामाजिक गतिशीलतेला खूपच वाव असतो हे स्पष्टच आहे. औद्योगीकरण आणि नागरीकरण या दोन प्रक्रिया हातात हात घालून वाटचाल करीत असतात असे म्हटले जाते. पुणे, मुंबईसारख्या शहरात लोकसंख्या दाट, मोठी, सामाजिक विविधता असेलली आणि मुख्यत: दुय्यम संबंधाचे प्राबल्य असलेली असते. याचा परिणाम म्हणजे नागरी समाज हा अनेक सामाजिक वर्गात विभागलेला असतो. परिणामी सामाजिक विभेदनही मोठ्या प्रमाणावर असते. अशा समाजामध्ये एखाद्याचे घराणे, धर्म, जात , भाषा याही पेक्षा त्यांची शैक्षणिक पात्रता, गुणवत्ता, कौशल्ये, मुख्य म्हणजे एखाद्या पदासाठी त्यांची अनुरुपता विचारात घेतली जाते याचा अर्थ मिळालेल्या दर्जापेक्षा मिळवाव्या लागणाऱ्या दर्जाची संधी आणि उपलब्धता जास्त असते आणि त्यालाच महत्व असते. ग्रामीण समाजात उच्च जातीच्या लोकांनी कनिष्ठ जातीचा व्यवसाय करणे प्रशस्त मानले जाणार नाही पण नागरी

समाजामध्ये जात - पात न पाहता व्यापार व्यवसाय केला जातो आणि त्याला समाजाची मान्यता मिळते. उदा. कोणत्याही जातीची स्त्री आज शिवणकाम करते, ब्यूटी पार्लर चालविते. थोडक्यात नागरी समाजातील नविन मूल्ये, आचार विचार, प्रथा, राहणी इ. चा स्वीकार करुन समायोजन साधण्याचा प्रयत्न केला जातो. नागरीकरणाचाही सामाजिक गतिशीलतेवर प्रभाव पडतो.

## ५) सामाजिक तत्वज्ञान :

समाजामध्ये भेदाभेद नसावा, स्पृश्यास्पृश्यता नसावी, सर्वांना समान लेखले जावे. मानववनिर्मित गोष्टीच्या आधारे माणसावर अन्याय होऊ नये प्रत्येकाला एक माणूस म्हणून जगण्याचा हक्क आहे. आपले समाजातील स्थान उंचावण्याचा, हवा तो व्यवसाय करण्याचा, हवे तेथे राहण्याचा, आर्थिक उन्नती करण्याचा हक्क आहे. त्यांसाठी प्रत्येकाला समान संधी मिळायला हवी. या सारख्या विचारांचा प्रसार आपल्याकडे साधु-संत, समाज सुधारकांनी केला. विशेषत: दलित चळवळीने या विचाराचा पाठपुरावा केला. याचा परिणाम म्हणजे एकूणच दलितांमध्ये विशेषत: त्यांच्या व्यवसायामध्ये गतिशीलतेला चालना मिळाल्याचे किती तरी समाजशास्त्रीय अभ्यासकांनी आपल्या संशोधनातून दाखवून दिले आहे. स्त्री मुक्तिविषयी तत्वज्ञानाने स्त्रियांच्या प्रश्नांना वाचा फोडण्याचे काम केले आहे. सुमारे तीन दशकापूर्वीच्या स्त्रीची तुलना आजच्या स्त्रीशी केलीत तर आजची स्त्री ही शिक्षण, व्यापार, व्यवसाय तसेच सामाजिक, सांस्कृतिक क्षेत्रात आत्मनिर्भर होत असल्याचे दिसते. पूर्वी उंबऱ्याच्या आत चूल आणि मुलांत गुंतून पडलेली स्त्री सर्व क्षेत्रात कृतिशील झालेली आहे. आज ती गतिशील होत आहे. यामध्ये स्त्री मुक्तिविषयक सामाजिक तत्वज्ञानाचा प्रभाव नाही असे कसे म्हणता येईल.

६)	**शिक्षण प्रसार :**

ज्या समाजामध्ये बहुप्रसृत व्यापक शिक्षण व्यवस्था आहे अशा समाजामध्ये मुक्त किंवा खुल्या सामाजिक स्तरीकरणाला खूपच वाव असतो. या उलट ज्या समाजामध्ये अश्याप्रकारे शिक्षण व्यवस्था नाही तेथे कमी वाव असतो. स्वातंत्र्यपूर्व काळामध्ये भारतात शिक्षणाचा प्रचार काही मोजक्याच शहरामध्ये आणि तोही उच्च जातीयांपुरता मर्यादित होता . याचा परिणाम म्हणजे शिक्षणाबाबत विशेषत: स्त्री शिक्षणाबाबत अनास्था होती. शिक्षणांचा संबंध एकूणच सामाजिक परिवर्तन आणि विकासाशी असल्याने त्या काळात सामाजिक गतिशीलतेवर खूपच मर्यादा होत्या. स्वातंत्र्योत्तर काळामध्ये उच्चशिक्षण खेड्यापाड्यापर्यंत पोहचले. नविन उच्चशिक्षितांची एक पिढी तयार होऊ लागली. शिखणामुळे समृध्द सामाजिक जीवन जगण्याची एक दृष्टी मिळाल्याने गतिशीलता वाढली. खेड्यापाड्यातील तरुण शहरांकडे विविध शिक्षण, रोजगार संधीच्या शोधात स्थालांतरित होत आहेत. तर अर्ध-कुशल कामगार, कारागीर इ. आखाती देशात जात आहेत. शहरातील उच्चशिक्षित, बुद्धिमान परदेशात जात आहेत. थोडक्यात शिक्षणाचा गतिशीलतेवर परिणाम होतो हे आपल्या लक्षात येईल.

७)	**कौटुंबिक स्थिती :-**

कौटुंबिक स्थिती हा एक सामाजिक गतिशीलतेवर परिणाम करणारा महत्वपूर्ण घटक होय. एखाद्या कुटुंबाचा सामाजिक आर्थिक दर्जा हा त्या कुटुंबातील सदस्यांच्या किंवा एकूणच कुटुंबाच्या गयतिशीलतेवर परिणाम करतो. ज्या कुटुंबाचा शैक्षणिक स्तर उच्च आहे अशा कुटुंबात मुलांबरोबर मुलीनाही उच्च शिक्षण घेण्याची, करिअर करण्याची संधी मिळते. आर्थिकदृष्ट्या संपन्न असलेल्या कुटुंबातील मुलांला सामान्य कुटुंबातील मुलापेक्षा वैद्यकीय शिक्षण घेण्याची संधी अर्थातच जास्त राहील. राजकीय सत्तेत सहभागी होण्याचीही संधी, त्यांनाच जास्त असू शकते. येथे व्यक्तीचे शिक्षण, अंगभूत गुण, पात्रता याही पेक्षा पैसा हाच घटक महत्वपूर्ण ठरतो.

## ८) नाते संबंध :

उच्च कौटुंबिक तसेच नातेसंबंध हा घटकही गतिशीलतेच्या संदर्भात महत्वाचा ठरतो. घरदार जमीन घराणे, प्रतिष्ठा इ. बाबतीत समान असणाऱ्या म्हणजे समतुल्य कुटूंबियाशीच विवाह संबंध जोडण्याकडे सर्वसाधारण कल असतो. आज आपणास उद्योगधंदे सहकारी कारखाने, सहकारी बँक, नाटयचित्र, व्यवसाय अशा कोणत्याही क्षेत्रात असे दिसते की एखादा साखर कारखान्याचा चेअरमन आहे, त्यांचा भाचा बँकेचा संचालक आहे, आणखी कुणीतरी राजकीय पदाधिकारी आहे. अंतर्विवाही पद्धतीमुळे अशा कुटूंबियांच्यातच विवाहसंबंध होतात,. नविन नातेसंबंध निर्माण होतात. या नातेसंबधाचा फायदा / तोटा एखाद्याच्या गतिशीलतेवर परिणाम करतो. एखाद्याला पात्रता नसतांना पद मिळते, दुसऱ्याला बढती मिळते तर हेतूत: एखाद्याचे खच्चीकरणही केले जाते, याचा परिणाम म्हणजे आज भारतीय समाजामध्ये काही विशिष्ट क्षेत्रे ही विशिष्ट घराणी, वर्गापुरतीच, वर्षानुवर्षे मर्यादित राहिली आहेत. इतर वर्गातील किंवा स्तरातील व्यक्ती अशा लाभांपासून वंचितच राहिलेल्या दिसतात.

## ९) जाति – व्यवस्था:

सामाजिक गतिशीलतेचा विचार भारतीय समाजाचे संदर्भात करतांना जाति व्यवस्थेशिवाय अपूर्णच राहील. जात हा बंद स्तरीकरणाचा प्रकार आहे हे आपण पाहिलेच. जातीचा एक पारंपरिक व्यवसाय असतो आणि तोच व्यवसाय पिढ्यानपिढया करावा लागत होता. ही पिढीतर्गत व्यावसायिक गतिशीलता म्हणता येईल. पण एकूणच शिक्षणप्रसार अस्मितेची जाणीव, सामाजिक दर्जा उंचावण्याची आकंक्षा इ. मुळे काही कनिष्ठ जातीनी आपल्या परंपरागत व्यवसायाचा, विचार सरणीचा, राहणीमान, प्रथांचा त्याग केला. उच्च जातीची विचारसरणी, आचार विचार इ.चे अनुकरण करायला सुरुवात केली. जेथे जातीतील एखाद्या कुटुंबाची नव्हें तर संपूर्ण जातीचीच गतिशीलता वरच्या दिशेने सरकते. जातीच्या निकषावर मिळणारे आरंक्षण व इतर सवलतीचाही गतिशीलतेवर परिणाम

होतो हेही येथे लक्षात घेतले पाहिजे, अंतर्विवाहाचा नियम अजूनही ताठर आहे. त्यामूळे अनुलोप विवाह समाजमान्य असला तरी प्रतिलोम विवाह समाजमान्य असला तरी प्रतिलोम विवाह सर्वमान्य नाही. उलट स्वसमूहश्रेष्ठतावादाच्या प्रभावामुळे आजही जातीअंतर्गत विवाह करणे हेच प्रतिष्ठेचे मानले जाते.

येथे सामाजिक गतिशीलतेवर परिणाम करणाऱ्या घटकांचा विचार हा एकत्रितपणे केला. आहे. वास्तविक पाहता उर्ध्वगामी गतिशीलतेस चालना देणारे घटक, विरोध करणारे घटक असा विचार स्वतंत्रपणे करणे इष्ट वाटत नाही. सामाजिक घटक हे एकमेकात इतके गुंतून गेलेले असतात की त्यांच्यातील भेदरेषा स्पष्ट करणे कठीण होते.

कोणतेही समाज खऱ्या अर्थाने सपाट असत नाही. सत्ता, संपत्ती, प्रतिष्ठा यांच्या विषम वाटणीतून असमानता निर्माण होते. म्हणूनच उच्च व कनिष्ठ जातींनी आपल्या परंपरागत व्यवसायाचा, विचारसरणीचा , राहणीमान प्रथांचा त्याग केला. उच्च जातीची विचारसरणी, आचार विचार, इ. चे अनुकरण करायला सुरुवांत केली. येथे जातीतील एखाद्या कुटुंबाची नव्हे तर संपूर्ण जातीचीच गतिशीलता वरच्या दिशेने सरकते. जातीच्या निकषावर मिळणारे आरक्षण व इतर सवलतीचाही गतिशीलतेवर परिणाम होतो हेही येथे लक्षात घेतले पाहिजे. अंतर्विवाहाचा नियम अजूनही ताठर आहे. त्यामूळे अनुलोप विवाह समाजमान्य असला तरी प्रतिलोम विवाह सर्वमान्य नाही. उलट स्व समूह श्रेष्ठतावादाच्या प्रभावामूळे आजही जाती अंतर्गत विवाह करणे हेच प्रतिष्ठेचे मानले जाते. येथे सामाजिक गतिशीलतेवर परिणाम करणाऱ्या घटकांचा विचार हा एकत्रितपणे केला आहे. वास्तविक पाहता उर्ध्वगामी गतिशीलतेस चालना देणारे घटक, विरोध करणारे घटक असा विचार स्वतंत्रपणे करणे इष्ट वाटत नाही. सामाजिक घटक हे एकमेकात इतके गुंतून गेलेले असतात की त्यांच्यातील भेदरेषा स्पष्ट करणे कठीण होते. कोणताही समाज खऱ्या अर्थाने सपाट असत नाही, सत्ता, संपत्ती, प्रतिष्ठा यांच्या विषम वाटणीतून असमानता निर्माण होते. म्हणूनच उच्च व कनिष्ठ अशा सामाजिक

एककात झालेल्या समाजाच्या विभागणीस स्तरीकरण म्हणतात. स्तरीकरण ही मूळात भूगर्भशास्त्रीय संकल्पना आहे. संपत्ती, सत्ता, प्रतिष्ठा, इ. सामाजिक स्तरीकरणाच्या परिमिती आहेत. बंद किंवा आवृत्त आणि मुक्त किंवा खुले स्तरीकरण असे सामाजिकरणाचे दोन प्रकार आहेत. बंद सतरीकरणामध्ये जातीचा समावेश होतो. तर वर्ग हे खुल्या स्तरीकरणाचे वैशिष्टय आहे. जातीचे खंडात्मक विभाजन, खानपान व सामाजिक व्यवहारांवर निर्बंध, सामाजिक व धार्मिक अपात्रता इ. जातीची वैशिष्टये आहेत. वर्ग म्हणजे समुदायाचा असा कोणताही भाग की जो सामाजिक दर्जामुळे इतरापेक्षा वेगळा उठून दिसतो. समान स्थान असणाऱ्यांचा मिळून सामाजिक वर्ग बनतो. घराण्याची प्रतिष्ठा व्यवसाय, संपत्ती, सत्ता, फुरसत, शैक्षणिक गुणवत्ता इ. वर्गाचे निकष आहेत. तथापी विविध फरकांच्या आधारे वर्गाची निश्चिती करणे कठीण आहे. एका समाजिक स्थितीतून दुसऱ्या सामाजिक स्थितीत जाणे म्हणजे गतिशीलता होय. ही गतिशीलता समांतर आणि स्तंभीय या दोन प्रकारची असते उर्ध्वगामी आणि अधोगामी असेही गतिशीलतेचे दोन प्रकार पडतात.

## १.११ अध्ययनाची उद्दिष्टये :-

"अमरावती जिल्हयातील कुणबी ( मराठा ) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाज शास्त्रीय अध्ययन " या संशोधनाची उद्दिष्टये पुढील प्रमाणे होती.

१) पिढ्यान पिढ्या ( वरच्या पिढ्यांच्या तुलनेत खालच्या पिढ्यामध्ये कोणता फरक पडला हा फरक खालच्या पिढीना विकासाच्या वरच्या पायऱ्यांवर नेतो आहे काय ?

२) ही पिढ्यामधील विकासाची प्रक्रिया विशेषकरुन कोणत्या क्षेत्रामध्यें दिसून येते

१) सामाजिक दर्जा (२) शिक्षणाची पातळी (३) व्यवसायाची प्रतिष्ठा (४) आर्थिक उत्पन्न इत्यादी.

३) पूर्वि मराठा समाजाने जी वेगवेगळ्या क्षेत्रात उन्नती केलेली आहे. उदा. आर्थिक, राजकीय, शैक्षणीक आणि तंत्रज्ञानाचा उपयोग तीचा आढावा घेणे.

४) या समाजा मध्ये तौलणीक दृष्टया जुन्या पीढीमुळे नव्या पिढीला काही अडचणी आल्या आहेत काय ? उदा. परंपरावाद, जुन्यापीढीचे अजान नव्यापिढीची अवास्तविक आशा, आकांक्षा.

५) या विकास प्रक्रियेत जुन्या पिढीकडून मुख्यत्वे कोणते महत्व मिळते आहे (१) मार्गदर्शन, २) द्रव्य ३) परंपरागत शहाणपना

६) नविपीढी आपल्या विकासासाठी कुणास जास्त महत्व देते . साक्षर जुनी पिढी ग्रामीण शेजारी

७) त्यांच्या मता प्रमाणे जुन्या पिढीचे योगदान महत्वाचे आहे की, गौण महत्वाचे असेल तर कश्या प्रकारे गौण असेल तर त्यांच्या मते असे का?

८) या विकास प्रक्रियेत कुणबी मराठा नविन पिढीने कितपत उदग्रगतिशीलता प्राप्त केलेली आहे या प्रक्रिये मध्ये नवीन पिढींच्या मते स्तंभीय गतिशीलता जास्त की समस्तरीय गतिशीलता गाठलेली आहे.

९) त्यांची कारणे त्यांच दृष्टीने काय आहेत?

१०) या गतिशीलतेमुळे त्यांच्या आशा, आकांशा बळावल्य आहे काय ? म्हणजे त्यांची पूर्विची आशा व आकांक्षा कितपत वाढवल्या.

११) वरच्या सामाजिक व आर्थिक पातळीवर जाण्याच्या प्रकीयेत नव्या पिढीला सांस्कृतिकरणाचा किती हातभार लागला हे पाहणे.

१२) आजच्या आशा, आकांक्षाचे स्वरुप काय ?

१.१२ गृहित कृत्य :

वैज्ञानिक पद्धतीने कोणत्याही विषयाचा अभ्यास करावयाचा असल्यास अभ्यासकाला प्रथम त्या विषयासंबंधी काहीतरी पूर्वज्ञान असावे लागते अथवा अनुभव असावा लागतो. ह्या प्रारंभिक ज्ञानाच्या आधारे अभ्यासक आपल्या विषयासंबंधी कोणतेतरी सामान्य अनुमान अथवा सिद्धांत बांधतो हे अनुमान पुढल्या संशोधनासाठी मार्गदर्शक ठरते. तो आपले लक्ष विवक्षित व आवश्यक तथ्यावर केंद्रित करतो व आपल्या संशोधनाची दिशा ठरवितो. उदा. वाढती लोकसंख्या व औद्योगिकरण हे दारिद्रयाचे कारण होय, असे अनुमान मनाशी ठरविल्यानंतरच सहाजिकच संशोधक आपले लक्ष वाढती लोकसंख्या व औद्योगिकीकरण ह्याकडे वळवतो. त्यासंबंधीपुरावे गोळा करतो व अभ्यासाच्या शेवटच्या चरणात आपले पूर्व अनुमान खरे आहे अथवा नाही याचा निष्कर्ष काढतो. म्हणजे ह्या कामचलावू पूर्वानुमानाला गृहीतकृत्य अथवा उपकल्पना म्हणतात.

ह्यावरुन हे लक्षात येईल की उपकल्पनेची निर्मिती हे संशोधनाचे अंतिम लक्ष नव्हे किंवा उपकल्पना सिद्ध करण्यासाठीच अध्ययन करावयाचे नसते. सत्य कोणते हे संशोधनाचे अंतिम लक्ष्य आहे. सत्य हे वास्तविक तथ्यांच्या आधारे गवसू शकते, उपकल्पनेच्या आधारावर नव्हे. उपकल्पना ही मुख्य विषयांवर अथवा समस्येवर लक्ष्य केंद्रित करण्यास, अभ्यासाची दिशा ठरविण्यास सहाय्यक ठरते. संशोधक एका निश्चित दिशेने शोध घेऊ लागतो मग ती उपकल्पना सत्य ठरो अथवा असत्य ठरो. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे वास्तविक पुराव्यांच्या आधारावर उपकल्पना खरी आहे की खोटी हे ठरविणे म्हणजेच वैज्ञानिक संशोधन होय, केवळ उपकल्पना निर्माण करणे नव्हे. ह्या विवेचनावरुन लक्षात येईल की, उपकल्पना म्हणजे ज्यांच्या आधारावर संशोधन करावयाचे असते असे कार्यवाहक ( कामचलावू ) अनुमान होय.

१) पी.बी. यंग यांच्या मते, उपकल्पना म्हणजे ज्यांच्या आधारे संशोधन कार्य करता येते असा कार्यवाहक ( कामचलावू ) विचार म्हणजे उपकल्पना होय.

२) गुड आणि हॅटस गृहीत कृत्य अथवा उपकल्पना म्हणजे असे अनुमान की, जे तथ्य निरीक्षणावर आधारलेले असून ज्यामुळे भावी संशोधन कार्याला चालना मिळते.

३) लुण्डबर्ग ह्यांच्या ममते गृहीत कृत्य म्हणजे ज्या विधानाची सत्यता पारखून घ्यावयाची आहे असे विधान अथवा समान्यीकरण . मूल्यत उपकल्पना हा एक काल्पनिक अथवा अनुमानात्मक विचार असू शकतो जो विचार पुढल्या संशोधनाचा आधार बनतो.

४) बेबस्टरचा शब्दकोष ह्या शब्दकोषान्वये उपकल्पना म्हणजे गृहीत कृत्य म्हणजे गृहीत धरलेले विधान, तत्व अथवा अट होय

ह्या व्याख्यावरुन हे लक्षात येते की, गृहीत कृत्य अथवा उपकल्पना प्रांरभिक अथवा प्राथमिक स्वरुपाची कल्पना किंवा विचार आहे. हा प्राथमिक विचार अथवा विधान सामाजिक तथ्ये आणि घटना ह्यांचा कार्यकारणभावात्मकशोध घेण्यास प्रेरणा देते, त्यासंबंधी ज्ञान प्राप्त करुन घेण्यास उद्युक्त करतो ही प्रांरभीक उपकल्पना संशोधनाच्या अंतिम चरणात बदलू शकते. म्हणूनच उपकल्पना अथवा गृहीत कृत्याला कामचलावू उपकल्पना किंवा कार्यवाहक उपकल्पना असे ही म्हणतात. उपकल्पनेमुळे संशोधनास ध्येय प्राप्त होते व संशोधनास दिशा प्रदान करते.[९]

वरिल व्याख्याच्या अनुषंगाने प्रस्तूत संशोधना करिता पुढील प्रमाणे गृहितकृत्य धरण्यात आली होती.

१) नव्या पिढीला जुनी पिढी वरच्या पायरीवर नेत आहे.

२) वाढीव उत्पन्नाला नवी पिढी जास्त महत्व देते आणि आर्थिक उन्नती होत आहे. म्हणजेच दर डोई उत्पन्न वाढीत आहे. अशी त्यांची भावना आहे.

३) कुणबी मराठा समाजाने नवीन ज्ञान उच्चस्तरीय शिक्षण आणि तंत्रज्ञानाचा उपयोग इ. क्षेत्रामध्ये प्रयत्न केलेले आहेत.

४) जुन्या पिढीची भाग्यवादी वृत्ती आणि नवसमाज निर्मिती करीता असणाऱ्या अभिलाषा व प्रयत्नांच्या बाबतीत जुन्या पिढीमध्ये उदासिनता आहे. ज्यामूळे नव्या पिढीस वरच्या पायऱ्या गाठण्याची प्रेरणा मिळत नाही.

५) पारंपारीक अज्ञानामूळे नव्या पिढीला योग्य मार्गदर्शन व प्रोत्साहन मिळत नाही.

तसेच पुढील प्रकरण २ रे संबधीत साहित्याचा आढावा यामध्ये, "अमरावती जिल्हयातील कुणबी ( मराठा ) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाजशास्त्रीय अध्ययन " या संशोधनाच्या अनुषंगाने संशोधनाची प्रत्यक्ष व अप्रत्यक्षरित्या संबंधीत असलेल्या प्रकाशित व अप्रकाशित साहित्याचा आढावा सविस्तरपणे घेण्यात आलेला आहे.

***

# संदर्भ

[1]कोलारकर, श.गो., ''मराठ्यांचा इतिहास ', प्रकाशक – श्री मंगेश प्रकाशन, नागपूर, पाचवी आवृत्ती २००३, पृष्ठ क्रमांक १ ते ६

[2]कोलारकर, श.गो, 'मराठ्यांचा इतिहास ', प्रकाशक – श्री मंगेश प्रकाशन, नागपूर, पाचवी आवृत्ती २००३, पृष्ठ क्रमांक ९ ते १३

[3]पवार जयसिंगराव, 'मराठी सत्तेचा उदय ', प्रकाशक – निराली प्रकाशन पुणे, द्वितीय आवृती २००१, पृष्ठ क्रमांक १ –३

[4]पवार जयसिंगराव, 'मराठी सत्तेचा उदय', प्रकाशक – निराली प्रकाशन पुणे, द्वितीय आवृती २००१, पृष्ठ क्रमांक ६ ते ११

[5]पवार जयसिंगराव, 'मराठी सत्तेचा उदय', प्रकाशक – निराली प्रकाशन पुणे, द्वितीय आवृती २००१, पृष्ठ क्रमांक ३० ते ३७

[6]कुळकर्णी पी.के., 'सामान्य समाजशास्त्र', प्रकाशक – श्री मंगेश प्रकाशन नागपूर, प्रथम आवृत्ती २०००, पृष्ठ क्र. ४७२ ते ४७४.

[7]भांडारकर पु.ल., 'समाजशास्त्रीय सिद्धांत', प्रकाशक – महाराष्ट्र विद्यापीठ, ग्रंथ निर्मिती मंडळ , नागपूर, द्वितीय आवृत्ती १९८६, पृष्ठ क्रमांक २४० ते२४७

[८]माने मानीक, 'समाजशास्त्रीय संकल्पना ', प्रकाशन – विद्या प्रकाशन नागपूर , प्रथम आवृत्ती १९८६, पृष्ठ क्रमांक २६१ ते २७०.

[९]घाटोळे रा.ना., 'समाजशास्त्रीय संशोधन –तत्वे व पद्धती ', प्रकाशक – श्री मंगेश प्रकाशन, नागपूर, सातवी आवृत्ती २०००, पृष्ठ क्रमांक ४० ते ४१.

******

# प्रकरण २ रे

# संबंधीत साहित्याचा आढावा

## २.१ प्रास्ताविक:-

कोणत्याही प्रकारचे अध्ययन किंवा संशोधन करत असतांना निवड करण्यात आलेल्या संशोधन क्षेत्राशी तसेच संशोधन विषयाशी संबंधीत साहित्याचे वाचन आणि मनन करणे हा अध्ययन प्रक्रियेतील एक महत्वपूर्ण भाग असतो या अनुषंगाने, ''अमरावती जिल्हयातील कुणबी (मराठा) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाजशास्त्रीय अध्ययन, या संशोधन विषयाशी प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष रित्या संबंधीत सहित्याचा आढाव घेण्यात आलेला असून तो पुढील प्रमाणे.

## २.२ साहित्याचा आढावा -

### १) कर्वे इरावती[१](१९७५) -

डॉ. इरावती कर्वे यांनी आपल्या ''हिंदू समाज एक अन्वयार्थ'' या पुस्तकाव्दारे आपल्या विविध प्रकारणांव्दारे जाती संस्थे बद्दल सविस्तर विवेचन केलेले दिसून येते. या पुस्तकातील प्रकरणे पुढील प्रमाणे आहेत.

१) आचारांतील विविधता

२) जात ह्या समूहाची वैशिष्टये

३) जात संस्थेचा ऐतिहासिक आढावा

४) भारतीय समाजाच्या काही यंत्रणा

५) जातीयुक्त समाजाच्या काही यंत्रणा

६) जाती बद्दलच्याउपत्तीचे काही निष्कर्ष

७)　जातीयुक्त समाज आणि आधुनिक प्रश्न –

वरिल सर्व प्रकरणाव्दारे जाती संस्थेचे सविस्तर विवेचन करण्यात आले असून सदर पुस्तकाच्या प्रकरण ५ जातीयुक्त समाजाच्या काही यंत्रणा या प्रकरणात त्याच्या मते लक्षात ठेवणे जरूर आहे की, मध्यवर्ती सत्तेखाली संघटित झालेले पाश्चात्य समाज राजकीय व परकीय आक्रमणांना बऱ्याच सहज रीतीने बळी पडले व त्यांची अंतर्गत रचना मोठ्या प्रमाणात बदलली गेली. ह्याच्या उलट, हिंदू समाज दोन हजार वर्षाच्या वर बाहेरून येणाऱ्या राजकीय आणि धार्मिक आक्रमणांना तोंड देऊन आजही टिकाला आहे. त्याच्या शिथिल रचनेमुळे हे असे टिकून राहणे त्याला शक्य झाले. त्याचे दौर्बल्य हीच त्याची शक्ती ठरली. युरोपच्या इतिहासात अशी उदाहरणे आहेत की राजाने अथवा राणीने धर्मातर केले की सबंध देश वा समाजच धर्मातर करीत असे.असा प्रकार भारतात कधीच घडला नाही. अगदी प्राचीन काळापासून राजकीय सत्ता धार्मिक कार्यापासून सर्वस्वी वेगळी केलेली होती. बौध्द धर्मीय अशोक राजाला आपल्या राज्यातील बहूसंख्य प्रजाजनांना आपल्ये धर्मात आणता आले नाही. इतर धर्मपंथांना मान्यता व संरक्षण देणे त्याला भाग पडले.

हिंदू समाजावर एकत्रित असा हल्ला करतातच येत नव्हता. एखाद्या भागाचे धर्मातंर झाले तर तो मूळ समाजापासून अलग होई आणि ठरलेला समाज आपल्या पूर्वीच्या पध्दतीने आपला जीवनक्रम पूढे चालवीत राहील. समाजात घट्ट बांधलेली एकी असेल तर आक्रमकांविरूध्द चीड व संताप येईल. आपल्या बांधवांच्या मदतीला जाणे हे प्रत्येकाचेच कर्तव्य ठरेल. पण हीच गोष्ट हिंदू समाजाच्या शिथिल बांधणीमुळे घडत नसे. याला पुष्कळदा सहिष्णुता म्हटले जाते; पण खरोखर समाजाच्या एका अंगाला दुसऱ्याच्या भवितव्याबद्दल वाटाणाऱ्या औदासीन्यचेच ते दुसरे नाव आहे. पण हिंदू समाजाचे त्यामुळे संरक्षण होई. त्याचा एक भाग तुटला तरी त्याचा उरलेल्या समाजाला विशेष धक्का पोहचत नसे. अशा शिथिल समाजाला जिकांयला एक हल्ला पुरत नाही. त्याचे जितके सुटे भाग असतात तितके हल्ले करावे लागतात. आणि हिंदू समाजाचे हे भाग म्हणजे शेवटी असंख्य जाती व कित्येक वेळात एकेका जातीतील अनेक कुळे ही होत. अशा समाजाच्या अंतररचनेची

एखाद्या कृमीच्या शरीररचनेशी तुलना करून पाहता येईल या कृमीच्या शरिरातील निरनिराळे खंड एकमेकापासून बरेच स्वंतत्र असतात. एखादा खंड कापुन टाकला तरी कृमी मरत नाही, तर तसाच पुढे जगतो. एखादा कृमी मारावयाचा असेल तर त्याच्या शरिरातील पुष्कळसे खंड मारावे लागतात. अशा प्रकारच्या समाजातील बदल हाही त्याच्या रचनेशी व स्वभावाशी अनुरूप असाच असतो. काही बाबतीत बदल झाला तरी बाकीच्या बाबतीत समाज पूर्वी सारखाच राहीलेला असतो. सामाजिक परिर्वनाबद्दलचा हिंदू समाजाचा दृष्टिकोण ही इतर समाजापेक्षा वेगळा आहे. ब्राम्हण गोमांस खात होते ही गोष्ट वेदांतील संदर्भावरून स्पष्टच आहे. पण गेली हजार वर्षे ही प्रथा त्यांनी सोडून दिली आहे. अस्पृशा खेरीज जवळजवळ सर्व हिंदूना गोमांस भक्षण वर्ज्य झाले. युरोपीय लोकांशी संबंध आल्यानंतर सबंध जातींनी नाही पण सगळ्या जातीतील काही व्यक्तींनी हा परंपरागत निषेध धुडकावून दिला आहे. वेद हे जरी हिंदूचे अजूनही पवित्र ग्रंथ राहिलेले असले तरी धार्मिक पूजा व विधी आणि देवसुध्दा वेदिक कालापासुन बदलत आले आहेत. बदल हा नेहमी आंशिक असे, समाजाच्या ज्या थरात तो सुरू झाला त्याच्या बाहेरच्या थरात तो फारच सावकाश प्रसार पावे आणि सबंध समाजाला त्याने क्वचितच व्यापले. ह्यामुळे संशोधकांना हिंदू समाज उपरिवर्तनीय व स्थिर आहे असे वाटते. हिंदू समाजाने निश्चित निवड करून एक गोष्ट टाकली व दुसरी एक स्विकारली असे एका चमत्कारीक सापेक्षतावादामुळे कधी घडले नाही. ह्यामुळे एखाद्या वस्तुसंग्रहाल्याप्रमाणे हिंदूंच्या नव्याजुन्याचे असे काही मिश्रण आढळते की परकीय निरीक्षक गोंधळून जातो. इतिहासाच्या प्रत्येक टप्प्यात काही काही बदल घडून आले, पण भारतातील समाजाची घटनाच अशी होती की पाश्चिमात्य समाजातील बदलापेक्षा त्याची प्रतिक्रिया येथे अगदी वेगळीच झाली.हे बदल कसे झाले थोडक्यात विवेचन सामाजिक दळणवळणासंबंधीचा विचार करताना वर केलेच आहे.

सारांश रूपाने सांगायचे तर

१) जात म्हणजे नातेवाईकांचा (सग्यासोयऱ्यांचा ) विस्तारित गट असून तो एका विशिष्ट प्रदेशावर पसरलेला असतो.

२) तो एखाद्या आदिम जमातीसारखा स्वयंपूर्ण नसतो कारण बहुधा तो एकच व्यवसाय करतो.

३) ही उणीव दूर करण्याकरीता निरनिराळे व्यवसाय करणाऱ्या निरनिराळ्या जाती गावामध्ये एकत्र राहतात व एकमेकीबद्दलीची त्यांची कर्तव्ये,बंधने व हक्क ह्यांनी त्या एकमेकीशी बांधलेल्या असतता.

४) जातींची एक उच्चनीच अशी श्रेणी असते, पण वरच्या स्थानावर जाण्याकरता धडपड करण्याची काही विशिष्ट जातींना थोडीबहुत जागा असते.

५) जातीयुक्त समाजात बाहेरून नव्या जातीचा समावेश होऊ शकतो, पण तिची जागा व प्रवेशाचा काल हा बहुतांशी अनिश्तिच राहतो.

६) जातींचा परस्परांशी होणारा व्यवहार हा अगदी वरवरचा असतो आणि प्रत्येक जातीला आपले पारंपारीक आचार कोणते हे ठरविण्याचा व ते पाळण्याचा अधिकार व स्वांतत्र्य असते.

७) हिंदू समाजाची सर्वसंग्राहक वृत्ती स्पष्ट होते. हा समाज पूर्वी केव्हातरी एक असलेल्या गटाच्या एकसारख्या होणाऱ्या विभाजनामुळे उत्पन्न झालेला नसून निरनिराळे लहानलहान भाग शिथिलपणे एकत्र येऊन बनलेला आहे.

८) ऐतिहासिक दृष्ट्या असे म्हणता येईल की समाजरचेनेची ही चौकट अथवा नमुना आर्य लोक भारतात येण्यापूर्वीपासून अस्तित्वात होती आणि आर्यांनी ती चौकट उचलली आणि कायम केली.

९) निरनिराळे समूह एकत्र येऊन अगदी सैल अशा संबंधानी एक समाज बनण्याची ही क्रिया जेव्हा कोणताच समूह इतरांवर सत्ता गाजवण्याइतका बलवान नव्हता अशा काळी झालेली असावी.हे समूह म्हणजे आदिम जमाती असाव्या आणि त्यांनी आपापली वैशिष्टये कायमे राखली असावी.

१०) हा समाज मूळच्याच स्वरूपात दीर्घकाळ अस्तित्वात राहिला ह्याची कारणे म्हणजे (अ) नवीन नवीन गट सामावून घेण्याइतका लवचिक-पणा , आणि (आ) राजकीयअस्थिर पणाच्या व परकी सत्तेच्या कालात ह्या समाजामुळे त्यातील गटांना म्हणजे जातींना संरक्षण मिळू शकले.

११) ह्या समाजात अगदी प्रारंभीच्या कालापासून विकसित झालेले तात्विक विचार हे जरी वस्तुनिश्चत होते तरी त्या समाजाच्या रचनेचे पूर्णपणे समर्थन करता येईल अशा स्वरूपाचे होते.

१२) ह्या समाजाने ज्या एका आदर्श रचनेचे तात्विक चित्र उभे केले त्याशिवाय जातीजातीतील परस्परव्यवहारांचा जो नमुना प्रत्यक्षात आणला त्यामुळे अंतर्गत फाटा फूट व बाहेरचे हल्ले ह्या दोहोंचा प्रतिकार झाला. हिंदू समाजावर सर्वात मोठा आघात झाला तो आधुनिक काळात म्हणजे ब्रिटिश राजवटीत जसे.

(अ) ब्रिटिशांनी इतिहासात प्रथम सर्व भारत एक सत्तेखाली आणला;

(आ) स्वातंत्र्यानंतर या देशाने लोकशाही राज्यघटना स्वीकारली , आणि

(इ) आधुनिक यांत्रिक आणि तांत्रिक ज्ञान स्वीकारण्याची धडपड चालू झाली. या गोष्टींचे खोल परिणाम झाले.

२)  काळदाते सुधा [२](१९७६) -

डॉ. सौ सुधा काळदाते यांनी आपल्या भारतीय समाज रचना या पुस्तकात हिंदूच्या जीवन विषयी दृष्टीकोना बाबत सविस्तर विवेचन केलेले असून त्यांच्या मते, हिंदूचा जीवनविषयक दृष्टिकोण समाजवून घेण्यासाठी हिंदू धर्मातील प्रसिद्ध धर्मग्रंथाचा आधार घ्यावा लागतो. हिंदूचे प्रसिद्ध धर्मग्रंथ वेद मानले जातात. वृगवेदातील श्लोकांमधून विविध प्रकारचे मार्गदर्शन व्यक्तीला मिळत असे, असे म्हणता येईल. वादळ , पाऊस, वीज, प्रकाश इत्यादी नैसर्गिक घटनांची निर्मिती ही विविध देवतांमार्फत होत असते आणि या घटनांचे नियंत्रणही देवता करीत असतात. ज्या ज्या ऋतूमध्ये ज्या ज्या घटनांचे महत्व असते त्यात त्या देवतांना महत्व दिले जात असे. निरनिराळे देव ही एकच देवीची रुपे असून विविध ऋतूमध्ये विविध परमेश्वरी अवतार होत असतात. वेदकालीन वृषीनी आपल्या विचारांच्या सोयीनुसार देवांना महत्व दिले. देवाचे जणू काही दूत यादृष्टीने संत जरी सामान्य जनासारखे आयुष्य जगत असत. तरी सामान्य जनांना संताचे पुज्य प्राप्त व्हावे यादृष्टीने कसे जगता येईल याचे मार्गदर्शन करीत असत. माणसाचे या पृथ्वीवरील आयुष्य शंभर वर्षे आहे असे गृहीत धरले तर मृत्यूनंतर शरीर हे नाशवंत आहे असे माननू ते झटकून टाकले जाते व आत्मा हा शरीरापासून स्वतंत्र यसा होतो व अंतराळात विलीन होतो. आत्मा यमाचे निवासस्थान शोधीत असतो कारण यमाचे निवासस्थान हे अतिशय सुंदर असून तेथे पोहचले तर मोक्षप्राप्ती होते असे मानले जाते. मोक्ष मिळविणे हेच जीवनाचे ध्येय असल्याचे सर्व हिंदूनी मानले आणि मोक्षप्राप्तीसाठीच जीवन जगायचे चांगले सत्प्रवृत्त जीवन जगायचे असा आदर्श हिंदूधर्माने जनमानसाला घालून दिला. पापी माणसांना पूर्नजन्म मिळालाच तर या जन्मात पूर्वजन्मी केलेल्या पापाबद्दल प्रायश्चितत्य मिळत राहील. पुण्यवान माणसांनाच मोक्षप्राप्ती मिळेल धर्माने नेमून दिलेले काम व भूमिका धर्माला मान्य अशा मार्गाने पार पाडत राहणे हेच सतवृत्त माणसांच्या जीवनाचे ध्येय असावे अशी हिदुधर्मीयांची अपेक्षा असे . ऋगवेदांमध्ये मांडलेली मोक्षाची कल्पना पुढे अर्थवेदांमध्ये पुरुष

वा प्रजापती या कल्पनेत समाावलेली दितसे. देव जसा एक आहे, परमेश्वर जसा एकच अंतिम शक्ती आहे तशीच पुरुष वा प्रजापती ही देखील एक शक्ती आहे. पुरुष हा इंद्रालाही शक्ती देतो, तो तेहतीस कोटी देवाहून श्रेष्ठ आहे आणि त्यांच्यापासूनच विश्वाची नर्मिती होते. या अद्वैतवादातून पुढे ( एक देवांच्या ) उपनिषदांच्या काळात द्वैतवांदाची ( बहुविध देवांची ) कल्पनापुढे आली. एक देववादाची संकल्पना धार्मिक आहे, अद्वैतवादाची आध्यात्मिक आहे. प्रजापती हा श्रेष्ठ मानल्यानंतर त्यांच्याशी विलीन होण्याची कल्पना मांडली गेली व याच कल्पनेतून यज्ञाच्या सुरुवात झाली. प्रजापतीला खूष करण्यासाठी यज्ञ करावा व यज्ञामध्ये खाण्यापिण्याच्या वस्तू, सोनेनाणे, क्वचित नवजात बालके इत्यादी गोष्ओची आहुती द्यावी अशा स्वरुपाचे विधी सांगितले गेले. यज्ञाचे प्रमाण इतके वाढत गेले की, यज्ञाची तयारी व विधी योग्य प्रकारे व्हावेत यासाठी ते विधी माहित असलेल्यांची आवश्यकता निर्माण झाली. यज्ञ व्यवस्थित पार पडला नाही, त्यांतील विधीमध्ये चुका झाल्या तर यजमानाच्या हातून पाप घडेल असे मानले गेल्यामुळे पुरोहितां मार्फत व धार्मिक गुरुमार्फतच यज्ञत्याग करण्यास सुरुवात झाली. पुरोहितामार्फत व धार्मिक गुरुमार्फतच यज्ञयोग करण्यास सुरुवात झाली. पुरोहितांचा वर्ग निर्माण झाला. धार्मिक कर्तव्ये यथायोग्यरीतीने पार पाडून घेण्याची जबाबदारी पुरोहितांवर येऊन पडली. ज्यांनी ज्यांनी यज्ञत्याग केले व ज्यांची आर्थिक भरभराट झाली अशांची यादी व त्यांनी यज्ञामध्ये अर्पण केलेल्या वस्तूंची व पदार्थाची यादी पुरोहितांनी इतरांना मार्गदर्शन म्हणून सांगण्यास सुरुवात केली. यज्ञ केल्यामूळे पाऊस पडतो. पीक चांगले येते, भरभराट होते, मानमरातब मिळतो इत्यादी बाबीवर सामान्य गृहस्थ विश्वास ठेवू लागेल. यज्ञ करणे, अग्नीला पवित्र मानने , चांगल्या गोष्टी अग्नीसमवेत करणे इत्यादी व्यवहार रुढ होऊ लागले. कौटुंबिक व्यवहारांना धार्मिक संमती मिळाली आणि त्या व्यवहारांचा संबंध इहलोकीच्या जीवनाशीच नव्हे तर स्वर्गलोकाशी जोडण्यात आला. आणि माणसांच्या सुखदु:खांच्या कल्पना या त्यांच्या मृत्यू नंतरच्या जीवनाची कल्पना मान्य करुन त्या कल्पनेशी जोडण्यात आल्या. पूर्नजन्माचे तत्व आणि यज्ञाचे

तत्व ही दोन तत्वे हिंदूच्या जीवनविषयक दृष्टिकोणाचा मूलभूत आधार होऊन बसली होती हे ध्यानात येते. केवळ यज्ञ करुन मात्र मोक्षप्राप्ती मिळणार नाही. यज्ञ हा नावेप्रमाणे हेलकावे खात जात असतो. यज्ञाची बोट माणसाला कधीकधी रसातळालाही नेल्याशिवाय राहणार नाही. यज्ञ हेच सर्वसर्व मानून ते करुन मोकळे झाले म्हणजे सर्व काही चांगले प्राप्त होईलच अशी खात्री देता येत नाही. खराखूरा यज्ञ प्राणाचीच आहुती अपेक्षित असतो. घोडा वा अन्य भौतिक वस्तूंची नव्हे. याचा अर्थच असा की, यज्ञ हे एक साधन म्हणून सांगितलेले होते. साध्याप्रत पोचण्यासाठी यज्ञाप्रमाणेच पुण्यशील, कर्मनिष्ठ आणि श्रद्धाळू वागणूक ही खरी अपेक्षित होती. पाश्चात्य माणूस ज्यावेळी प्राण पणाला लावून नवीन यंत्रांचा व तंत्राचा शोध लावीत होता व नवीन यंत्रामधून नवनवीन वस्तू बनवीत होता त्यावेळी तो एकप्रकारचा यज्ञच करीत होता असे म्हणता येईल. त्यांच्या प्रयत्नांमधून त्यांला समृध्दी प्राप्त झाली व या भूमीवरील सुखसोयी त्याने अनुभवविल्या. हिंदू माणसांच्या यज्ञाची सांगता मात्र केवळ या जगातील सुखसोयी मिळवून संपणार नव्हती तर त्यांला मृत्यूपलीकडील आयुष्यातही सुख मिळवायचे होते आणि म्हणून आजूनही त्यांला या जगातल्या सुखाइतकेच मृत्यूपलीकडील जगात सुख मिळवायचे आहे तो पारमार्थिक वृत्तीचा बनला कारण धर्माच्या शिकवणीचे ध्येय ऐहिक सुखाच्या पलीकडचे आहे. धर्मानुसार वागल्यास माणूस ऐहिक समृध्दी तर मिळवतोच पण पारलौकिक सुखदु:ख साधतो अशी विचारणा हिंदूचा जीवनविषयक दृष्टिकोन बनविण्यास कारणीभूत ठरली. स्व म्हणजे नुसते शीर नसून आत्मा आहे आणि स्वत:ला ओळखणे म्हणजेच आत्म्याला जन्म मरणचक्राच्या फेऱ्यातून सोडविणे म्हणजेच मोक्षप्राप्ती हे जीवनाचे ध्येय बनले. जन्म मरणाच्या फेऱ्यातून आत्म्म्याला मुक्त करावयाचे असेल तर धर्माने नेमून दिलेल्या कर्माची पूर्ती करणे हेच आद्य कर्तव्य मानले पाहिजे. ध्येय मोक्ष असल्यामुळे दुसरे ध्येय गौण ठरते. ऐहिक भरभराट वा तत्कालीन समाजातील प्रतिष्ठा या गोष्टी गौण ठरतात. यांतूनच तिसरे तत्व जन्माला आले आणि ते म्हणजे, कर्म सिद्धात कोणतेही काम मोलाची आशा न धरता केले तरच ते

निष्काम कर्म होईल व अशा कर्मामुळे माणूस कर्मपासून मुक्त होईल व मोक्षप्रत जाईल. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष इत्यादी जीवनातील ध्येयापासून हळूहळू स्वताला सोडवून घेतल्यास आत्मा कर्मातून मुक्त होईल. कर्मसिद्धांताचे आचरण अत्यंत कठीण आहे. कारण माणूस हा काहीतरी फलित डोळ्यांसमोर ठेवून काम करीत राहतो व त्या फलितांच्या आशेनेच त्यांच्या कामतील रस जागृत राहतो. हे सामान्यजनांना व्यवहारात पाळणे कठीण होते. कारण त्यासाठी शरीरावर व वासनांवर नियंत्रण ठेवावे लागते. मोहापासून वंचित व्हावे लागते आणि मानसिक संकुचितता दूर सारावी लागते. मानवी समाजात जरी स्तरबद्ध विभागणी असली तरी देवाला सर्वजण सारखीच हा विचार आत्मसात करणे कठीण जाते. कर्मसिद्धांत माणसाला निराशवादी बनवितो. कारण गतकर्माची बरीवाईट फळे या आयुष्यात भोगावी लागणार अशी त्यांची समजूत करुन दिलेली असते. पापपुण्याच्या कल्पना धर्मनिष्ठ असल्यामुळे जीवनांतील व्यवहारांवर एकप्रकारचे नियंत्रण सतत राहते. आपण प्रयत्न करुनही परिस्थिती बदलणार नाही अशी भीती त्याला वाटते. पाणी माणसालाही सदवर्तनाने आपल्या पापांचे क्षालन करता यावे अशी व्यवस्था खऱ्या अर्थाने कर्मसिद्धांतामध्ये आहे. परंतु हे समजण्याइतकी बौद्धिक परिपक्वता माणसामध्ये येणे अवघड दिसते. आत्मबलाचे सामार्थ्य थोडक्याच व्यक्तीमध्ये असते. बहुतेक माणसे, दुर्बल, भित्री आणि विकारी असतात. त्यामुळे कर्मसिद्धांतानुसार वर्तन करणे भारतीय माणसांना जडच गेले. कर्मसिद्धांताचे सार जाणून घेण्याऐवजी रुढ झाले तू फक्त कर्म. सात्विक, राजस व तामस असे कर्माचे तीन प्रकार मनुस्मृतीत सांगितले असून कर्माचे उपप्रकार म्हणून कायिक, वाचिक आणि मानसिक असे सांगितले आहेत. त्यापैकी सात्विक म्हणजे निष्कामपणे, कर्तव्यनिष्ठेने केलेल्या कर्मामुळे मनुष्याला उत्तम स्थिती प्राप्त होते असे सांगितले आणि स्वार्थापोटी केलेले वा स्वतःच्या आवडीप्रमाणे केलेले काम हे मनुष्याला माध्यम वा अधम गतीला पोचविते असे सांगितले. याचा अर्थ मनुष्याने फक्त कर्मफलाची आसक्ती न ठेवता सत्प्रवृत्तीने काम करावे हे फार अवघड असते.

कर्म सिद्धांत व पूर्नजन्माचा क्षिध्दांत यांनी भारतीय समाजातील उच्चनीचतेला पोषक असे वातावरण निर्माण केले अशी टीका केली जाते. वर्ण व्यवस्थेचेच जातीमध्ये रूपांतर झाले त्यामुळे भारतीय समाजात उच्चनीचता निर्माण झाली ती इतकी पराकोटीला पोहचली की माणसाने माणसाला अस्पृश्य लेखले, जातीमुळे निर्माण झालेली व्यवसायांची विभागणी ही जन्माधिष्ठीत मानली गेल्यामुळे साहजिकच जन्ममृत्यूच्या फेऱ्यात एकदा चांडाळाच्या घरात जन्मलेल्याला सद्‌वर्तनाने देखील ब्राह्मण वा वैश्य होता येणार नसेल तर मग सद्‌वर्तनाचा तरी काय उपयोग ? आणि चांडाळाला मोक्ष मिळणार नसेल तर त्याने सद्‌वर्तन तरी कशाला करावे ? यादृष्टीने कर्मसिद्धांताने जन्माधिष्ठित जातिव्यवस्था टिकवून धरण्यास मदतच केली अशी केलेली टीका योग्य वाटते. धर्माने नेमून दिलेले काम व धार्मनेच नेमून दिलेली जात ही दोन्ही जर बदलणार नसतील तर जातीजातीमधील उच्चनीचता जाईल कशी ? ती गेली तर नाहीच उलट परिदृढ झाली.

वेद, उपनिषदेक्ष, ब्राह्मणे, भगवद्‌गीता, किंवा अन्य धार्मिक ग्रंथातून कर्म,ज्ञान,भक्ती हे विविध मार्ग सुचविले हजाते व त्यायोगे सामान्यमाणसाला आयुष्यातील निरनिराळ्या प्रसंगाना कसे तोंड द्यावयाचे हे कळून येत असे. यज्ञयोग , पूजाअर्चा, उपवास, व्रते, इत्यादी मार्ग दैनंदिन जीवनात महत्व पावले. गीतामध्ये योगसाधनेद्वारे इंद्रियांचे संयमन सांगितले नसून तेथे योगसाधनेमुळे मनुष्याला त्यांचे कर्म करण्यासाठी अधिक क्षमता येऊ शकते असा दृष्टिकोन घेतलेला आढळतो. जीवनातील अंतिम ध्येय साध्य करण्याकरिता नमुष्याने विशाल आध्यात्मिक दृष्टिकोण ठेवला तर त्याला ध्येपूर्ती करता येईल हाच विचार प्रामुख्याने मांडलेला दिसतो आणि याचाच प्रभाव हिंदूमनावर पिढ्यानपिढ्या होत राहिलेला आपणास दिसतो. हिंदूच्या जीवनाचे तत्वज्ञान धर्मग्रंथकारांनी घडविले आणि त्यामुळे ते वर्षानुवर्षे पवित्र म्हणून जपले गेले, त्यांचे दैवी दडपण हिंदूवर राहिले. विचारांची चाकोरी देवाभोवती आणि दैवी मीमांसेभोवती मर्यादित राहिली. जन्माला आल्यानंतर धर्माने नेमून दिलेले काम करायचे आणि बऱ्यावाईट घटनांचा संदर्भ पूर्वजन्मीचा वा पूर्णकर्माचा पारिपाक म्हणून लावायाचा आणि समाधान शोधायचे अशा तऱ्हेची जडणघडण होत गेली. मिळाले तर उपभोगायचे,

देवाची कृपा म्हणून ते मिळाले असे मानायचे  मिळाले नाही तर आपल्याच पूर्वजन्माच्या कर्मांना दोष द्यावयाचा.  या आयुष्यात जे जे मिळते त्याचा संबंध पूर्वजन्माशी व पुढच्या जन्माशी जोडलेला असल्यामुळे हिंदू माणसाला या आयुष्यात केवळ भौतिक बाबीमध्ये रस वाटावा असे तत्वज्ञानच प्राचीन काळापासून सांगितले गेले नाही.

सामाजिक व दैनंदिन जीवनातही विवाहसंस्कार, गर्भाधान, प्रजोत्पत्ती, मुलांचा जन्म, त्यांचे शिक्षण, गृहस्थाची कुटुंबकर्तव्ये, खाणे-पिणे, सण-वार शेती वा व्यवसायातील कामे इत्यादी सर्व बाबीबाबत त्या कशा कराव्या बाबत प्राधान्याने धार्मिक संस्कार व विधी सांगितलेले होते. स्त्री ही पुरुषा तच सामावलेली आहे. तिला स्वत:चे स्वतंत्र व्यक्तिमत्व नाही, ती दुर्बल आहे आणि म्हणून पुरुषांच्या साहाय्यानेच तिने जगावे अशा तऱ्हेचा विचारही धर्मग्रंथातूनच आला.  जातीची व्यवस्था व्यवसायावरुन केलेली असली तरी कालांतराने उच्चनीचता ही धर्मसंमत होत गेली.  ज्या जातीत जन्म घेतला त्याच जातीचे कर्म करावे अन्य ज्ञान प्राप्त करण्याचा विचारच करु नये असा मर्यादित दृष्टिकोण आर्थिक जीवनातही रुढ होऊन बसला.  समुद्रपर्यटन निषिद्ध मानून जगाशी येणारा संपर्क हिंदूनी तोडला आणि शेकडो वर्षेपर्यत जगापासून दूर राहिले.  खेडी खाऊनपिऊन सुखी होती आणि त्यामुळे कोणावर कशासाठी तरी अवलंबून राहावे अशी वेळ आली नाही .आणि शिवाय जे जेथे मिळत होते तेच आपल्याला देवाच्या कृपेने प्राप्त झाले आहे असे मानल्यावर अधिकाची अपेक्षाच कधी ठेवली नाही.  मुलगा हाच मातापित्यांना स्वर्गात नेऊन पोचवील आणि म्हणून कुटुंबात मुलांचा जन्म आवश्यक आहे असे धर्माने सांगितल्यामुळे संततीनिर्मितीचे  ध्येयही ठरवून गले, देव मुले देतो, अशा तऱ्हेची श्रद्धा निर्माण झाली व त्यामुळे अमर्यादपणे संततीनिर्मिती होत राहिली.  खायला कमी पडले, जमीन अपुरी पडू लागली, तरी प्रजानिर्मितीचे कार्य नैसर्गिक नियमांनुसार चालत राहिले.  समाजावरचा मानवी भार वाढत राहिला.  परंतु याची जाणीव मात्र कोणालाच झाली नाही आणि आज देशात लोकसंख्या इतकी वाढली आहे की, सर्वच समस्या कठीण होऊन बसल्या आहेत.  देवाने दिले तसे राहावे, हा दृष्टिकोण आजही विसाव्या शतकातील

समस्यांचे उत्तर म्हटले तर देऊ शकतो पण त्यामुळे मानवनिर्मित सुखसोयीचा उपभोग घेणाऱ्या माणसांचे समाधान होऊ शकत नाही. प्राचीन हिंदू समाजात जे तत्वज्ञान प्रभावी ठरले ते आजच्या हिंदू भारतीयांना तंतोतंत स्वीकारता येत नाही अशी त्यांची अडचण होऊन बसली आहे. त्यामुळे प्राचीन भारतीय समाजातील धर्मनिष्ठ जीवनविषयक दृष्टिकोण हा एकोणिसाव्या शतकापर्यंत हिंदूंच्या जीवनाला मार्गदर्शक ठरला व त्यानूसार येथील कौटुंबिक व सामाजिक जीवनाला वळण लागले असे दिसून येईल. ग्रामीण अर्थव्यवस्था आणि जातिव्यवस्था या दोहोचीही रचना व स्वरुप हे वैशिष्टयपूर्ण रीतीने भारतीयच राहिले कारण हिंदूच्या जीवनविषयक दृष्टिकोनातून त्या राबविल्या गेल्या. हिंदूची समाजरचना वरील जीवनविषयक तत्वज्ञानावरच आधारलेली आहे असे दिसून येईल.

३) कुळकर्णी एम.जी.[३] (१९८७) –

श्री. एम.जी कुळकर्णी यांनी आपल्या भारतीय समाजव्यवस्था या पुस्तकात समाज व्यवस्थेबाबत केलेले विवेचन पुढील प्रमाणे आढळून येते. ज्याप्रमाणे प्राणिमात्रांच्या शरीरात शरीर सुदृढ रहावे, त्यांच्या आरोग्याचे संरक्षण अविरत आणि अविछिन्नपणे व्हावे म्हणून अनेक क्रिया प्रक्रिया चालू असतात त्याचप्रमाणे समाजातही अनेक क्रिया प्रक्रिया चालू असतात. श्वसनक्रिया , पचन क्रिया, रक्तभिसरण क्रिया इत्यादींच्या एका अर्थी स्वतंत्र संघटना असतात, परंतु त्या सर्व एकमेकांवर अवलंबून असतात. तसेच समाजात, सामाजीकरण, स्तरीकरण इत्यादी प्रक्रिया आणि कुटुंब व इतर आर्थिक व राजकीय संघटनात्मक गट असतात. परंतु ते सर्व एकमेकांवर कमी अधिक प्रमाणात अवलंबून असतात. शरीरातील अवयव किंवा क्रिया प्रक्रियात्मक अवस्था ज्या प्रमाणे शरीर स्वास्थाकरिता कार्य करीत असतात, आणि एखाद्या व्यवस्थेत किंचित जरी बिघाड उत्पन्न झाला तरी त्यांचा परिणाम शरीरातील इतर व्यवस्थांवर होतो, त्याचप्रमाणे समाजातील विविध प्रक्रिया आणि कार्यत्मक व्यवस्थांमुळे समाज आहे त्या स्थितीत भटकत राहता. एखाद्या

व्यवस्थेत झालेला बदल हा समाजिक अंग प्रत्यंगावर कमीअधिक प्रमाणात बदल घडवून आणतो. समाजास सामाजिक संबंधाचे जाळे असे याच अर्थाने म्हटले आहे. सामाजिक संबंध हे सामाजिक गटानूसार गटांतर्गत आणि गटा गटातील वैयक्तिक भूमिकांनुसार , त्या त्या भूमिकांना मार्गदर्शन अगर बंधनकारक ठरणाऱ्या नियमानुसार आणि व्यक्तीने आत्मसात केलेल्या अगर व्यक्तीस अनुकूल असलेल्या मूल्यानुसार निश्चित होतात. सामाजिक संबंधाच्या जाळ्यातील एक धागा जरी हलवला म्हणजेच समाजातील व्यक्ती ज्या ज्या गटांचे सदस्य असतात त्या गटांच्या, पार पाडीत असतात त्या भूमिकांच्या, अधीन असतील त्या नियममांच्या किंवा त्यांनी स्वीकारलेल्या मूल्यांच्या स्वरुपात आणि कार्यात जरा जरी फरक पडला तरी सामाजातील सर्व क्षेत्रांत आणि त्यायोगे सामाजिक संबंधावर परिणाम होतो. याचा अर्थ असा की समाजातील वेगवेगळे गट, भिन्न भिन्न सामाजिक संस्था, सामाजिक प्रक्रिया आणि सामाजील व्यक्तींनी स्वेच्छेने वैध अगर अपरिहार्य म्हणून स्वीकारलेली प्रमाणक व्यवस्था यांच्यात समतोल साधलेला असतो किंवा समतोल साधण्याकडे त्यांचा कल असतो. समाज संरचनेचे मूळ घटक सामाजातील हे सर्व गट अगर संस्था त्यांच्या बुडाशी असलेले समाजरचनेचे मूलभुत घटक म्हणजे

१. सामाजिक मूल्ये

२. व्यक्तीच्या स्थान मानास अनुसरुन इतरांच्या संबंधी तिने पार पाडावयाच्या भूमिका

३. वेगवेगळ्या कार्याकरिता समाजात प्रचलित असलेले गट आणि

४. सामाजिक मूल्यांस अनुसरुन व्यक्ती व्यक्तींच्या अन्योन्य क्रियेच्या विषयी तसेच वैयक्तिक वा सामाजिक जीवनात महत्वाच्या वाटणाऱ्या नित्य व नैमित्तिक प्रसंगी पाळावयाच्या विधी संकेताविषयीची प्रमाणके हे होत. पदार्थविज्ञानात ज्याप्रमाणे प्रत्येक वस्तूचा मूलभूत घटक हा परमाणू मानला जातो, आणि रसायनशास्त्रात ज्याप्रमाणे हायड्रोजन, प्राणवायू, इत्यादींना मूलभूत घटक मानले जाते त्याचप्रमाणे समाजशास्त्रात सामाजिक मूल्य, नियमन,

वैयक्तिक भूमिका आणि गट हे मूलभूत घटक मानले जातात. समाजातील कुटुंब आप्तसंबंधीय इत्यादीचे गट तसेच विवाह, धर्म, शिक्षण, शासन वा अर्थव्यवस्था इत्यादींच्या संस्था यांचे पृथक्करण वरील मूलभूत घटकांत करुन त्यांचा अर्थ लावणे अगर त्यांचे स्वरुप ओळखणे हे समाजशास्त्रीय विश्लेषणात आवश्यक व सोयीचे ठरते.

समाजाची तुलना प्राणिमात्रांच्या शरीराशी आणखी एका दृष्टीने केली जाते. शरीराच्या आरोग्याकरिता क्रमाने त्यांच्यात होणाऱ्या विकासाकरिता ज्या प्रमाणे वेळोवेळी उदभवणाऱ्या शारीरिक गरजा नियमितपणे भागवाव्या लागतात. त्याचप्रमाणे समाज धारणेकरिता समाज शरीराच्याही काही गरजा भागवाव्या लागतात. या गरजा खाली दर्शविल्याप्रमाणे आहे.

१. साध्यसंप्राप्ति किंवा ध्येयसिद्धि –

समाज धारणा निर्विघ्नपणे व्हावी आणि त्याकरिता समाजात व्यक्ती व्यक्तीमधील संबंधाना सुस्थिरता लाभून सामाजिक प्रक्रियांच्या मुळे समाजात प्रत्येक व्यक्तीस योग्य स्थान मिळावे याकरिता अनेक नियमनांची आवश्यकता असते. अशा नियमनांना तयार करुन त्यांना वैध स्वरुप देणे आणि त्यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे याकरिता समाजात मुख्यत: शासनव्यवस्थेची आवश्यकता असते. सामाजिक सुस्थिरता आणि सुव्यवस्था ह्या, साध्यसंप्राप्ति या सामाजिक उद्दिष्टाच्या दोन बाजू आहेत आतिण शासन अगर राजकारण हे ते उद्दिष्ट गाठण्याचे साधन ठरते. शासकीय अधिकाराचे स्वरुप आणि मर्यादा ठरवून त्या अधिकारांची वाटणी कशी करावी म्हणजे कोणाला किती अधिकार द्यावा हे शासन व्यवस्थेचे काम ठरते. व्यक्ती व्यक्तीचे आपसातील संबंधाविषयीचे हक्क आणि कर्तव्ये यांची रुपरेषा ठरवून लोकांनी ते पाळावेत म्हणून मार्गदर्शक तत्वे ठरविणे, त्यानुसार नियम अगर कायदे करणे आणि त्या कायद्यांची अमलबजावणी करण्याकरिता निर्बंधने घालणे हे शासनाचे अगर शासकीय संस्थांचे काम ठरते. ही कामे सुरळीतपणे चालावीत म्हणून भिन्न पातळीवर शासकीय सत्ता व अधिकार यांची वाटणी करावी लागते. प्रत्येक समाजात याची व्यवस्था कोणत्या ना कोणत्या व्यक्ती, गट संस्थाद्‌ारे केली जाते.

२. अनुकूलन –

समाज धारणेकरिता समाजास उपलब्ध असलेल्या साधन संपत्तीचा वापर करुन अन्न, वस्त्र, निवारा या मूलभूत गरजा व सामाजिक समष्टि जीवनातून उदभवणाऱ्या सांस्कृतिक गरजा भागविण्याकरिता समाजाने स्वीकारलेले श्रम विभाजन हे या सदरात येते. येथे प्राप्त परिस्थितीशी, पर्यावरणाशी मानव अशी टक्कर देईल अगर नैसर्गिक संपत्तीचा तो कसा वापर करील हे अनेक कारणांवर अवलंबून असते. ती कारणे मुख्यत्वे अशी –

(१) नैसर्गिक पर्यावरणाचे स्वरुप

(२) पर्यावरणात उपलब्ध असलेल्या साधन संपत्तीची माहिती.

(३) या एकुण साधन संपत्तीचा उपयोग कसा करावा या विषयी समाजाजवळ असलेले एकुण ज्ञान.

(४) उपलब्ध ज्ञानाच्या सहाय्याने साधन संपत्तीचा वापर करण्यात अनुकूल वा प्रतिकूल असलेली मूल्ये, समजुती,रुढी इत्यादी.

(५) ज्ञान, साधन संपत्ती व मूल्ये इ. अनुकूल असताना देखील, त्या साधन संपत्तीचा उपयोग अधिकाधिक सुलभतेने व किफायतशीरपणे करता यावा म्हणून आवश्यक असलेली हत्यारे अगर यांत्रिक उपकरणे.

(६) या यंत्र तंत्राची माहिती असलेले कुशल कारागीर.

या प्रमुख कारणांवर निसर्ग आणि मानव यांच्यातील संर्षाचा व सहकार्याचा इतिहास अवलंबून असतो. निसर्गाचा अर्थ समाजावून घेणे, निसर्गाशी एकरुप होऊन राहणे, निसर्गाने निर्माण केलेले अडथळे दूर करुन अगर नैसर्गिक नियमांच्या ज्ञानाच्या आधारे निसर्गाचा उपयोग करुन घेणे इत्यादी मानवी प्रयत्नामध्ये मानवानेच निर्माण केलेली संसकृती ही एका परीने साधन बनते आणि त्याने लावलेले नवे नवे अर्थ, बनविलेली उपकरणे, हत्यारे रुढ केलेले नवे संकेत त्याने लढविलेल्या नव्या नव्या हिकती इत्यादीच्या रुपाने संस्कृती समृध्द बनत जाते वा विकसित होत जाते. अशा

रितीने संस्कृती समृध्द होत असतांना वर उल्लेखिलेल्या सांस्कृतिक वैशिष्टयामध्ये परिवर्तन घडुन येते अगर भर पडत जाते.

एखाद्या समाजाजवळ खनिज संपत्ती असेल, परंतु त्या संपत्तीची माहिती जर त्या समाजास नसेल तर तिचा काहीच उपयोग होणार नाही. माहिती असली तर तिचा वापर कसा व कोणत्या कारणाकरिता करावा हे ही माहित असावयाला हवे. तसेच वापर करण्याकरिता लागणारी हत्यारे वा यांत्रिक ज्ञान आणि त्या साधन संपत्तीचा वापर करण्याकरिता लागणारा वस्तुनिष्ठ दृष्टिकोन यांचीही आवश्यकता आहे. खनिज संपत्ती असलेले पर्वतराजी ही जर देव दैवतांचे निवासस्थान किंवा पलीकडील शत्रूपासून रक्षण करणारा देवच आहे अशी लोकांची श्रद्धा असल्यासत्या साधन संपत्तीला हात लावण्यास कोण धजणार नाही.

म्हणून जीवननिर्वाहाकरिता समाजाने स्वीकारलेली पद्धत व त्याकरिता केलेले श्रम विभाजन हे त्या समाजाने निसर्गाशी व इतर पर्यावरणाशी केलेले हितगुज व तडजोड असे समजले जाते. ही तडजोड कशा प्रकारची असेल हे त्या समाजाच्या व पर्यावरणाच्या वैशिष्टयांवर अवलंबून असते. समाज जीवनाच्या मार्गक्रमणात अशा प्रकारे नैसर्गिक साधन सामग्रीचा वापर मानवी स्वत:ची बुद्धी, बळ व कारागिरी यांच्या साह्याने करुन निसर्गाला अनुरुप अशी जी जीवन निर्वाहाची व्यवस्था उभी करतो ती अनुकूनाचीच प्रक्रिया होय. ही व्यवस्था मुख्यत: वस्तूंचे उत्पादन, वितरण, विनिमय व कारागिरी यांच्या सहायाने करुन निसर्गाला अनुरुप अशी जी जीवन निर्वाहाची व्यवस्था उभी करतो ती अनुकूलनाचीच प्रक्रिया होय. ही व्यवस्था मुख्यत: वस्तूंचे उत्पादन, वितरण, विनिमय व उपभोग अशी चतुर्विध असते आणि ती बहुअंशी श्रम विभाजनावर अवलंबून असते. अनुकूलनयुक्त या चारही प्रक्रियांच्या समुचयाला अर्थव्यवस्था असे म्हटले जाते.

३. एकात्मीकरण –

साध्यसंप्राप्ति अगर ध्येयसिद्धि आणि अनुकूलन यशस्वीपणे साधवयाचे असल्यास अधिकारी व भिन्नस्तरावरील सत्ता स्थानांच्या तसेच प्रचलित श्रम विभाजनानुसार वेगवेगळ्या उत्पादक व सेवाकार्यात गुंतलेल्या व्यक्ती त्यांच्या कार्यात समन्वय साधणेही आवश्यक ठरते. व्यक्ती व्यक्तीतील एकोपा आणि सर्व समाजाच्या स्थैर्याने आपलेच हित साधेल ही भावना टिकविणे अगत्याचे ठरते. समाजाने घालून दिलेल्या नियमानुसार कार्य करीत राहावे आणि समाजनियम यांच्या पालनाने सर्वांचेच कल्याण होईल, कोणावरही अन्याय होणार नाही अशी भावना समाजाच्या प्रत्येक व्यक्तीच्या मनात असावी लागते. याकरिता प्रत्येक समाजात न्याव्यवस्थेची सोय केलेली असते. प्रत्येक व्यक्तीच्या सामाजिक वर्तनाची, प्रत्येक गटातील तिच्या स्थानमानसा अनुसरुन लिखित वा अलिखित सामाजिक नियमानाव्दारा विशिष्ट चाकोरी निर्दिष्ट केलेली असते. ती चाकोरी सोडून व्यक्तीचे वर्तन घडल्यास तिला योग्य ते शासन व्हावे याची तरतूदही अशा नियमनाने केलेली असते. एखाद्या व्यक्तीस तिच्यावर अन्याय होतो असे वाटल्यास सामाजिक नियमांच्या आधारे या अन्यायाविरुध्द समाजाकडे दाद मागण्याची सोय असते. सामाजिक नियंत्रण अभेद्य राहावे आणि कोणावरही अन्याय होऊ नये किंवा अन्याय होतो ही भावना कोणाच्याही मनात राहू नये याकरिता न्यायव्यवस्थेची आवश्यकता असते. ही न्यायव्यवस्था निष्ठूर व नि:पक्षपाती आहे की भावना समाजातील प्रत्येक सदस्यांच्या मनात दृढ राहावी लागते. न्यायव्यवस्थेवर प्रत्येकाचा संपूर्ण विश्वास असावा लागतो. नाहीतर समाजधारणेस अनुकूल असा एकोपा समाजात नांदेण अशक्य ठरते.

४. समाजबंधाचे अगर वर्तनबंधाचे जतन किंवा सामाजीकरण –

सामाजिक संबंध हे व्यक्ती व्यक्तीच्या अन्योन्यक्रियांतून निर्माण होतात आणि व्यक्त होतात. व्यक्तीचे वर्तन हे तिला लाभलेल्या सामाजिक स्थानमानास अनुसरुनच असावे लागते आणि असते. व्यक्ती कोणत्या वेळी कशी वागेल याची किमान अपेक्षा अगर खात्री तिच्या संबंधात

येणार इतर व्यक्तींना नसली तर त्यांच्यातील अन्योन्यक्रियेला काही आधार राहणार नाही. या अन्योन्यक्रियेची एक विशिष्ट चाकोरी परंपरने समाजात निर्माण होते. नित्य वा नैमित्तिक अशा अनेक प्रसंगाकरिता व्यक्तीच्या वर्तनाची दिशा दाखविणारी मूल्ये, प्रमाणके इत्यादीचे ज्ञान असावे लागते व त्यानूसारच वर्तन ठेवावे लागते. ज्ञान संग्रहाची ही प्रक्रिया अगदी बाल्यावस्थेपासून कळत न कळत सतत चालू असते. काही गोष्टी निरीक्षणाने, अन्य काही महत्वाच्या गोष्टी वडील माणसांच्या वळण लावण्याच्या प्रयत्नाने आत्मसात केल्या जातात. नैमित्तिक वर्तनाच्या अन्य काही गोष्टी औपचारिक शिक्षणाने शिकविल्या जातात. या प्रक्रियेस सामाजीकरण असे म्हटले जाते. सामाजिक बंधाचे जतन, म्हणजे दैनंदिन व्यवहारात अगर विवाह इत्यादी विशिष्ट प्रसंगात अन्य व्यक्तीशी वा वस्तूशी एखाद्या व्यक्तीचे वर्तन कसे असावे, दृष्टिकोन कसा असावा, कोणते विविध संकेत तिने पाळावेत याविषयीची मूल्ये, प्रमाणके इत्यादी ची चाकोरीबद्ध व्यवस्था पुढच्या पिढीच्या हातात सोपविणे हे सामाजीकरणाच्या प्रक्रियेचे साध्य बनते. समाजधारणे करिता म्हणूनच ही प्रक्रिया अतिमहत्वाची ठरते.

५. मानसिक ताणाचे निरसन –

माणसांच्या समाज जीवनात लहानपणापासून असे अनेक प्रसंग येतात की, ज्यात त्याला हवे ते मिळत नाही. आपल्या बुद्धी व कुवतीप्रमाणे आणि सामाजिक मूलयांचा व प्रमाणकांच्या चाकोरीत राहून प्रयत्न करुनही त्योच ईप्सित साध्य होत नाही असा अनुभव अनेकदा त्यांच्या वाटेला येतो. सामाजिक चाकोरीत राहूनच द्विष्ट गाठणाऱ्या पद्धतीवरचा त्यांचा विश्वास ढळण्याची शकयता असते. सामाजिक मुल्यांना व प्रमाणकांना जुगारुन वा डावलून स्वत:चे उद्दिष्ट साध्य करुन घेण्याकरिता त्यांच्या मनाची तयारी होण्याची शक्यता असते. एखादी वस्तू स्वत:ला हवी असतात ती दुसऱ्याला मिळाल्यास त्या दुसऱ्याविषयी मनात असूया बाळणे वा त्यांचा द्वेष करणे इत्यादी प्रवृत्ती बाळवण्याची शक्यताही असते. प्रयत्न विफल झाल्याने व अपेक्षा भंगाने मनावर

ताण पडतो. सामाजिक मूल्ये आणि प्रमाणकांच्या बाबतीतल्या योग्ययोग्यतेची जाणीव नाहीशी होण्याची भिती असते आणि अशा संदर्भात व्यक्ती समाज – विघातक वा आत्मघातकी विचाराकडे, वळण्याची शक्यता असते. म्हणून प्रत्येक समाजात अशा संदर्भातील व्यक्तीच्या मनावरचे दडपण नाहीसे करुन व्यक्तीचे सांत्वन करुन, दिलासा देऊन योग्य मार्गाकडे तिला प्रवृत्त करण्याची योजना पण असावी लागते.

सामाजिक व्यवस्था टिकविणाऱ्या या मूलभूत गरजा आहेत त्या वर सांगितल्या आहेत. या गरजा भागविणे हे समाजधारणेच्या दृष्टीने अत्यावश्यक मानले जाते. या घटक गटांना ( व्यापक समाज व्यवस्थेतील ह्या उप व्यवस्था होत ) उदा. कुटुंब, ऐच्छिक संघ, शासकीय कारभार व आर्थिक उद्योगाचे गट इत्यादींना वरील विश्लेषण लागू पडते. म्हणजे याही गटांना स्वत:चे अस्तित्व टिकविण्याकरिता या गरजा भागवाव्याच लागतात असा याचा अर्थ होतो.

४) खडसे भा. कि.[४] (१९९०) –

डॉ. भा. कि. खडसे यांनी आपल्या 'मांग जात समाजशास्त्रीय अध्ययन' या शोध प्रबंधाव्दारे मांग जाती संबंधी समाज शास्त्रीय अध्ययन केलेले आढळून येते. प्रस्तुत संशोधनाचा सांराश आणि निष्कर्ष हे पुढील प्रमाणे आहेत. आधुनिकीकरणाची प्रक्रिया सर्वव्यापी स्वरूपाची असून, या प्रक्रियेचा प्रभाव कक्षेत नसलेला समाज विरळाच म्हटला पाहिजे. प्रस्तुत प्रक्रियेचा सद्यकाळात विविध दृष्टिकोणातून अभ्यास करण्यात येत आहे. पाश्चिमात्य देशात आधुनिकीकरणाचे प्रगत रूप दिसून येते. तर लॅटिन अमेरिका, आफ्रिका, आशिया आणि पूर्वेकडील देशात आधुनिकीकरणाप्रती वाढता कल आपले लक्ष वेधून घेतो. याच मालिकेत देशात आधुनिककरणाप्रती वाढता कल आपले लक्ष वेधून घेतो. याच मालिकेत भारताचा आधुनिकतेच्या ध्रुवाकडे जाणारा देश म्हणून प्रामुख्याने निर्देश केला जातो. आधुनिकीकरणात समाज सदस्यांची नवआकांक्षाची पातळी वाढत जाते. (ॲप्टर : १९६५ :१) परोपजीवी आणि कर्तृत्वाविन्मुख आत्मरत व्यक्तित्वाकडून कर्तृत्वसिध्दी अभिमुखता

प्रत्यायासा येते (मॅकलिलॅंड :१९६६ : २९ –४० )तसेच आधुनिक अभिवृत्ती दर्शक नवविचार , नवपध्दती , वक्तशिरपणा, हिशोबीपणा, नियोजनावर विश्वास वाढत जातो. (इंकेल्स : १९६१ : १५१) एक प्रकारे आधुनिकीकरणातून मूल्यव्यवस्था, व्यक्तीत्वव्यवस्था आणि समाजव्यवस्थेतील परिवर्तन अपेक्षित असते. (श्रीनिवास :१९७६: २२) सारांश, समाजात आधुनिकीकरणाची प्रक्रिया जेव्हा मूळ धरू लागते तेव्हा तिचा परिणाम फक्त समाज संरचनेवरच होत नाही तर त्यामुळे समाज सदस्याच्या मूल्ये आणि अभिवृत्तीत बदल घडू लागतो.

या आधुनिकीकरण प्रक्रियेत ''परंपरा'' विरोधक असतात असे काही मर्यादे पर्यंत मानले जाते. परंतु परंपरा सदैव आधुनिकता विरोधी असतात, हा दृष्टिकोण एकांगी म्हटला पाहिजे. इतके च नाही तर या क्षेत्रातील संशोधनानुसार कोणताच समाज पूर्णत: आधुनिक किंवा पारंपारिक स्वरूपाचा नसतो. पंरपरा केवळ भूतकाळाचे तसेच आधुनिकता वर्तमानकाळाचे प्रनिधित्व करतात असे ही म्हणता येत नाही. खरे पाहिले तर ''परंपरा विरोधी आधुनिकता '' हा वाद वृथा म्हटला पाहिजे. कारण परंपरेच्या पार्श्वभूमीवर आधुनिकीकरणाची प्रक्रिया प्रत्ययास येते आणि एक प्रकारे ह्या दोन्ही प्रक्रिया परस्परासमवेत चालणाऱ्या असतात. परंपरेत अनुकुलनात्मक बदल होऊन त्यांचे आधुनिक रूपही प्रकट होते. ब्रिटीशाच्या आगमना नंतर त्यांनी स्वीकारलेल्या ध्येय धोरणामुळे तसेच सर्व क्षेत्रात आरंभ केलेल्या प्रगतीपर योजनांमुळे भारतीय समाजातील सर्व स्तरांवर आघात झाले. स्वातंत्र्याच्या चळवळीने त्यास एक नवीन एतद्देशीय दृष्टिकोण दिला आणि स्वतंत्र्योत्तर काळात संविधान, पंचवार्षिक योजना, दलितांना दिलेले संरक्षण, नवीन कायदे या सारख्या बहुविध गोष्टीनी आधुनिकीकरणाला चालना मिळाली. आधुनिकीकरणाच्या प्रक्रियते औद्योगिकरण, शहरीकरण व शिक्षण ह्या गोष्टी संरचेनच्या प्रभावाने भारतीय समाजातील पारंपारीक संरचनांमध्ये अनुकुलनात्मक परिर्वतन घडू लागले. ही प्रक्रिया अनुभवजन्य पातळीवर तपासण्याच्या हेतूने प्रस्तुत अध्ययन करण्यात आले. त्यासाठी सूक्ष्म संरचना म्हणून अनुसूचित जाती–समुच्यातील मांग जातीची निवड

करण्यात आली. ही जात महाराष्ट्रात गावोगावी विखूरलेली असली तरी या संशोधनसाठी विदर्भ विभागावर लक्ष केंद्रित करण्यात आले. या संशोधनातून गवसलेले निष्कर्ष 'विदर्भातील मांग जाती' पुरते मर्यादित असते तरी महाराष्ट्रातील मांग जातीचे व व्यापक अर्थाने अनुसूचित जाती–समूच्याचे चित्र त्यातून रेखांकीत व्हावे.

मांग –मातंग –

उपलब्ध साहित्यात या जातीचा निर्देश 'मांग' या संज्ञेने केलेला आढळतो आणि 'मांतग' ही संस्कृतीद्भविता संज्ञा आहे. सद्यकाळात बहुतांशी लोकांनी 'मांग ' या संज्ञ ऐवजी 'मातंग' संज्ञेचा स्वीकार केला असून हिच संज्ञा उपयोगात आणावी असा आग्रह दिसून येतो. एका प्रकारे संस्कृतीकरण प्रक्रियेतील ही प्रथम पायरी दिसते.

बृहत परंपरा संबंध –

मांग जातीचा मूळ पुरूष, मांतग, आणि उत्पत्तीकथांचे सम्यक अध्ययन केले असता त्यात बृहत परंपरेशी संबंध स्थापीत करण्याचे प्रयत्न अनुस्युत दिसतात.

आदिवासी –

काही अभ्यासक मांग जातीला महार जातीची पोट जात मानतात. परंतु उपलब्ध पुराव्यांची छाननी करता , हा निष्कर्ष चुकीचा ठरतो. या उलट रसेल आणि हिरालाल,प्रभाकर मांडे, वि. रा. शिंदे यांनी मांडलेले मत आणि मांग जातीतील सद्यकालीन व्यवसाय, देवीदेवता, जादूप्रभाव व इतर गोष्टींना लक्षात घेता

अ) मांग जात ही मूळची आदिवासी असावी.

ब) दक्षिणेतून १३ व्या शतकापुर्वी येवून महाराष्ट्रात गावो गावी ; वसली असावी असे दिसते. अर्थात या संदर्भात विशेष संशोधन करण्याची निकड जाणवते.

## संस्तरण–

मांग जात समूच्च्यात २४ पेक्षा जास्त जातीचा सामवेश होतो. या जातींमध्ये श्रेष्ठ – कनिष्ठतेची परंपरा आढळते. त्यांच्यात बेटी व्यवहारावर बंदी दिसते. प्रत्येक जातीचा स्वतंत्र्य व्यवसाय असून इतर जातीचे तो व्यवसाय करीत नाही. एका रितीने भारतीय समाजातील जाती व्यवस्थेचे 'समावृत्तीकरण' मांग जातीत प्रत्यायस येते. मांग जात समूच्यातील 'जातीचे 'एकीकरण करण्याची प्रक्रिया वाढत असल्याचे सुनंदा पटवर्धन (१९७३:४३) यांनी म्हटले आहे. विदर्भातील मांग जातीत 'जातींच्या 'एकीकरणाचे डोळस प्रयत्न अद्यापही झालेले नाहीत. जाती सभेच्या ठरावां मध्ये याचा उल्लेख प्राप्त होत नाही.

## निवास –

ग्रामीण भागात आजही मांग जाती सदस्य 'मांगवाड्यात 'गावाबाहेर राहतात. शहर व महानगरात झोपडपट्यांमध्ये त्यांचे केंद्रिकरण दिसते. मध्यम व उच्चशिक्षित , व्यवसाय, नोकरी, व्यापार करणारे वरच्या जातीच्यां वस्त्यांमध्ये राहतात. आज मांग जातीतील लोकांच्या निवासांविषयीच्या 'आक्रांक्षा' वाढल्या असून चांगले. पक्के , सुखसोईनी युक्त व वरच्या जातींच्या वस्तीत, सुशिक्षितींच्या शेजारी घर असावे, असे अभिमत प्रकट केले जाते. म्हणजेच निवास व शेजाऱ्या संबधी त्यांच्या आकांक्षा वाढलेल्या आहेत.

## बलुतेदारी–

ग्रामीण भागात मांग बलुतेदार म्हणून काम करतात. अर्थात पूर्वापार चालत आलेले काम व त्याबद्दल मिळणाऱ्या मोबदल्याचे स्वरूप आज बदलले आहे. शहर व महानगरातील मांग जाती सदस्य बलुतेदारीशी संबंधित नाही. त्यांना व्यवसाय निवड, उत्पादित वस्तु विक–ण्याचे स्वातंत्र्य दिसते. प्रदत्त दर्जा व भूमिकांकडून अर्जित दर्जा व भूमिकांकडे झालेले हे संक्रमण आधुनिकता स्पष्ट करणारे आहे. ग्रामीण क्षेत्रात मात्र बरिचशी पंरपरा संलग्नता दिसते. परोपजीवीत्वा पासून मुक्तीचे प्रयत्न जाती सभांसदाकडून होत आहेत.

२.२२.

दबलेली जात –

एम. एन. श्रीनिवास यांनी 'प्रभावी जातीची 'चार वैशिष्टये सांगितली आहेत. जातीची लोकसंख्या महत्तम असावी, राजकीय व आर्थिक सत्ता प्रबळ असावी, भूमिवरील मालकी आणि कर्मकांडाचें विशेषाधिकार असावे. मांग जातीला अनुलक्षून या वैशिष्टांचा विचार केला तर मांग जातीला 'दबलेली जात' असे म्हणावे लागले. कारण वरच्या जातींच्या तुलनेत ते संख्याबलाने कमी आहेत आणि महत्वाचे म्हणजे गावो–गावी विखूरलेले आहेत. प्रत्येक खेड्यात त्यांची दोन तीन धंदे दिसतात. त्यांच्याकडे कोणत्याही प्रकारची 'राजकीय सत्ता ' केंद्रित झालेली नाही. आर्थिक दृष्ट्या 'दारिद्रयरेषेखाली 'जीवन जगणारे म्हणून निर्देश करावा लागेल. भूमीवरील मालकी नाही. आणि कर्मकांडात ते अनाधिकारी होते. म्हणजेच 'प्रभावी जातीच्या '' वैशिष्ट्यांचे विरोधी वैशिष्टये मांग जातीत दिसतात. अशा 'परोपजीवी ' 'दबलेल्या ' अवस्थेपासून बहिर्गत व अंतर्जनित कारकांच्या प्रभावाने या जाती गटात नव आंकाक्षा , नव मूल्ये आणि नव आत्मजाणीव प्रत्ययास येत आहे. मांग जातीतील एक विवाह सार्वत्रिक असून बहूपत्नी विवाहाचे प्रमाण घटत आहे. जातील अंतर्विवाह रूढ असला तरी आंतरजातीय विवाहास अनूकूलता वाटत आहे. प्रस्तुत अध्यनात अशा प्रकारचे पाच विवाह झाल्याचे निदर्शनास आले स्वसमुदाय अंतर्विवाहापेक्षा लोंकानी दुसऱ्या समुदायात विवाह करण्याची आकांक्षा व्यक्त केली असून जवळच्या समूदायास अग्रक्रम दिला आहे. कुलबर्हिर्विवाह आते भाऊ मामेबहिणीचा विवाह दीर–भावजय आणि मेहूणी विवाह लोकांना मान्य आहे. तसेच पुनर्विवाहास अनुमती देण्यात येते. मुला–मुलींच्या विवाह वयात वाढ झाली असून पूर्वी प्रचलित असलेल्या बालविवाहाचे प्रमाण घटले आहे. मांग जातीत बालविवाहाच्या प्रचलनामुळे विवाह मातपित्यांनी 'ठरविलेले' असते तेव्हा अशा विवाहात वर वधूने परस्परांनी निवड करण्याचा प्रश्न नव्हता.आज माता–पित्या समवेत मुला –मुलींचा सहभाग वाढला आहे. मात्र त्यांना वर वधू निवडण्याचा पूर्णअधिकार दिसत नाही. वर वधूच्या निवडीच्या पारंपारिक निकषांमध्ये बदल होऊन वय, सौदर्य , शिक्षण, योग्यता ह्या आधुनिक निकषांचा समावेश झालेला दिसतो. विवाह विषयक

नियमांचा भंग केल्यास कडक दंड केला जाई. या पध्दतीत बदल झाला असून शहर महानगर तसेच शिक्षणाच्या वरच्या स्तरातील लोक दंडास सहमत नाहीत. जाती समूच्यातील घटक जातींमध्ये विवाह संबंध व्हावे असे ग्रामीणांपेक्षा शहर व महानगरातील लोकांना वाटते. आंतरजातीय विवाहास त्यांची मान्यता असून वरच्या जातीशी विवाह संबंध व्हावा, अशी त्यांची आकांक्षा दिसते मांग् जातीत वधू मूल्ये देण्यात येत असे . ग्रमीण शहरी क्षेत्रात वधूमूल्ये आजही असले तरी सुशिक्षित मुले वरमुल्याची मागणी करीत आहेत त्यात वरच्या जातीच्या अनुकरणातून प्रतिष्ठा वाढविण्यासाठी आकांक्षा आढळते. विवाहविधी जातीतील अनुभवी व्यक्ती, साधू करीत असत. आज शहर–महानगरात ब्राम्हणांकडून विवाहविधी केले जातात. ग्रामीण भागात मात्र परंपरागत चित्र दिसते. विवाहावरील खर्चाचे प्रमाण वाढले असले तरी ग्रामीण क्षेत्रापेक्षा शहर व महानगरातील सुखवस्तू व्यक्ती जास्त खर्च करतांना दिसतात. त्यात सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करण्याचा सुप्त हेतू असतो.घटस्फोटास सर्वत्र आणि पूर्वीपासून मान्यता आहे. जाती पंचायतीकडून घटस्फोट घेतला जातो.ग्रामीण क्षेत्रातील तसेच निरक्षरांपेक्षा शहर महानगरातील उच्चशिक्षितांमध्ये घटस्फोटाचे प्रमाण कमी आहे.

## कुटुंब –

मांग जातीत पितृसत्ताक कुटुंब पध्दती विद्यमान आहे. बहुपत्नी कुटुंबाची संख्या ऱ्हास होत असून एक विवाही कुटुंबांचे प्रमाण वाढले या जातीत मागील पिढीत संयुक्त कुटुंबाचे प्रमाण जास्त होते. आता प्रारंभिक कुटुंबाचे प्रमाण वाढले आहे. निवास क्षेत्र आणि शेज़ाराविषयी लोकांच्या आकांक्षा वाढलेल्या आहेत. त्यातून त्यांची 'दूहनिष्ठ अभिवृत्ती' प्रकट होते. स्थानांतराणामुळे कुटुंब विभाजनाची प्रक्रिया प्रत्ययास येते. परंतु त्याच बरोबर विवाहानंतर वेगळा कुटुंब करून राहण्याची प्रवृत्ती (कुटुंब विभाजन) नगण्य सामान्य संपत्ती, गरीबी , उत्तरदायित्व पार पाडण्याच्या मर्यादित क्षमतेमुळे दिसून येते. आज कर्त्याचे पारंपारिक निकष बदलत असून जन्म व वया ऐवजी शिक्षण , बुध्दिमता , नेतृत्वगुण ह्या आधुनिक निकषांना मान्यता मिळत आहे. कुटुंबातील निर्णय पितृसत्ताक

कुटुंब असल्यामुळे कर्ता पुरूष घेत असे. त्याची एकाधिकारशाही होती. वर्तमानकाळात ग्रामीण भागापेक्षा शहर व महानगरात कर्ता व इतरांचा सहभाग वाढू लगला. पती-पत्नीच्या सहभागाचे वाढते प्रमाण 'समानता ' मूल्यास मान्यता देणारे आहे. अपत्यांविषयी ग्रामीण क्षेत्रातील लोकांची आकांक्षा परंपरागत आहे. परंतु शहर-महानगरातील आणि उच्च शैक्षणिक स्तरातील लोकांनी मुला-मुलींमध्ये कोणताच भेद न करून समानता मूल्यास स्वीकारलेले दिसते. कुटुंबाचा आकार लहान असावा, या आधुनिकीकरणाच्या गमकास ग्रामीण व शहरी निरक्षरांपेक्षा , शहर महा नगरातील तसेच उच्चशिक्षितांनी जास्त मान्यता दिलेली दिसते. ग्रामीण भागातील लोक स्वत:ला लक्ष्यबिंदू मानतात. शहर महानगरात आई वडिल व मुलांना लक्ष्यबिंदू मानतात. मुलांना व सर्वांना लक्ष्यबिंदू मानण्याचे प्रमाण कमी आहे.त्यातून मांग जाती सदस्यांची 'आत्मकेंद्री अभिवृती' विशेषत्वाने दिसते. ही अभिवृत्ती आधुनिकतेपेक्षा पारंपारिकतेला जवळची आहे. कौटुंबिक जबाबदाऱ्यांमध्ये लोक पारंपरिक जबाबदऱ्यांच्या पुरस्कार करतात. मुलांना शिक्षण देण्याची जबाबदारी उच्चशिक्षित मानतात. शहर महानगरातील लोक जास्त जबाबदाऱ्या स्वीकारून आधुनिक अभिवृत्ती प्रकट करतात.निम्न आर्थिक स्तरातील मांग जाती सदस्य वृध्दांची जबाबदारी मानीत नाहीत. परंतु वरच्या आर्थिक स्तरातील लोक जास्त जबाबदारी मानतात.आत्पसंबंधी गटात दुरची , जवळची ,खुप जवळची मंडळी असते. एक प्रकारे जवळ दुर अशी वर्तूळे असतात. त्यात आप्तसंबंधीयांना सर्व प्रकारची मदत केली जाते. या गटाविषयी लोकांच्या मनात कमालीची आस्था असते. व्यवसाय. नोकरी, संकट प्रसंगी मदत केली जाते . अशी व्यापक जबाबदारी मानणे आधुनिकतेला जवळचे मानले जाते.

## आर्थिक जीवन-

मांग जातीचे व्यवसाय परंपरागत व अकुशल स्वरूपाचे होते. ग्रामीण भागात बलुतेदारी पध्दतीमुळे जाती आणि व्यवसायचे आश्चर्य दृढ होते. तसेच या जाती समुच्च्यातील जातींचे अनेक व्यवसाय आणि व्यवसायची अनेकात ग्रामीण व शहरातील झोपडपट्टीत कायम असली तरी मध्यम

व उच्चशिक्षितांनी कुशल व आधुनिक व्यवसाय स्विकारले आहेत. एक प्रकार या जातीत व्यवसायिक गतिशीलता प्रत्ययास येत आहे. ही गतिशीलता दोन प्रकारची दिसते.

१) एका पिढीतील व्यावसायिक गतिशीलता उदा. आरंभी बांबूची कामे करणारे युवक पुढे शिक्षण घेऊन नौकरी किंवा व्यवसाय स्विकारला

२) पिढ्यांतील व्यावसायिक गतिशीलता उदा. आजोबाच्या किंवा वडिलांच्या पिढीतील व्यवसाय सोडून उत्तदात्याने नवीन व्यवसाय स्विकारला. पारंपारिक व्यवसायाबाबत जातीधर्मांचे पालन म्हणून ग्रामीण भागात आजही काही मर्यादेपेक्षा आस्था दिसून येते. परंतु शहर महानगरातील आणि वरच्या शैक्षणिक पातळीशी संबंधीत लोकांमध्ये पारंपारिक व्यवसायाविषयी विरोधी भावना दिसते. अस्वच्छ , निम्न प्रतिचे ,कमी उत्पन्न देणाऱ्या या व्यवसाया ऐवजी त्यांनी आधुनिक व्यवसायाची आकांक्षा व तरफदारी केली आहे. पारंपारिक व्यवसायाचे बंद व जाती निष्ठ स्वरूप सर्वार्थाने जातीच्या प्रगतीसाठी अहितकारक आहे. तेव्हा मुक्त व प्रतिष्ठा देणाऱ्या व्यवसायाचा स्विकार करावा हा विचार बुध्दिसंगत आणि मानसिक गतिशीलतेला स्पष्ट करणारा आहे.

मांग जाती घटकांनी बलुतेदारीचा अव्हेर करून नवव्यवसायाची आकांक्षा केली आहे. मुलांनी पारंपारिक व्यवसायाच्या ऐवजी आधुनिक व्यवसाय निवडावे , त्यासाठी प्रशिक्षण घ्यावे तसेच पारंपारिक व्यवसायच्या प्रदत्त स्वरूपास आधुनिक रूप प्रदान करण्याची आकांक्षा व्यक्त केली आहे . व्यवसाय बदलातून प्रदत्तदर्जा व भूमिकेपासून अर्जितदर्जा व भूमिका वठविल्या जात आहेत. ग्रामीण भागात राहणाऱ्या तसेच निरक्षर लोकांमध्ये गरजांचे नियोजन त्या प्रमाणात दिसत नाही. परंतु शहर महानगरातील आणि वरच्या शैक्षणिक स्तरातील लोक गरजांच्या नियोजनाचा विचार करून अल्पकालीन संतोषापेक्षा दीर्घ कालीत संतोषावर भर देतात मात्र बहुतांशी लोंकाच्या सवयी व त्यावरील होणारा खर्च जास्त आहे. जीवनातील 'वक्तशीरपणा 'व 'हिशोबीपणा 'ग्रामीण

भागातील लोकांपेक्षा शहर व महानगरातील मध्यम व उच्चशिक्षितांमध्ये जास्त आहे. मांग जाती सदस्यांची भूमिवर मालकी अपवादात्मक मानावी लागेल. परंतु शेतीमुळे येणारे आर्थिक स्थैर्य , प्रतिष्ठा, भविष्यातील निश्चिती लक्षात घेऊन शेतीवरील मालकीची आकांक्षा वाढलेली आहे. आता पर्यंत लोक आर्थिक मदत यजमान किंवा सावकाराकडून घेत असत, आता बॅका व शासनाकडून आर्थिक मदत घेण्याची जाणीव लोकांमध्ये वाढलेली आहे . जाती सभांनी केलेल्या ठरावात शासनाने व्यवसाय करण्यासाठी , घरे बांधण्याकरीता आर्थिक मदत द्यावी असे समाविष्ट केलेले दिसते. पारंपरिक कर्ज प्राप्त करणाऱ्या केंद्राकडून शासन व बॅकांची मदत घेण्याची अभिवृत्ती आधुनिकता स्पष्ट करणारी आहे. मांग जातीच्या आत्यंतिक गरिबीमुळे आणि आर्थिक गुंतवणूकीचा प्रश्नच नव्हता. लोक जेमतेम जगत होते. परंतु ग्रामीण जीवन व बलुतेदारीतून मुक्त झालेल्या लोकांनी नवीन व्यवसाय स्वीकारले. त्यांच्या उत्पन्नात वाढ झाली आणि गुंतवणूकीचा विचार करू लागले. ग्रामीण भागात अशा गुंतवणूकीची मात्रा कमी असून अल्पकालीन संतोष देणाऱ्या व आवश्यक गोष्टीत गुंतवणूककरण्यास प्रधान्य दिले जाते. शहर व महानगरातील मध्यम व उच्चशिक्षितांमध्ये इतरांपेक्षा गुंतवणूकीची मात्रा जास्त असून त्यात भविष्यातील उत्पन्नासाठी गुंतवणूकीचा काळजीपुर्वक विचार केलेला दिसतो. मुलांचे शिक्षण, बचत, घर, खेरदीत केलेली गुंतवणूक आशावादी आहे. शहरातील मध्यम वर्गीयांमध्ये 'दिखावू गुंतवणूक ' आपले लक्ष वेधून घेते. एकूण ग्रामीण क्षेत्रातील लोकांचे जीवनमान निम्न असून शहर व महानगरातील लोकांचे जीवनमान वरचे आहे. मांग जाती सदस्य शिक्षण, व्यवसाय, नौकरी करण्याच्या उद्देशाने शहराकडे स्थलांतरित होत आहे. महार जातीपेक्षा हे क्षेत्रिय गतिशीलतेचे प्रमाण कमी असले तरी ग्रामीण जीवनातून प्रगत समुदायाकडे जाण्याची ही अभिवृत्ती विशेष महत्वाची व प्रगतीची आकांक्षा करणारी आहे. क्षेत्रिय गतिशीलतेसाठी लोकांना आप्तसंबंधी गटाची प्रेरणा व मदत प्राप्त झाली आहे. म्हणजेच आप्तसंबंधी गट 'सामाजिक गतिशीलतेस' सहाय्यक बनतो असे दिसते.

क्षेत्रिय गतिशीलतेतून आदान–प्रदान चालना मिळते. बंदिस्त जीवनातून खुल्या जीवनाती लोकांचा सहभाग वाढतो. त्यामुळे नवी जीवनदृष्टी , विचार मूल्ये आणि नवआकांक्षा लोकमना निर्माण होतात. आधुनिकीकरणाला त्यातून गती प्राप्त होते.

## धार्मिक जीवन–

मांग जातीचा हिंदू धर्माशी संबध असून त्यांच्यात शैव, मानवभाव , वारकरी असे पं . आहेत. विदर्भातील मांग जातीत बौध्द धर्म स्वीकारल्याचे दिसत नाही. या जातीत स्थानिक , प्रादेशिक आणि अखिल भारतीय पातळीशी संलग्न देवी–देवतांची पूजा अर्चा केली जाते. लघुपरंपरेतील देवदेवतांचे प्राधान्य दिसते. बहूदेवतावाद, निसर्गपूजा, आत्म्यावरील विश्वास प्राधान्याने दिसतात. मरिआईची पूजाअर्चा विशेषत्वाने केली जाते. मुस्लीम पिर–फकरिंना लोक नवस करतात. वरच्या जातींचा संपर्क व अनुकरणातून 'बृहत परंपरेशी ' संबंध दर्शविण्यचे प्रयत्न केलेले दिसतात. त्यात जाती उत्पत्ती कथा, देवदेवताची पूजाअर्चा आणि धार्मिक ग्रंथांच्या पठनाचा उल्लेख करता येईल. ग्रामीण भागापेक्षा शहर व महानगरात धार्मिकतेचे प्रमाण वाढलेले दिसते. लोक पूजाअर्चा, सण समारंभात सहभागी होतात. ग्रामीण भागातील लोकांचा पूजाअर्चा,सण समारंभातील पारंपरिक स्वरूपाचा दिसतो. कारण अद्यापही विटाळ व शुध्दतेच्या धारणा तेथे प्रभावी आहेत. शहर व महानगरात विटाळ व शुध्दतेंच्या धारणा संपलेल्या आहेत. त्यामुळे ब्राम्हणाकडून पूजाअर्चा,मुहूर्त , संस्कार करण्यावर भर दिला जात आहे. पारंपारिक संस्कार संपन्न करतांना वरच्या जातीतील संस्कारास आदर्श मानून त्याचप्रमाणे संस्कार पार पाडण्याची आकांक्षा वाढत आहे. अर्थात हे प्रमाण ग्रामीण भागापेक्षा शहर महानगरात जास्त आहे.काही व्यक्ती संस्कार साधेपणाने करावे. त्यात विशेष अवडंबर नको. विवाहातील विधि सोपे असावे. त्यात पुरोहिताला स्थान नसावे. अशा विचारसरणीतून आधुनिकरणाची आकांक्षा करीत आहेत.मांग जातीत 'साधू 'ही संस्था असून धार्मिक कार्याच्या मार्गदर्शनासमवेतच लोकजागृतीचे कार्य ते करतांना दिसतात. मद्यपान करू नये

, मृत जनावरांचे मांस भक्षण करू नये, सट्टा लावू नये, अंधश्रध्दावर विश्वास नको, जादूटोणा भ्रामक असतो, असा उपदेश कीर्तन प्रवचनातून ते करतात. त्यामुळे संस्कृतीकरणास चालना प्राप्त झालेली दिसते. मंदिरप्रवेशावर ग्रामीण भागात बंदी होती. आज त्यात थोडा बदल झाला आहे. शहर महानगरात अशी बंदी राहिलेली नाही. ग्रामीण भागातील लोकांच्या मनात मंदिर प्रवेशाची आकांक्षा वाढली आहे. वरचे लोक तीर्थेयात्रेला जातात, देवी देवतांचा उपवास करतात.शहर महानगरातील लोक तिरूपती, व्दारका, पंढरपूर इत्यादी तीर्थेयात्रेला गेलेले दिसतात. एकूण मांग जातील लघु आणि बृहत परंपरांचे संमिक्षण दिसते. नवीन बुध्दिसंगत परंपरा बांधण्याचा प्रयत्न आढळतो. तसेच संस्कृतीकरणाची आकांक्षा आपले लक्ष वेधून घेते. मांग जातीत जादू विश्वास दिसतात. बहुतांशी लोकांचा जादूवर विश्वास आहे. अर्थात हे विश्वासाचे प्रमाण ग्रामीण भागात जास्त आणि शहर, महानगरात उत्तोरोत्तर कमी आहे. शहर महानगरातील तसेच शिक्षणाच्या वरच्या स्तरातील लोक जादू पेक्षा विज्ञानावर विश्वास ठेवतात. तसेच जादूटोण्या पेक्षा डॉ. केलेल्या उपचारास मान्यता देतात.नवस, शपथ, दिव्य, ज्योतिष्यावर ग्रामीण भागातील तसेच निरक्षर गटातील लोकांचा विश्वास जास्त आहे. त्या तुलनेत शहर महानगरातील आणि वरच्या शैक्षणिक स्तरातील लोकांचा विश्वास कमी आहे. आजही लोक वर्जित दिवस मानतात. शुभ–अशुभावर विश्वास ठेवतात. परंतु हे प्रमाणही शहरीकरण व शिक्षणाच्या वरच्या टप्प्यावर कमी झालेले दिसते. अमावस्या व ग्रहण मागून पाहणेची भूमिका ग्रामीण भागात पार पाडली जाते. शहर व महानगरात वाईट पध्दत म्हणून लोकांनी या पध्दतीचा त्याग केला आहे. पाप–पुण्यावर लोकांचा विश्वास असला तरी पाप–पुण्याची पारंपारिक व्याख्या बदलत आहे. मंदिरात प्रवेश पूर्वी पाप मानले जाई आता लोक तो आपला हक्क मानतात. ग्रामीण भागातील सण– उत्सवातील स्थान थोडे बदलले आहे. शहर व महानगरात आमुलाग्र बदल झाला असून पारंपारिक भूमिकांचा लोकांनी त्याग केला आहे. खान– पानातील बदलाविषयी साधू, संघटना प्रयत्नशिल आहेत. क्वचित ठिकाणी ग्रामीण क्षेत्रात त्याचे अनुसरण केले जाते. शहर महानगरात

यात पूर्ण बदल झाला आहे. मद्यपानाचे प्रमाण कमी होत आहे. धार्मिक जीवनात मोठ्या प्रमाणात 'सातत्य' दिसून येते. ग्रामीण भागात हे सातत्याचे प्रमाण जास्त असून शहर महानगरात सातत्य विच्छेदाची मात्रा वाढत आहे. या सत्ता विच्छेदातून संस्कृतीकरणास चालना प्राप्त होते आणि इहनिष्ठ वर्तनाची जोपासना केली जात आहे.

## राजकीय जीवन–

राजकीय क्षेत्रातील सत्ता व अधिकाराच्या बाबतीत मांग जात उपेक्षित होती. ग्रामीण स्तरावरील राजकीय व्यवहारात त्यांना कोणतेही अधिकार नव्हते. त्यामुळे या जातीत राजकीय सहभागाची आकांक्षा नसणे स्वाभाविक दिसते. परंतु १९ व्य शतकांतील परिवर्तनास प्रेरित करणाऱ्या घटनांमुळे पुण्यासारख्या शहरात राहणाऱ्या लहुजीबुवा साळवे यांच्या मनांत जाती उन्नतीची आकांक्षा निर्माण झाली. म. फुले. यांच्या समवेत त्यांनी कार्य केले. राजकीय जीवनातील सहभागाला प्रेरणा प्राप्त झाली. परंतु राजकीय क्षेत्रातील सहभागास विशेष गती प्राप्त झाली. ती २० व्या शतकाच्या आरंभापासुन. अर्थात असा राजकीय सहभाग शहर महानगरात संभव होता. मुंबई, पुणे आणि विदर्भात नागपूर हे त्याचे केंद्र होते. मांग जाती सदस्यांनी या काळात 'जाती सभांची स्थापना 'केली. ठिकठिकाणी प्रचार, सभा, संमेलने, प्रचारदौरे, काढून लोक–जागृती करण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी ठराव करणे, शासनाला विनंती करणे, वर्तमान पत्र काढणे, इत्यादि लोकशाही प्रणीत मार्गाचा अवलंब केला. त्यातुन मांग जातीचा राजकीय सहभाग वाढू लागला. जाती संस्तरणातील वरच्या जातीकडे गाऱ्हाणी नेण्याऐवजी शासनाकडे अर्ज विनंत्या करण्यात आल्या. समाजनेत्यांनी इग्रंजा प्रति निष्ठा जाहीर केली(१९२३). परंतु त्यांच बरोबर डॉ. आंबेडकर याच्या चळवळीला विरोध करण्यात आला. मंदिर– प्रवेश सत्याग्रहाच्या वेळी मांग जाती नेत्यांनी नकारात्मक भुमीका घेतली. विदर्भ परिसरात मात्र काही नेत्यांनी डॉ. आंबेडकर चळवळीला पाठिंबा दिल्याचे दिसते. म्हणजेच काही भाग मांग जाती घटकांनी या चळवळीविषयी परस्पर विरोधी भूमिका घेतलेली

दिसते. म. गांधी जाती सदस्यांचा सहभाग होता. हे प्रमाण गावापेक्षा शहर व महानगरात जास्त होते. याच काळात काँग्रेस पक्षाशी मांग जातीची बांधिलकी निर्माण झाली. ही बांधिलकी 'महार जात ' 'रिपब्लीकन पक्ष' आणि आंबेडकरी चळवळीला नकारात्मक संदर्भ समूह मानल्यामुळे आणखीच दृढ झाली. या सर्व स्तरावरील सहभागामुळे तसेच मतदानातील समान अधिकार, राखीव जागामुळे राजकीय विजनवासात असलेल्या मांग जातीत राजकीय सहभागाचे प्रमाण वाढू लागले. ह्या गोष्टी या जातीच्या राजकीय आधुनिकीकरणाचे संकेत ठरले. डॉ. आंबेडकरांची चळवळ 'संकुचित ' नव्हती . तिला सार्वत्रिकतेचे परिमाण होते. परंतु मांग जाती घटकांनी या चळवळीकडे 'महारजाती ' पुरती मर्यादित चळवळ म्हणून पाहिले आणि या दोन जातीमध्ये आणखी अंतर वाढत गेले. स्वांतत्र्योत्तर काळात मांग जातीचा राजकीय सहभाग पूर्वीपेक्षा वाढलेला दिसतो. परंतु राजकीय पक्षाचे सदस्यत्व फारच कमी लोकांनी स्विकारलेले दिसते. बहुतांशी लोकांनी 'आय कॉंग्रेस' चे सदस्यत्व स्विकारण्याची आकांक्षा केली आहे. रिपब्लीकन पार्टीत सहभागी होण्याची कुणाचीही आकांक्षा नाही. राजकीय आंदोलनात सहभागी होणे आणि अधिवेशनाला उपस्थित राहणाऱ्यांचे प्रमाण कमी आहे. निवडणूक लढविणारांचे प्रमाण दहा टक्क्यांचे आसपास दिसते. यापैकी बहुतांशी लोकांनी ग्रामपंचायती आणि नगर /महानगरपालिकेची निवडणूक लढविली आहे. निरक्षरता, गरिबी, राजकीय ज्ञानाचा अभाव, योग्य नेतृत्वाचा अभाव वेगवेगळ्या प्रकारचे दबाव व अन्य कारणांमुळे राजकीय सहभागावर मर्यादा पडलेल्या दिसतात. मतदानातील सहभाग सर्वात जास्त दिसतो. राजकीय समाजीकरण राजकीय ज्ञान व राजकीय जाणीवेमुळे मतदानातील सहभाग वाढतो हे सत्य असले तरी 'मतदान करण्याचा आम्हाला हक्क ' आहे ही जाणीव निम्नस्तरातील लोकांमध्ये इतकी प्रचंड असते की त्यामुळे मतदानातील सहभाग वाढतो . दुसरे म्हणजे वरच्या स्तरातील लोकांचे भवितव्य आम्ही ठरवू शकतो. या भावनेतून मतदान वाढतो आणि काही वेळा दडपशाही, लाचलुचपतीतून मतदान सहभाग वाढतांना दिसतो. मतदानाच्या निकषात लोकांनी राजकीय पक्ष, उमेदवाराची योग्यता आणि सेवा

कार्यास प्राधान्यानुसार दिला आहे बहुतांशी लोक मतदानासाठी इतरांचा सल्ला घेत नाहीत. परंतु कुटुंबातील सदस्यांनी कसे मतदान करावे. या विषयी सल्ला घेतात. मतदानाविषयी लोकांच्या जाणीवा प्रगल्भ होत आहेत मतदान हा घटनेने दिलेला अधिकार असून ते नागरिक म्हणूनच आमचे कर्तव्य आहे असे बहुतांशी लोक मानतात.

मांग जातीत परंपरागत (पंचायती ) नेतृत्वाचे ऐवजी आधुनिक लोकशाही नेतृत्व उदयास येत आहे. शिक्षित , दुरदृष्टि साहस व समाजकार्याची तळमळ असणारा वर्ग जातीचे नेतृत्व करू लागलेला दिसतो. अशा नेत्यांची संख्या इतर जातीचे तुलनेत कमी आहे. लोकांना ग्रामीण शहरी भागात नेत्यांची विशेष माहिती नाही. परंतु महानगरातील लोकांना याची जाण आहे. तळागाळातल्या लोकापर्यंत हे नेतृत्व पोहोचलेले दिसत नाही तसेच परस्परातील हेवेदावे, संशयी मनोवृत्तीमुळे नेतृत्वावर तितका विश्वास नाही. सर्वसाधारण ग्रामीण निरक्षर लोकांना राजकीय ज्ञान कमी आहे. शहर व महानगरातील उच्चशिक्षितांना रजकीय घटनांचे ज्ञान बरेच आहे. कारण वर्तमानपत्र , रेडिओ वरून बातम्या ऐकणे, राजकीय अधिकाराची जाणीव असणे व शासनाने काय केले पाहिजे? या विषयी मतप्रदर्शन करणे इत्यादी गोष्टीपासून त्याचे प्रत्यंतर येते. मांग जाती सदस्यांमध्ये राजकीय सत्तेतील सहभागाची आकांक्षा वाढलेली आहे. आणि राजकीय सत्ताप्राप्ती साठी संघटन, लोकजागृती , सभासमेलनाचे आयोजन , प्रसंगी संघर्ष , नेतृत्व, शिक्षण प्रसार इत्यादी लोकशाही मार्गाचा अवलंब करण्याचे त्यांनी हेरले आहे. अर्थात ग्रामीण भागात व निरक्षर, अल्पशिक्षितांमध्ये अशा सहभागाची आकांक्षा मर्यादित आहे.लोकांनी जातीतील पारंपारीक संकेत व न्यायापेक्षा शासकीय कायदे व न्यायास योग्य मानले आहे. मात्र ग्रामीण निरक्षरांनी परंपरेला जवळ केले आहे. बहुतांशी लोक जातीतील भांडणे जाती पंचायतीत सोडवावी असे मानतात आणि फारच कमी न्यायालयातून सोडवावी असे म्हणतात. अर्थात त्यामागे काही तर्क संगत कारणे दिसतात. लोकांची आर्थिक स्थिती , निरक्षरता , न्याायालयातील दिरंगाईमुळे लोक न्यायालयास भितात. अशारितीने मांग

जातीत राजकीय समाजीकरण, राजकीय, सहभाग, मतदानाचे निवडणूक लढविण्याचे अधिकार यामुळे एक नविन पर्व सुरू झाले आहे. शहरीकरण व शिक्षणाच्या वरच्या टप्प्याचे अनुषंगाने या जातीत आधुनिकरणाची प्रक्रिया चांगले मूळ धरू लागली आहे. अर्थात या क्षेत्रातही परंपरा व आधुनिकतेच संमिश्रण प्रत्ययास येते.

शिक्षण–

मांग जात शिक्षणाच्या बाबतीत अनाधिकारी होती. ब्रिटिशांच्या आगमना नंतर या जाती सदस्यांना शिक्षणाची संधी मिळाली. समाज सुधारकांनी शाळा, वस्तीगृहे उघडून शिक्षणास चालना दिली. जातीतील धुरिणांनी शैक्षणिक जागृती केली. स्वातंत्र्यानंतर शासनाच्या धोरणामुळे अनेक सोयी सवलती उपलब्ध झाल्या आणि मांग जातीत शिक्षणाची आकांक्षा वाढू लागली. परंतु इतर जातीच्या तुलनेत मांग जातीत शिक्षणाचे प्रमाण कमी दिसते. ग्रामीण भागातील तसेच निरक्षर व निम्नशिक्षितांचा शिक्षणासंबंधी दृष्टिकोन पारंपारिक स्वरूपाचा आहे. मुलींना शिक्षणातील समानसंधी त्यांनी नाकारली आहे. शहरीकरण व शिक्षणाच्या वरच्या टप्प्यांवर मात्र मुलामुलींना समानसंधी असावी असे मान्य केले आहे. वरच्या टप्प्यावरील लोकांची मुलांबाबत उन्नत आकांक्षा दिसते. शिक्षणात बरेच अडथळे असले तरी शिक्षणासाठी आवश्यक ते उपाय करण्याची तयारी शहरीकरण व शिक्षणाच्या वरच्या स्तरात जास्त आहे. या जातीतील गरिबी अज्ञानामुळे मुलांच्या शिक्षणावर विपरित परिणाम झाला. असला तरी शिक्षण म्हणजे भविष्याकालीन गुंतवणूक आहे, अशी लोकांची धारणा वाढत आहे. शिकलेल्या लोकांमध्ये 'दूरीभवन' दिसून येत असले तरी शिकलेल्यापैकी बरेच जास्तीच्या जबाबदाऱ्या मानीत आहे. जातीविषयीच्या आस्थेतून सुशिक्षितांचा वर्ग समाजाचे नेतृत्व करित आहे. शिक्षणाने व्यक्तीचा विकास होतो. प्रगती होते. नवीन व्यवसाय करता येतात. समाजाला प्रतिष्ठा मिळते यावर लोकांचा विश्वास वाढत आहे. शिक्षणावरील खर्च म्हणजे अपव्यय , दैवावर भरवसा ठेवण्याला लोकांनी नकार दिला आहे . मांग जातीच्या मागासलेपणासाठी शिक्षणाचा

अभाव हे मुख्य कारण आहे. लोकांना पटलेले दिसते. मांग जात सदस्यांना शैक्षणिक सोयी सवलती संबंधी असलेली माहिती कमी असली तरी वरच्या टप्प्यावर ती जास्त आहे. लोकांमध्ये शैक्षणिक जागृती निर्माण होऊ लागली आहे. जातीसभेचे नेते, साधू यांची भूमिका यात महत्वाची आहे. प्रौढ शिक्षणाबाबत मात्र उदासिनता दिसून येते.

## जाती संघटना –

मांग जातीतील लोकांच्या वर्तनाचे नियंत्रण, न्यायदान व जाती विषयक सर्व व्यवहार जाती पंचायती कडून संपन्न होते. आजही जाती पंचायती आहेत. परंतु त्यातील सदस्यात्वाचे निकष न्यायदा दडांची पध्दती बदलेली दिसते. जाती पंचायतीला उपस्थिती राहणे व जाती पंचायतीने दिलेला निर्णय मानणाऱ्याचे प्रमाण महत्तम आहे. परंतु शहर–महानगरात आणि वरच्या शैक्षणिक स्तरांतील लोकांमध्ये हा प्रभाव घटत आहे. जाती पंचायतीची कामे नियत्रण आणि न्यायदाना पुरती सिमित होती. आता मांग जातीत 'जाती मंडळे' स्थापन झाली आहेत. मांग जाती मंडळाची स्थापना २० व्या शतकाच्या प्रारंभी झालेली दिसत असली तरी १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून तशी पार्श्वभूमी तयार झालेली दिसते या जाती मंडळांनी ' जाती उध्दार–विकासाचे दिशेने भरीव प्रयत्न केलेले दिसतात.शाळा, वस्तीगृहे काढणे घरे बांधण्सास जमिनी आर्थिक मदत प्राप्त करणे, त्याच बरोबर वाईट सवयी, , आचार, अंधश्रध्दांचे निमूर्लन करणे, वर्तमान पत्र चालविणे , सभा संमेलने घेणे, स्त्रियांनी या प्रक्रियेत सहभागी करणे हे कार्य मांग जातीतील अभिजनांनी केलेले दिसते.विदर्भ परिसरात जाती मंडळांनी शाळा, ग्रंथालये ,बालमंदिरे, सहकारी संस्था आरंभ करून सभा संमेलनातून लोक जागृती केल्याचे आढळेत. संस्कृती करणाच्या प्रक्रियेते जाती सभांनी दिलेले योगदान उल्लेखनीय दिसते. बृहत परंपरेशी संबंध जोडणे आपण क्षत्रिय वर्णाचे आहोत पराक्रमी आहोत, असे प्रतिपादन करून नवीन प्रतिके निर्माण करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. या जाती संघटनांमध्ये शहर–महानगरातील लोकांचा व मध्यम उच्चशिक्षितांचा सहभाग जास्त दिसतो. हे लोक अशा संघटनांचे

सदस्य असून, संघटनांच्या कार्यक्रमात सभांना उपस्थित राहतात. मांग जातीत युवक व महिलांच्या संघटना आहेत. परंतु त्या तितक्या प्रभावी नाहीत. ह्या संघटनांचे शहर महानगर हे केंद्र असलेले दिसते आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेस गतिमान करणारा एक अंतर्जनित कारक म्हणून जाती सभा मोलाची भूमिका वठवित आहेत.

विदर्भात 'मांतग संघर्ष समिती' ही मांग जातीसभा प्रधान असून स्वजाती उध्दारासाठी 'शिका , संघटित व्हा व संघर्ष करा' या विचारास त्यांनी मध्यवर्ती मानले आहे. परंपरेपासून आधुनिकतेकडे नेणे हे त्यांचे ध्येय दिसते. परंतु या जाती सभेविषयी ग्रामीण लोकांना फार कमी माहिती आहे. सभेची बांधणी नियोजन पूर्वक झालेली नाही. मर्यादित लोकांपर्यत या सभेचे कार्य पोहोचलेले आहे. त्यामूळे फार कमी लोक संघटनेच्या बैठकी / परिषदांना उपस्थित असलेले दिसतात. या जातीत वृत्तपत्रे व मासिके अत्यंत मर्यादित आहेत. संघटनेचे मुखपत्र नाही. या जाती संघटनेच्या नेत्यांना मर्यादित लोक आपले नेते मानतात. मांग जातीतील मागासलेपणाची जाणीव लोकमनात वाढली आहे. आपली जात अनुसूचित जाती गटात वंचित आहे, ही जाणीव प्रकर्षाने दिसते. त्यासाठी जातीतील वाईट गुणांचे निर्मुलन केले पाहिजे. प्रश्नांना अग्रक्रम देऊन त्यांच्या सोडवणूकीच्या दिशेने प्रयत्न करण्याची जाणीव वाढत आहे. ग्रामीण व निरक्षर निम्नशिक्षितांपेक्षा शहर–महानगरातील व मध्यम व उच्चशिक्षितांमध्ये आधुनिक अभिवृत्ती प्रत्ययास येते. लहान कुटुंब, नवे विचार, ज्ञानलालसा, नवी जीवन दृष्टि, प्रयत्नशीलता , विज्ञाननिष्ठा , तर्कसंगतात जबाबदारी स्विकारण्याची तयारी गतिशीलता , दीर्घकालीन संतोषाची अभिलांषा आणि परिवर्तनावर विश्वास तसेच अर्जित निर्धारकांना महत्व देण्याची प्रवृत्ती वाढत आहे. प्रस्तुत अध्ययनातील सारांश रूपाने मांडलेल्या सामग्री वरून भारतीय समाज व्यवस्थेतील सूक्ष्म संरचना असलेल्या मांग जातीत आधुनिकीकरणाप्रत , शहरीकरण, शिक्षणाचा प्रसार लोकशाही जीवन प्रणाली दळणवळण विचारांमुळे अनेकांगी बदल घडत आहेत. भारतीय समाजातील सर्वात खालच्या स्तराशी संबध असलेल्या या जातीत घडू लागलेले बदल

आशादायक आहे. या जातीतील लोकांमध्ये आधुनिकीकरणाची आकांक्षा इतर जाती गटांच्या तुलनेत कमी असली तरी खालच्या जातीचे जीवन स्थितीवत आहे . या कथनाला खोडून काढणारे निष्कर्ष या अभ्यासात गवसले आहेत. डॉ.एम.एन श्रीनिवास ,डॉ.जी.एस. धुर्ये व अनेक अभ्यासकांनी सुध्दा जाती गटातील विविध अंगातील परिवर्तनाचा उल्लेख केलेला आहे.

## परंपरा आणि आधुनिकता –

मांग जाती सदस्यांची ग्रामीण भागात परेंपरेशी जवळीक जास्त आहे . परंतु त्या तुलनते शहर महानगरात आधुनिकतेची आकांक्षा आपले लक्ष्य वेधते. ग्रामीण भागातील लोकांच्या निवास विषयक आकांक्षा मर्यादित आहे. पारंपारिक व्यवसायात ते गुंतले आहेत. काही लोक बलुतेदारीशी संबधी आहेत. जाती गटात विवाह करण्यास प्राधन्य देणे. जवळच्या क्षेत्रात विवाहास संमती देणे, आंतरजातीय विवाहसंबंधी अनास्था असणे, ठरविलेल्या विवाहास प्राधान्य देणे.वर वधू निवडीचे परपरागत निकष कवटाळणे . कुटुंबातील निर्णय प्रक्रियेत पुरूषांना प्राधान्य देणे. मुला पेक्षा मुलींच्या शिक्षणाविषयी निम्न पातळीची आकांक्षा , स्वयंवरावरील जास्तीचा खर्च , नियोजनाचा बचतीचा अभाव, राजकीय सहभागाचे कमी प्रमाण आणि जाती सभांच्या कामकाजाविषयी अनास्था , विटाळ व शुध्दतेच्या धारणांना महत्व , अमावस्या ,ग्रहण मागण्याची पध्दती, जादूटोण्यावर विश्वास इत्यादी वर्तनातून पारंपारिकतेचे स्पष्टीकरण होते. ग्रामीण भागातील पारंपरिकतेचे चित्रण ही एक बाजू म्हणता येईल. कारण या क्षेत्रातील सुशिक्षित लोकांमध्ये , ज्यांचे नातेवाईक शहारात आहेत अशा कुटुंबामध्ये आधुनिकीकरणाची आस्था दिसून येते. बऱ्याचशा लोकांनी पारंपरिक व्यवसायाऐवजी शेतीची कामे आरंभ केली बॅंड मध्ये लोक काम करू लागले. अमावस्या ग्रहण मागणे लोकांनी सोडून दिले. मृत जनावरांचे मांस खाने अयोग्य मानल्या जाऊ लागले. ग्रामीण क्षेत्रापेक्षा शहर व त्यापेक्षाही महानगरात आधुनिकतेचे प्रमाण जास्त आहे. निवासाची उन्नत आकांक्षा , सुशिक्षित लोकांचा शेजार, आधुनिक व्यवसाय , प्रारंभिक कुटुंब प्रणाली, एका विवाहावरील विश्वास, जाती पंचायती

ऐवजी जाती सभांना दिल्या जाणारे महत्व, मुला मुलींना समान शिक्षण देण्याची अभिवृत्ती कौटुंबिक निर्णयास सदस्यांच्या सहभागाचे वाढते प्रमाण, राजकीय सहभाग, राजकीय ज्ञानाची वरची पातळी, अर्जित दर्जा व भूमिकेची आकांक्षा , बलुतेदारीचा ऱ्हास, खुल्या समाजातील सहभाग, वरच्या जाती गटाशी असलेल्या संबंधात वाढ , बृहतपरंपरेचा स्वीकार व लघुपरंपरेस नकार इत्यादी विभिन्न गोष्टीतून आधुनिकीकरणाच्या प्रति वाढलेली आस्था लक्षात येते. मात्र ग्रामीण समाजात संपूर्ण परंपराधिष्ठा आणि शहर–महानगरात तसेच उच्च शिक्षितांमध्ये संपूर्ण आधुनिकता आहे असे म्हणता येत नाही . ग्रामीण भागातील मांग जाती सदस्यांमध्ये जशी आधुनिकतेची अभिलाषा आहे. त्याच प्रमाणे शहरीकरणाच्या उन्नत पातळीवर काही नवस करणे, मरिआईची पूजा ,शपथ घेणे, जादूवर विश्वास ,इत्यादी तत्वे पारंपरिकतेचे स्पष्टीकरण करतात. सारांश, मांग जातीमध्ये पारंपारिकता आणि आधुनिकतेचे संमिश्रण दिसते. तसेच ग्रामीण भागापेक्षा शहर–महानगरात पारंपारिकतेच प्रमाण कमी असून आधुनिकतेचे प्रमाण जास्त दिसते.

## लघु व बृहतपरंपरा–

हिंदू समाजात व्यवस्थेत मांग जातीला अस्पृश्य म्हणून गणले जाई. धार्मिक संरचनेत त्यांचे स्थान सर्वात खालचे होते ग्रामीण सण उत्सव व समारंभात त्यांचा सहभाग असला तरी त्यात 'सामाजिक दुरत्व ' राखले जाई. उच्च जातीच्या मंदिरात प्रवेश, देवदेवतांची पूजाअर्चा, ब्राम्हणाचे मार्गदर्शन विवाहाचे वैदिक –पौराणिक विधी तसेच यांचा करण्याचा त्यांना अधिकार नव्हता त्यांना सर्वार्थाने अयोग्य मानले जाईल. परंतु शहरी करण शिक्षणाचा प्रचार नवीन व्यवसायाचा स्विकार. आर्थिक दशेतील सुधारामूळे धार्मिक क्षेत्राला बंदिस्तपणा संपू लागला. साधू त्यांनी केलेली प्रवचने, किर्तन, आणि शहरीकरणातील खुल्या जीवन प्रणालीने बृहतपरंपरेतील देवीदेवतांची पूजाअर्चा , सत्यनारायण पूजा, ब्राम्हणाचे मार्गदर्शन , पंढरपूर, तिरूपती येथे यात्रा करणे बृहतपरंपरेशी संबंध दर्शविणाऱ्या जाती उत्पत्ती कथा , क्षत्रिय वर्णाची अभिलाषा निर्माण दिसते. यातुन बृहतपरंपराच्या

स्विकाराचे प्रयत्न लक्षात येतात. ग्रामीण भागात मात्र लघुपरंपरा प्राधान्याने दिसतात, मरिआई, यमाई, जोखाई, इनाईची पूजा करणे ,बळी देणे, नवस करणे, शपथ दिव्य , अमावस्या, ग्रहण मागणे आणि जादूटोण्यावर विश्वास , भागातील उपचार इत्यादी गोष्टीतून त्यांचे स्पष्टीकरण होते. अर्थात ग्रामीण भागातील मांग जातीत लघुपरंपरांच्या ऐवजी बृहतपरंपरा प्रचलीत होण्याची प्रक्रिया कार्यान्वित आहे. अंतरीकरणाची मात्रा जास्त आहे. आर्थिकदृष्ट्या सबळ असलेल्या मांग जाती सदस्यांमध्ये बृहतपरंपराप्रती विशेष अभिमुखता दिसते, गणपती ,महादेव, दुर्गेची पूजा करणे, प्रसिध्द यात्रांना जाणे जावळ देणे, अस्थि विजर्सनासाठी तिर्थक्षेत्री जाण्याचे प्रमाण जास्त आहे. तसेच श्रावण महिन्यात उपास करणे, धर्मग्रंथाचे पठन, भोजन देणे, विवाहात सप्तपदी, होमहवन करणे, इत्यादी कर्मकांडातून म्हणजेच बृहतपरंपरेच्या स्विकारातून जातीचा दर्जा उंचावण्याचे प्रयत्न होत आहेत.

## सामाजिक गतिशीलता –

या शतकात आरंभी मांग जातीत सामाजिक गतिशीलतेचा अभाव होतो. ग्रामीण समुदाय संबंध्दता, बलुतेदारी, बंदिस्त जीवन, अस्पृश्यतेची बंधने ,जन्माने प्राप्त होणारे जाती व्यवसाय आणि वरच्या जातींच्या दबावामुळे या जातीत गतिशीलता हे स्वप्न होते. परंतु समाज संरचनेतील बहिर्गत व अंर्तजनित कारकांच्या प्रभावतून परिवर्तनाची आकांक्षा लोकांच्या मनात निर्माण झाली. औद्योगिकरण, शहरीकरण, शिक्षण प्रसार, जाती सभांचे कार्य इत्यादी घटकांनी ग्रामीण जीवनात नातेवाईकांच्या भेटी , विवाह व जवळची यात्रा व  वस्तुच्या खेरदीसाठी बाहेर पडणारे लोक, शहरात सस्थलांतरीत झाले. यात्रांना दूरवर जाऊ लागले. उत्पादित वस्तुंची विक्री शहर–महानगरात करू लागले. एकप्रकारे मांग जातीत ''क्षेत्रिय गतिशीलता '' प्रत्ययास आली. शिक्षण घेतलेल्या व्यक्ती शहर महानगरात नौकरीसाठी व इतर व्यक्ती व्यवसाय करण्याचे हेतूने गेल्या कारणाने 'वैयक्तिक गतिशीलता ' प्रत्ययास आली. अशा व्यक्तींनी त्यांचे समवेत कुटुंबियांना नेल्यामुळे ग्रामीण भागातील

कुटुंबांचे शहर, महानगरात स्थलांतर झाले म्हणजेच 'कुटुंब गतिशीलता ' दिसून आली. शहर महानगरात व्यक्तिस अनेक व्यवसाय करता येतात, कोणते ना कोणते काम मिळते या धोरणामूळे शहरात राहणाऱ्या लोकांनी नातेवाईकांविषयी विशेष उत्तरदायित्वाची भावना ठेवून नातेवाईकांना शहरात बोलाविले. त्यांना आश्रय दिला आणि व्यवसायासाठी मदत केली. त्या कारणाने मर्यादित प्रमाणात का होईना आप्तसंबंधी गटातील गतिशिलता साकार झाली! जाती आणि परंपरागत व्यवसायांचे साहचर्य असल्या कारणाने व्यक्तीस जाती व्यवसाय सोडून दुसरा व्यवसाय स्विकारता येत नव्हता. एखाद्याने आकांक्षा बाळगली तर वरच्या जातीचा दबाव होताच परंतु त्या बरोबर जाती पंचायतीच्या दृष्टिने असा व्यवसाय जाती परंपरेच्या विरूध्द होता. मांग जातीतील हे व्यवसायाचे सहचार्य आता बंधन कारक राहीलेले नाही व्यवसाय निवडीचा अधिकार व्यक्तिस प्राप्त झाला आहे. गावात वेगळा व्यवसाय करणाऱ्या व्यक्ति संबंधीत साचेबंद कल्पना दिसतात. परंतु कोणीही विरोध करीत नाही. व्यक्तिने आरंभी केलेला जातीगत व्यवसाय सोडून वरच्या श्रेणीतील व्यवसायची निवड करणे म्हणजे पिढी अतर्गत व्यावसायीक गतिशीलता संभव झाली आहे. उदा. फडे, सुप तयार करणे, डफडे वाजविणारी व्यक्ति शिक्षक होणे. त्याच प्रमाणे आजोबांनी केलेले व्यवसाय वडीलांनी सोडले किंवा वडिलांचे पारंपारिक व्यवसाय उत्तरदात्यांनी सोडून दूसरे प्रगत व्यवसाय स्विकारलेले दिसतात. याला आतंरपिढी व्यावसायीक गतिशीलता म्हणून संबोधावे लागेल. मांग जातीत ग्रामीण भागापेक्षा शहर महानगरात ही गतिशीलता प्राधान्याने दिसते. जाती संबंधी केलेल्या प्रयत्नांचे स्वरूप पाहिले म्हणजे त्यात व्यक्ति गतिशिलता किंवा कुटुंब गतिशीलते पेक्षा सामुदायिक गतिशीलतेची आकांक्षा दिसते कारण जाती सभांचे जातीहित केंद्रिय मानून केलेले आढळते. मांग जाती सदस्यांनी शिक्षण द्यावे. ग्रहण मांगणे बंद करावे , मृत जनावरांचे मांस खाऊ नये. संघटित झाले पाहिजे. वेळ पडल्यास संघर्ष करण्याची तयारी असावी. या सारख्या आवाहनातून सद्य स्थितीपासून उन्नत स्थितीकडे नेण्याची आकांक्षा दिसते. म्हणजेच जाती सभांचे 'सामुदायिक गतिशीलता ' हे लक्षण आढळते.

जाती गटांमध्ये 'समतल गतिशिलता' संभव होती. व्यक्ती त्या जातीच्या कक्षेत एका स्थानापासून दुसऱ्या स्थानाप्रत संक्रमित होते. परंतु ''उदग्र गतिशीलता '' शक्य नव्हती व्यक्तींचा दर्जा स्थायी होता. परंतु सद्यकाळात मांग जातीत वर उल्लेखलेल्या कारकांच्या प्रभावाने ''उदग्र गतिशीलता'' प्रत्ययास येत आहे. आधुनिक व्यवसाय, नोकरी व व्यापाराच्या स्विकारातून तर हे घडतेच परंतु संस्कृतीकरणाच्या प्रक्रियेत बृहत परंपरेच्या स्विकारातून सुध्दा याचे प्रत्यंतर येते. सुनंदा पटवर्धन (१९७३: १९७)यांनी मांग जातीचे ''कर्मकांड , आर्थिक व मानसिक दृष्ट्या '' एक दबलेला समूह म्हणून वर्णन केले आहे. परंतु आज मांग जाती सदस्यांची मानसिकता बदलत असून त्यांच्या मनात उन्नत आकांक्षा निर्माण होत आहे. जाती सभा, शहरीकरण , नवीन व्यवसाय, सुधारलेली आर्थिक स्थिती आणि परंपरागत दडपणांचा ऱ्हास होत असल्यामुळे उर्ध्वगामी गतिशीलता प्रत्ययास येत आहे.

## संस्कृतीकरण –

ग्रामीण भागात जाती प्रथेच्या 'आवृत्त ' स्वरूपामुळे सांस्कृतिक गतिशीलतेला संधी नव्हती. आजही ग्रामीण भागातील या आवृत्त स्वरूपात कायद्याने बदल झाला. असला तरी प्रत्यक्षात तितके परिवर्तन घडलेले नाही आणि म्हणून संस्कृतीकरणास ग्रामीण भागात तितकी संधी नाही. शहर व महानगरात मात्र मांग जातीत संस्कृतीकरण प्रक्रिया कार्यान्वित होतांना दिसते. संस्कृतीकरण प्रक्रियेत मांग जातीने कोणत्याही एका नमून्यास आदर्श मानलेले नाही. इतके मात्र निश्चित की संस्कृतीकरणातून आधुनिकीकरणाची आकांक्षा अभिव्यक्त होतांना प्रत्ययास येते.मांग जातीचा निर्देश 'मातंग' असा करावा 'मातंग ' म्हणजे 'महापराक्रमी ' आपण क्षत्रिय वर्णाचे आहोत . मातंग ऋषीचे अपत्य आहोत. सुर्य चंद्रापासुन उत्पत्ती झालेली आहे या सारख्या कथनातून बृहतपरंपरेशी संबंध स्थापन करण्याची आकांक्षा दिसते. मांग जातीच्या उत्पत्ती कथातून महादेव , सरस्वती, नारद इत्यादींचे येणारे उल्लेख आणि राम, कृष्ण ,इंद्र , शंकर ह्या बृहतपरंपरेतील देवीदेवतांची पूजाअर्चा करण्याच्या

व्यवहारांतून संस्कृतीकरणाची प्रक्रिया स्पष्ट होते. शहर –महानगरातील म्हणजेच शहरीकरणाच्या वरच्या टप्प्यातील सलग्न, उच्च शिक्षित व आर्थिक दृष्ट्या सबल असलेल्या व्यक्ती नामकरण करतांना ब्राम्हणांचा सल्ला घेतात. त्यांनी सांगितल्या प्रमाणे नामकरण करतात. जावळ काढण्यासाठी तिरूपती व अन्य यात्रेच्या ठिकाणी जातात. विवाहातील विधि सप्तपदी, होमहवन करतात, त्यासाठी ब्राम्हणास आंमत्रित केले जाते. श्रावण महिन्यात सत्यनारायणाची कथा , धर्मग्रंथांचे पठण, कीर्तन–प्रवचन यांना महत्व देऊन समाप्ती चे वेळी भोजनाचे आयोजन करतात. गणेशपुजा करणे, उपवास , यात्रेला जाणे, पुजाअर्चा करणे इत्यादी व्यवहारातून वरच्या जातीगटातील , हिंदूच्या जीवन पध्दतीचे अनुकरण केलेले आढळते.

–काही मांग जाती सदस्यांनी आपल्या आडनावात बदल केलेले आहेत–

| मुळचे | बदललेले | मुळचे | बदललेले |
|---|---|---|---|
| बावने | भावे | तिन्नघरे | तिजारे |
| पडघान | प्रधान | पायघाण | प्रधान |
| ठोसर | ठाकरे | घाणकसार | कासार |
| खळे | खरे | हत्तीठेले | हटवार |
| पोटफोडे | पवार | धेनश्वर | धनवाडे |
| साळवे सावरकर | कानफाडे | | |
| हिवराळे | हिवरकर | | |

मांग जातीतील या सर्वच आडनाव धारकांनी आपले ‘अडनाव’ बदलेले नाही. अडनाव बदलणाऱ्यांमध्ये शहरातील शिकलेल्या लोकांचा समावेश आहे. नवीन स्विकारलेली अडनावे ब्राम्हण व बहुजन समाजातील वरच्या जातीची आहेत. जुनी ओळख विसरून वरच्या जाती गटातील समावेशनाची आकांक्षा यामागे दिसते. काही लोकांनी भाऊसाहेब, रावसाहेब अशी उपाख्य नामे

धारण केली असून नामकरणाचे वेळी वरच्या जातीतील नावे स्विकारलेली दिसतात. बँडच्या नावात संतमहंताच्या नामाचा समावेश दिसतो. लोकांनी अमावस्या, ग्रहण मागणे सोडले असून मृतजनावरांचे मांस खाणे वर्ज मानले आहे. शहरीकरणाच्या वरच्या टप्प्यावर कार्यान्वित असलेली ही प्रक्रिया झोपडपट्टया मध्ये जातीचे केंद्रीकरण असल्यामुळे मर्यादित प्रमाणात आहे. या प्रक्रियेत जातीतील अभिजन क्षत्रिय नमुन्यास अनुकरणीय मानतात. परंतु त्यापेक्षा हिंदू धर्मातील 'वरच्या जाती' सांस्कृतिक जीवन पध्दतीच्या अनुकरणातून वरच्या जातींशी समायोजनाची प्रक्रिया सुलभ बनते. लोकमनात समावेशनाची आकांक्षा असली तरी असे कार्य सातत्याने कित्येक पिढ्या कार्यान्वित होण्याची गरज असते. सारांश, या रितीने विदर्भातील मांग जातीत संस्कृतीकरणाच्या प्रक्रियेतून आधुनिकीकरणाची प्रक्रिया कार्यान्वित असल्याने लक्षात येते.

## संदर्भ समूह –

भारतीय समाजाच्या 'आवृत्त ' स्वरूपामुळे समाजसंरचेनतील सर्वात शेवटच्या पायरीवर असणाऱ्या मांग जाती घटकात उन्नत जीवनाची आकांक्षा निर्माण होणे अशक्यप्राय होते. अनेक प्रकारच्या बंदीमुळे 'बंदिस्त ' जीवन जगण्यातच यथार्थता आहे हे सर्वसामन्य तथ्य होते. य ा कालखंडात ग्रामीण जीवनातील पददलीतामध्ये सजातियता नव्हती. त्यांच्यात संस्तरण आणि स्पृश्य –अस्पृश्यता होती. मांग आणि महार जातींमध्ये महार वरचे व मांग खालचे मानले जाई. या दोन जातीत परंपरेने चालत आलेला विरोध जोपासलेला होता. पेशवाईच्या काळात त्यांच्यातील भांडणे सरकार दरबारी गेल्याचे दिसते. (श. ना. जोशी १९ ) त्यानंतरच्या कालखंडात सुध्दा महार मांग विरोध प्रत्ययास येतो. त्यामुळे ग्रामीण भागात महार जात हा मांग जाती सदस्यांच्या दृष्टिने ''नकारात्मक संदर्भ समूह '' ठरला डॉ. आंबेडकरप्रणीत मंदिर प्रवेश , महाडच्या चवदार तळ्याचा सत्याग्रह आणि एकूण आंबेडकरी आंदोलनाविषयी बहूतांशी मांग जाती सदस्यांची भूमिका विरोधी होती. त्यांच्या लेखी 'वरच्या हिंदू जाती ' हा ''संकारात्मक संदर्भ समूह '' होता. ग्रमीण

क्षेत्रातील वरच्या जातीवर अवलंबून असणारे जीवन आणि गतानुगतिक अभिवृत्तीमुळे 'वरच्या जाती रांदर्भ समूह ' मानण्यात आल्या. १९५६ साली बाबासाहेब आंबेडकरांनी बौध्द धर्माचा स्वीकार केल्या नंतर मांग जाती सदस्यांच्या दृष्टिने ''बौध्द'' नकारात्मक संदर्भ समूह ' ठरले. बौध्दांनी ग्रामीण भागात टाकून दिलेली बलुतेदारी पध्दतीतील कामे मांग जाती सदस्यांनी स्वीकारली . त्यामुळे बौध्दांप्रती नकारात्मक आणि हिंदू धर्मातील वरच्या जातीप्रती सकारात्मकता वाढत गेली.

डॉ. आंबेडकरांनी स्थापन केलेल्या 'रिपब्लीकन ' पक्षांचा मांग जाती सदस्यांनी विरोध करून काँग्रेसशी बांधिलकी ठेवली. म्हणजेच पक्षाच्या संदर्भात मांग जातीचे दृष्टिने 'रिपब्लीकन' पक्ष नकारात्मक संदर्भ समूह आणि कॉंग्रेसपक्ष सकारात्मक संदर्भ समूह बनल्याचे दिसते. 'बौध्द धर्मिय' नकारात्मक संदर्भ समूह मानल्यामुळे मांग जातीतील संस्कृती करणाला चालना मिळाली . प्राधान्याने उच्च जीवनामान असणारे लोक हिदूधर्मा जीवन पध्दतीचे मोठ्या प्रमाणात अनुकरण करू लागले. म्हणजेच बौध्द धर्मियांच्या नकारात्मकतेतून मांग जातीत हिंदूधर्म जीवन शैलीच्या स्वीकाराची सकारात्मकता वाढत गेली. स्वातंत्र्योत्तर कालखंडात अनुसूचित जाती सदस्यांना सारखे लाभ मिळण्याची तजविज असली तरी विशेष जागृत असलेल्या बौध्द धर्मियांनी त्याचा महत्तम लाभ घेतला. या टप्प्यावर मांग जातीतील अभिजन बौध्द धर्मियांशी तुलना करू लागले. तेव्हा त्यांना अनुसूचित जाती गटात आपण सर्वात जास्त वंचित असल्याचे सद्यकाळात मांग जातीतील काही अभिजन ''आंबेडकरी तत्वज्ञानास '' आत्मसात करण्याचे आवाहन करतांना दिसतात. 'शिका, संघटीत व्हा आणि संघर्ष करा' ह्या सूत्रास मान्यता देतात आणि याच धर्तिवर जाती सभांच्या माध्यमातून स्वजाती उध्दार व उन्नतीची आकांक्षा करतात. या अभिजनांनी 'आंबेडकरी चळवळीला' सकारात्मक मानलेले दिसते. अशा प्रकारे मांग जातीचे संदर्भात 'अनेक संदर्भ समूह ' दिसतात. एका कालखंडात नकारात्मक असलेला संदर्भ समूह तदनंतर तुलनात्मक आणि सकारात्मक झालेला प्रत्ययास येतो. मांग जातीतील आधुनिकीकरणाची प्रक्रिया या रितीने बहुआयामी असलेली दिसते.

कोणत्याही एकाने नमुन्याचे आधारे या आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेचे चित्रण अपूर्ण ठरते. कारण या जातीत लघुपरपरां ऐवजी बृहतपरंपराचा स्वीकार आणि लघुपरंपरांचे जतन, ग्रामीण भागातील सामाजिक गतिशीलतेची मंद गती आणि शहर महानगरात राहणाऱ्या सदस्यामध्ये व्यापक गतिशीलतेची तीव्रगती ग्रामीण आवृत जीवनातील पारंपारिकता आणि शहरीकरणाच्या वरच्या टप्प्यातील उच्च जीवनमान असणाऱ्या लोकांमध्ये संस्कृतीकरणाची वाढती आस्था, पाश्चिमात्यीकरणाचा विशेषत्वाने दिसणारा तसेच संदर्भ अध्ययनातून प्रत्ययास येणारी उन्नत जीवनाची अभिलाषा लक्षात घेतली म्हणजे मांग जातीतील परंपरा व आधुनिकतेचे संमिश्रण आपले लक्ष वेधते. असे असले तरी नवीन संकेत, विश्वास , मूल्ये, नवी ओळख नवीन श्रध्दास्थाने रूजविण्याचे जाती सभा व अभिजनांचे प्रयत्न या जातीला आधुनिकीरणाकडे संक्रमीत करण्याचे चित्र रेखाटतात.

५) चव्हाण रामनाथ [५](१९९०) –

श्री. रामनाथ चव्हाण यांनी आपल्या जाती आणि जमाती या पुस्तकाव्दारे चर्मकार, मेहतर, ढोर, बुरूड, पद्मशाली, कोल्हाटी, कुडमुडे जोशी, काशी कापडी, धिसाडी परदेशी भोई , वेडू वाधरी , गोपाळ , वैदु, ह्यारे , बेलदार, सिक्कलगार, टकारी , रामोशी, मांगगारूडी, कंजारभट, पारधी, राजगौड मातंग ,ईत्यादी जातीसंबधी सविस्तर विश्लेषण केले असून त्यांच्या मते,अनेक जाती, भाषा व जगातील सर्व धर्म –पंथ असलेला, तरीही विविधतेतून एकता साधाणारा जगाच्या पाठीवरील भारत हा एकमेव देश आहे.या देशातील प्रत्येक जातीनिहाय माणसाच्या जीवनमरणाची संहिता भिन्न भिन्न प्रकारची आहे, प्रत्येकाची जात वेगळी, जगणे –मरणे वेगळे आहे. ज्याने ज्या जातीत जन्मावे , त्याने त्याच जातीत मरावे, हे इथल्या धर्म शास्त्रांचे बंधन, त्यामुळे धर्म, जाती, रूढी परंपरेच्या मर्यादा ओलांडण्याचे धाडस सहसा इथे कोणी करीत नाही. शक्यतो धर्म जातीच्या मर्यादतेच जगण्याचा प्रयत्न इथला प्रत्येक माणूस करीत असतो. अशा या अनेक धर्म असलेल्या समाजव्यवस्थेत जन्मावरून माणसाची जातवार विभागणी तर झालीच आहे. त्यामुळे प्रत्येक जाती

जमातीच्या वस्त्या वेगळ्या , पाणवठे वेगळे, स्मशाने वेगळी किंबहूना त्यांचे जनजीवनच वेगवेगळे झालेले आहे. याला पारंपारीक मंडळी आदर्श? समाजव्यवस्था म्हणतात! डॉ. बाबसाहेब आंबेडकर यासमाजव्यवस्थेला 'उतरंडीची विषम व्यवस्था ' किंवा 'बिनशिडीच्या मनोऱ्याची समाजव्यवस्था ' असे म्हणतात. ही व्यवस्था आजही या देशात टिकून आहे.अशा या उतरंडीच्या किंवा बिनशिडीच्या समाजव्यवस्थेत जगणाऱ्या माणसांना त्यातल्या जाती व्यवस्थेचे भान आहे. जाती –जमातीच्या जगण्या मरण्याचे भान आहे, परंतु इतरांच्या जाती जमाती जगण्या मरण्याचे भान आहे, परंतु इतरांच्या जाती जमातीत डोकावण्याची तसदी सहसा कोणी घेत नाही. त्यामुळे वरकरणी एक असलेली, परंतु जाती जमातींमुळे विभागलेली अशी भारतीय माणसे आहेत. अशा विभागलेल्या काही माणसांचे किंबहुना त्यांच्या काही जती जमातींचे जनजीवन कशा तऱ्हेचे आहे, याची अल्पशी ओळख करून प्रयत्न सदर लेखकाने कला दिसून येतो.हा प्रयत्न काहीसा मर्यादित स्वरूपातला आहे. गावाच्या देशाच्या आतल्या जातींचा विचार तूर्त या पुस्तकात केला नाही. केवळ देशाच्या बाहेरच्या किंवा ज्यांना आजही अस्पृश्य , दलित, हरिजन किंवा मागासवींय म्हणून ओळखले जाते. अशांपैकी मातंग, चर्मकार , ढोरे, आणि मेहतर या जातींचा प्रामुख्याने समावेश केलेला आहे. याशिवाय ज्यांना देशीच्या आतल्याही जगात स्थान मिळाले नाही. आणि वेशी च्या देशीच्या बाहेरही जे स्थिर होऊ शकले नाहीत, परंतु आतल्या आणि बाहेरच्या लोकांना आश्रयाने वर्षानुवर्ष आपली उपजीवीका करीत राहिले , तरीही इथल्या जाती व्यवस्थेचे जे अविभाज्य घटक आहेत, अशा भटक्या आणि विमुक्त या नावाने ओळखल्या जाणाऱ्या काही जमातींचा समावेश केलेला आहे. जाती–जमातींच्या जनजीवनाची ओळख करून देत असताना त्यांच्या जात निर्मितीबाबत पारंपारिक लोककथा , त्यांची संस्कृती, रूढी–परंपरा , त्यांच्या देव–देवता सणवार, उत्सव , विवाहाच्या प्रथा , त्यांची भाषा, व्यवसाय , कला आणि जातपंचायती यांसंबंधीत जातवार माहिती देण्याचा प्रयत्न केलेला आहे. अशा तऱ्हेची माहिती मिळविण्यासाठी जाती –जमातीच्या वेगवेगळ्या थरांतील

अनेक लोकांच्या प्रत्यक्ष मुलाखती घेतलेल्या आहेत. या लोकांनी त्यांच्या जाती-जमाती लोकांच्या प्रत्यक्ष मुलाखती घेतलेल्या आहेत. या लोकांनी त्याच्यां जाती-जमाती विषयी जी माहिती दिली, तीच माहिती या पुस्तकात समाविष्ट केलेली आहे. त्यात काही उणिवा, अपुरेपणा असणे शक्य आहे. परंतु या निमित्याने जी माहिती उपलब्ध झालेली आहे, ती प्रस्तुत पुस्तकामध्ये ज्या जाती जमातीत दिलेल्या आहेत, त्याचा परिचय होण्याइतपत पुरेशी आहे, असे लेखकाला वाटते. वरवर पाहता आपला असा समज असतो, की समाज बदलातोय,जातीय सलोखा वाढतोय, अस्पृश्यता नाहीशी होतेय्, हळूहळू जाती व्यवस्थाही नाहीशी होईल. परंतु आपला समज किंवा बदलाचे आपले निष्कर्ष किती वरवरचे आहेत, हे त्या त्या जाती- जमातीत मिसळल्याशिवाय कळणारे नाहीत. 'दुरून डोंगर साजरे' इतकेच याविषयी म्हणता येईल. कारण वरकरणी जाती- जमातींचा चेहरामोहरा आज बदलतोय् असे वाटत असले, तरी जाती -जमातींच्या अंतरंगातील सनातनी पारंपारिक पीळ आजही कायम आहेत. त्यांच्या मूळ प्रवृत्तीत फारसा बदल झालेला नाही. एकीकडे जाती-जमातींच्या सामाजिक सुधारणेचे प्रयत्न केले जात आहेत. जाती जमातींच्या कोषातून माणसं बाहेर काढण्याचे प्रयत्न चालू आहेत किंवा सामाजिक समता आणि माणसाची माणूस म्हणून असणारी प्रतिष्ठा निर्माण करण्यासाठी सामाजिक चळवळी आणि संघर्ष चालू आहेत.

मात्र दुसरीकडे जाती जमातींच्या भिंती अधिक पक्क्या कशा होतील, यासाठीच, आपली सर्व शक्ती पणाला लावली जात आहे. पर्यायाने इथल्या माणसाला त्याच्या जाती-जमातींच्या कोषात अधिक बंदिस्त कसा करता येईल, याचेच प्रयत्न केले जात आहेत. त्यामुळे जाती जमातीतील माणसे कमीअधिक प्रमाणात सुधारत असली किंवा त्यांची सामाजिक राजकीय, शैक्षणिक आणि आर्थिक अवस्था (गरजेपुरती )बदलत असली, तरी माणसांची मानसिक विचारांची बदलेली नाही. आज जो काही बदल आपल्याला दिसतो आहे, तो व्यक्तिगत पातळीवरील हितसंबंधांतील अथवा कामापूरता तात्कालीन स्वरूपाचा आहे. ज्यांच्या वाट्याला पिढ्या उपेक्षा आली आणि वेशीबाहेरचे

होणे जगणे जगावे लागले, अशा मातंग, चर्मकार , ढोर आणि मेहतर या समाजात अलीकडे सामाजिक बदलाची प्रक्रिया सुरू झालेली आहे. त्यांना सामाजिक बदलाचे भान येऊ लागले आहे, किंबहुना आपल्या अस्तित्वाची जाणीव होऊ लागली आहे; परंतु स्वत:च्या जातीचे पारंपारिक आचार विचार नाकारण्याचे स्पष्ट धाडस त्यांच्याकडून होताना दिसत नाही . आजही धर्मबंधनांत विशिष्ट समाजाच्या दबावाखाली किंवा पारंपारिक रूढीला परंपरचे, आणि जात-व्यवसायात जातीच्या मर्यादेतच जगण्याचा किंवा तडजोड करून समाधान मानण्याचा प्रयत्न केला जात आहे. वरकरणी या समाजाची सुधारणा दिसत असली , तरी जाती-जमातींतील त्यांचे पीळ आणि ताण तणाव आजही कायम आहेत. इतर दलित मागासवर्गीयांची यापेक्षा वेगळी अवस्था नाही. प्रत्येकालाच आपल्या जातीचा अभिमान आहे. जात सोडयला कोणीही तयार नाही. परंतु आपली जातजमात कशी हलाखीत जगतेय् हेही सांगायला कोणी विसरत नाही, असे लेखकाचे मत बनले आहे. इथली जाती व्यवस्था ही वाईट आहे, यावर सर्वांचेच एकमत आहे, परंतु वाईट असलेली जाती-व्यवस्था मोडण्यासाठी भाषा करताना कोणी आढळले नाही, किंवा जाती व्यवस्था मोडण्यासाठी कोणी परिणामकारक कार्यक्रमही सुचविला नाही.

६) बोबडे प्रकाश[६] (१९९४) -

डॉ. प्रकाश बोबडे यांनी आपल्या भारतीय समाज रचना पारंपारिक व आधूनिक या पुस्तकात जातीसंस्थेचे बदलते स्वरुप याविषयी सविस्तर विवेचन केलेले असून त्याबाबत माहिती पूढील प्रमाणे. समाजाचे स्वरुप स्थिर नाही. समाजरचनेत सतत परिवर्तन होत असतात. भारतीय समाज रचनेचे एक असलेल्या जातिव्यवस्थेत गेल्या दोन वर्षात अनेक स्थित्यांतरे घडून आलीत. वैदिककालात ब्राह्मण व वैश्य या तीन वर्णात संपूर्ण समाज विभागाला होता. त्यांच्यात श्रेष्ठ - कनिष्ठतेची भावना तीव्र नव्हती. धर्मशास्त्रयुगात वर्णव्यवस्थेचे नियम तीव्र झाले . शुद्र हा चवथा वर्ण वेगळा ओळखला जाऊ लागला. उच्च वर्णीयांनी निम्न वर्णीयांवर अनेक प्रकारचे निर्बंध लादले, याच काळात वर्ण नियमांची तीव्रता पराकोटीला पोहोचली होती. मुसलमानी आक्रमणाच्या काळात

धर्मरक्षणासाठी जातिसंस्थेचे नियम तीव्र करण्यात आले. एकोणिसाव्या शतकात इंग्रजी राजवटीत मात्र परंपरागत जातिव्यवस्थेच्या विघटनास खऱ्या अर्थाने सुरवात झाली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर वास्तविक अर्थाने नसले तरी घटनात्मक व कायदेशिरदृष्ट्या ही संस्था पूर्णपणे विघटित झाली आहे. जातिसंस्थेत झालेल्या या स्थित्यांतराचा विचार सर्वसाधारपणे चार काळाच्या संदर्भात करण्यात येतो.

१. वैदिक काळ ( इ.स. पूर्व ६०० वर्षे पर्यत ) –

वैदिककाळात प्रचलित असलेल्या जाती किंवा वर्ण व्यवस्थेची कल्पना ऋग्वेदात आढळते. ऋग्वेदात प्रामुख्याने ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीनच वर्णाचा उल्लेख असून ब्राह्मण व क्षत्रिय या दोन वर्णाचे लोक अनुक्रमे पौरोहित्य कर्म करणारे व शस्त्रधारक किंवा संरक्षणाचे कार्य करणारे होत. तिसऱ्या वर्णाच्या वैश्य लोकात सर्वसाधारण जनतेचा समावेश केला गेला होता. ऋग्वेदान्तर्गत उत्तर विभागातील काही ऋचामध्ये ब्राह्मण,क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारही वर्णाचा उल्लेख आळतो, पहिल्या तीन वर्णीयाना द्विज म्हणून संबोधले असुन शूद्र म्हणजे दास किंवा अनार्थ, असंस्कृत, ईश्वरावर श्रद्धा न ठेवणारे अशा स्वरुपाचा उल्लेख केलेला आहे. स्पेन्सरच्या सेद्रिय सिद्धान्ताशी बरीचशी मिळती जुळती असणारी समाजपुरुषाची कल्पना ऋगवेदाच्या पुरुषसूक्तात मांडलेली आहे. या समाजपुरुषांच्या निरनिराळ्या अंगातून वर्णाची उत्पत्ती झाली असल्याची कल्पना केली आहे.

ब्राह्मणोस्य मुखमासीद् बाहू राजन्य:कृत ॥
ऊरुस्तदस्य यद्वेश्य: पद्भ्या शूद्रीजायत ॥

ब्राह्मण वर्णीयांचे कार्य अध्ययन व अध्यापनाचे किंवा या कार्याचा संबंध मती व उक्तीशी असल्याने ब्राम्हण वर्णीयांची उत्पत्ती समाजपुरुषाच्या मुखातून, क्षत्रियांचा संबंध पालन रक्षणाशी म्हणजेच शक्ती व कृतीशी असल्यामुळे त्यांची बाहूपासून वैश्याचा संबंध उत्पादन व पोषणाची

किंवा स्थिती उत्पत्तीशी असल्याने त्यांची उत्पत्ती कटी उरुद्यातून आणि संपूर्ण समाजास गती देण्याचे किंवा सेवा करण्याचे कार्य शूद्रांकडे असल्यामूळे शूद्रांची उत्पत्ती समाजपुरुषाच्या पायातून मानली गेली आहे. या काळात वर्णव्यवस्थेत तीव्र स्वरुपाची बंधने नव्हती. कर्म हेच वर्णाचे निर्णायक तत्व मानले जात असे. प्राध्यापक घुर्ये यांनी शतपथ ब्राह्मणातील एक उतारा देऊन असे स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला की, क्षेत्रिय कुलातील व्यक्तीलादेखील सत्कर्माने ब्राह्मणत्व प्राप्त होऊ शकते अथवा कुकर्माने वैश्य व शूद्र वर्ण मिळू शकतो. म्हणजेच वैदिक काळात उर्ध्वरेखित किंवा अधोरेखित गतिमत्व आढळून येत हाते. परशूरामाच्याउदाहरणावरुन स्पष्ट होते की, ब्राह्मण असून देखील पराक्रमाने तो क्षत्रिय वर्णाचा मानला जात असे. तसेच विश्वमित्र क्षत्रिय असुनदेखील श्रेष्ठ कर्मामुळे ते ब्राह्मणवर्गीय मानले गेले. थोडक्यात म्हणजे वैदिक काळात कर्मानुसार वर्ग ठरत असे, जन्मानुसार नव्हे. खाणेपिणे किंवा रोटी व्यवहारासंधीची बंधने तीव्र नव्हती. खाण्यापिण्याच्या बाबतील नियमाच समाजास ज्ञान होते. परंतु हे नियम जे लोक स्वत: काही धार्मिक कृत्यात भाग घेत असत तेच पाळत असत. सर्वसाधारण जनतेसाठी मात्र ते बंधनकारक नव्हते.

आंतरविवाहचे नियमदेखील शिथिल होते.द्विज वर्णाचे लोक आपापसात विवाह करीत असत. परंतु क्षत्रियांनी ब्राह्मणाच्या मुलीशी विवाह केल्याचे किंवा आपल्या मुली वैश्यांना दिल्याचा उदाहरणे आढळत नाहीत. यावरुन अनुलोम विवाह वैदिक कालात प्रचलित असल्याचे दिसते. थोडक्यात असे म्हणता येईल की, वैदिक कालात वर्णव्यवस्था हा एका मुक्त अशा वर्णव्यव्सथेच्या स्वरुपात होती.

२. उत्तर वैदिक काल ( इ.स. पूर्व ६०० ते ३०० वर्षे ) –

इ.सन ६०० वर्षापासून तिसऱ्या शतकापर्यतचा काळ हा उत्तर वैदिक काळ होता. या काळात अर्थव्यवस्थेचे स्वरुप अधिक तीव्र होऊ लागले. शूद्र वर्णाचा स्पष्ट उल्लेख होऊ लागला प्रत्येक वर्णात एक आंतरिक संघटना निर्माण होऊन आपण इतर वर्णीयापासून वेगळे आहेत ही

भावना अधिकाधिक प्रज्वलित झाली. ब्राह्मण वर्णीयांचे वर्चस्व वाढू लागले व या वर्चस्वाला त्यांच्या कडुन दुरुपयोग होऊ लागला. गौतम सूत्रांनूसार शेतकरी, व्यापारी, सावकार व कारागीर यांना त्यांच्या गटासाठी स्वतंत्र सामाजिक नियम तयार करण्याची अनुमती देण्यात आली होती. यावरुन असे दिसते की, प्रत्येक वर्णात अनेक स्वयंशासित गट निर्माण झाले होते. व्यक्तीच्या सामाजिक जीवनास नियंत्रित यकरणारे नियम व वर्णाप्रमाणे भिन्न होते. विद्यार्थ्यासाठी ब्रह्मचर्याश्रमात प्रवेश करण्याचे वय देखील प्रत्येक वर्णीयासाठी भिन्न होते. घरी आमंत्रित केलेल्या पाहुण्यांनाही त्यांच्या वर्णानुसार पाहुणचार दिला जात असे. इतकेच नव्हे तर कर्जाऊ दिलेल्या रकमेवर व्याजाचा दर प्रत्येक वर्णीयासाठी भिन्न होता. ब्राह्मणास द.म.द.शे २% प्रमाणे, क्षेत्रियास ३% प्रमाणे, तर वैश्यास ४ % व शूद्रास ५ % प्रमाणे कर्ज मिळे. तसेच एकाच गुन्हयासाठी प्रत्येक वर्णीयास भिन्न भिन्न शिक्षा होत्या. बौद्ध वाङमयावरुन असे दिसते की, ब्राह्मण व क्षत्रिय या संपत्तीच्या फार मोठ्या भागाचे अधिकारी असले तरी त्यांच्यावर सौम्य कर लावण्यात आले होते. या कालात सामाजिक दृष्टीकोनातून ब्राह्मणांचा दर्जा सर्वश्रेष्ठ असून ब्राह्मण व क्षत्रियांना अनेकप्रकारच्या सवलती होत्या. त्यांच्या तुलनेत वैश्य व शूद्रांची स्थिती मात्र खालावलेली हाती. खाण्यापिण्याबाबतचे निर्बंध देखील या कालात तीव्र होते. विशेषत: शूद्रांच्या हातचे अन्न ग्रहण करणे निषिद्ध मानले होते. एखाद्या ब्राह्मणाने शूद्राच्या हातचे अन्न खाल्यास पूढील जन्मी त्यांचा शूद्राचा किंवा यांचा वराह जन्म मिळतो असा उल्लेख वसिष्ठात आढळतो. वरिष्ठ स्मृतीनुसार शूद्र सुतार, धोबी, चांभार यांच्या हातचे अन्न ग्रहण करु नये. आपस्तंबानूसार शुद्राकडे पाहणे किंवा त्यांच्याशी बोलणे हा देखील गुन्हा मानला जात होता. जातकग्रंथात असा उल्लेख आढळतो की, शुद्रांना गावाच्या बाहेर स्मशानभूमीच्या पलीकडे राहावे लागे. गावातील सार्वजनिक विहिरींचा वापर त्यांना करता येत नव्हता. या काळात वर्ण आंतरविवाह हा विवाहाचा आदर्श मानला जात असे. बौद्‍ायनानूसार आपल्या जातीच्या स्त्रीपासून झालेला मुलगाच सपिंड मानला जात असे. इतर जातीच्या स्त्रीयांपासून झालेल्या मुलांना तो दर्जा

मिळत नसे. यावरुन उच्चवर्णीयांना निम्नवर्णीयाशी विवाह करण्याची परवानगी त्या काळात दिली होती. परंतु दोन वर्णात मुक्तपणे विवाह होत असत असे मात्र म्हणता येणार नाही. अशा आंतरवर्णीय विवाहात संपत्तीवर सर्व मुलांना सारखाच अधिकार नसे. आई उच्चवर्णाची असल्यास तिच्या मुलांना संपत्तीत जास्त वाटा मिळे. कनिष्ठ वर्णीय स्त्रीपासून झालेल्या मुलांचा वाटा कमी असे. या काळात व्यवसायविभाजनासाठी कर्म या घटकास स्थान राहिले नाही, तर जन्म हाच घटक व्यवसाय निवडीसाठी प्रमुख ठरला. ब्राह्मणकुलात जन्म घेणाऱ्यांने अध्यापन व धार्मिक कार्ये करावीत. क्षत्रियाने राज्यव्यस्थापनेचे व सैनिकाचे कार्य करावे, तर शेती , व्यापार, पशुपालन इत्यादी कार्ये वैश्याकडे होती व द्विजांची सेवा करण्याचे कार्य शूद्रांकडे होते.

सम्राट चंद्रगुप्त मौर्याच्या काळात भारतास भेट देणाऱ्या मेगॅस्थेनीस या परदेशी यात्रेकरुने केलेले भारतीयजातीचे जातिप्रथेचे वर्णन यासंबंधात विशेष उल्लेखनीय आहे. मेगॅस्थेनीस यांच्या मते त्या काळात भारतात सात जाती होत्या. १. दार्शनिक, २. शिल्पकार, ३. कृषक, ४. योध्दा, ५. पशुपालक, ६. सदस्य व परिदर्शक या जातीच्या लोकांना आपल्याच जातीत विवाह करावा लागे. जातीबाहेर विवाह करणे किंवा आपल्या परंपरागत व्यवसायाला सोडून दुसरा व्यवसाय स्वीकारणे निषिद्ध मानले गेले होते.

वरिल विवेचनावरुन स्पष्ट होते की, उत्तर वैदिक कालात भारतात जातीचे नियम बरेच कठोर झाले होते. जन्मानूसार व्यवसाय ठरत होता. जातीबाहेर विवाह निशिद्ध होता. सामाजिक संधाच्या बाबतीत वर्णावर्णात स्पष्ट भेद निर्माण झाले होते. ब्राह्मण दर्जाने श्रेष्ठ असून अनेक सवलती दिल्या गेल्या होत्या. आपल्या श्रेष्ठ स्थानाचा व सवलतीचा दुरुपयोग याचकाळापासून उच्चवर्णीयांनी कनिष्ठ वर्णीयाविरुद्ध केलेला दिसतो. ब्राह्मणांची वाढती शक्ती व या शक्तीचा दुरुपयोग यामूळेच या काळात समानतेवर आधारलेल्या जैन व बौद्ध धर्माचा विकास झाला व अनेक क्षत्रिय राज्यांनी या दोन धर्माना राजाश्रय दिला.

३. धर्मशास्त्र यु ग : (इ.स. ३०० ते ११०० ) –

जातिसंस्थेच्या ज्या कठोर नियमांचे बीजारोपण उत्तर वैदिककालात झाले ते नियम या कालात तीव्रतेच्या पराकोटीस पोहोचले. धर्मशास्त्रयुग एका अर्थाने ब्राह्मणयुग म्हणून मानता येईल. ब्राह्मण वर्णीयांचे महत्व या काळात फारच वाढले. ईश्वर व मानव यातील एक प्रकारचा मध्यस्थ म्हणून ब्राह्मण वावरु लागला. याच काळात पुढे आलेली दुसरी कल्पना म्हणजे पुर्नजन्माची कर्मसिद्धांतानुसार प्रत्येक व्यक्तीने आपले निहित कर्म केलेच पाहिजे. अन्यथा शिक्षा म्हणून त्यास पुढील जन्मात अनेक आपत्तीना तोंड द्यावे लागेल. याच सिद्धांताचा फायदा घेऊन वर्णधर्म सर्वसाधारण जनतेच्या गळी उतरविण्यातआला. या काळात ब्राह्मणाचे महत्व वाढविण्याचे जे प्रयत्न झाले, त्या संबंधीचे बरेचसे स्पष्टीकरण मनुस्मृतीत निरनिराळ्या परिच्छेदात आढळते. मनुस्मृतिनुसार हे संपूर्ण विश्व ही ब्राह्मणाची मालमत्ता असून इतर वर्णाचे लोक त्यांच्या आश्रयाने राहत असत. तसेच अदृश्य ईश्वराचे ब्राह्मण हे दृश्य रुप असून जेव्हा हे दृश्य ईश्वर संतुष्ट होतील, तेव्हा स्वाभाविकपणे अदृश्य ईश्वरदेशील संतुष्ट होतील. ह्या कल्पना प्रचलित झाल्यामुळे केवळ शूद्रच नव्हे तर इतर सर्व वर्णाकरिता देखील ब्राह्मणाची सेवा हे कर्तव्य ठरले. राजादेखील ब्राह्मणांचा आदर करु लागला. याउलट शूद्रांची सामाजिक स्थिती पूर्वीपेक्षाही घसरली. वैश्य आणि शूद्रांना समान मानले जाऊ लागले. या काळात आंतरविवाहाचे नियम अधिक दृढ झाले. अनुलोम विवाहाचे प्रचलन होते. परंतू कनिष्ठ वर्णातील स्त्री धार्मिक विधीकरिता अयोग्य मानली जात असे. या काळात ब्राह्मण पुरुषांचा क्षत्रिय स्त्रीबरोबर विवाह झाल्याची उदाहरणे आढळतात. एका चिनी प्रवाशाने नमूद केल्याप्रमाणे हर्षवर्धन या वैश्य राजाने आपल्या मुलीचा विवाह क्षत्रिय राजाशी केला होता. त्यांची संत्ती क्षत्रिय वर्णातील म्हणून ओळखली जाई. एकोणविसव्या शतकाच्या उत्तरार्धात जोधपूरमध्ये सापडलेल्या एका शिलालेखावरुन एका ब्राह्मणाने दोन स्त्रियांशी विवाह केल्याचे व त्यापैकी एक क्षेत्रिय असल्याचे दिसून येते. त्यापैकी क्षेत्रिय स्त्रीपासून झालेली मुले क्षेत्रिय म्हणूनच गणली गेली होती. रोटी

व्यवहारासंबंधीचे नियम या काळात अधिक तिव्र झाले होते. विशेषत: शुद्रांच्या हातचे अन्न ग्रहण करणे निषिद्ध मानले होते. विष्णू स्मृतिनुसार सोनार, लोहार, धोबी यांच्या हातचे अन्न उच्चवर्णीयांनी ग्रहण करु नये. शूद्रासाठी पाणी भरण्याच्या वेगळ्या विहिरी होत्या. उच्च वर्णीयांनी ह्या विहिरीचा उपयोग करु नये असा आदेश होता.

व्यवसायाच्या निवडीबाबत जन्म या घटकाचे महत्व या काळात अधिक तीव्र झाले. आपला परंपरागत व्यवसाय सोडून इतर व्यवसाय करता येत नव्हते. परंतू वैश्य आणि शूद्र यांच्या व्यवसाय निवडण्यात काही फेरबदल करण्यात आले. याज्ञवल्क्याने वेळप्रसंगी शूद्रांना व्यापार करण्याची परवानगी दिली. तसेच शेतीचा व्यवसाय सर्ववर्णीसाठी खुला केला. परंतू मनूने मात्र शेती हा व्यवसाय ब्राह्मणाकरीता निषिद्ध मानलेला आहे. यावरुन असे दिसते की, या काळात ब्राह्मण व क्षत्रिय या उच्च वर्णीयांनी आपले व्यवसाय सुरक्षित ठेवले पण वैश्य व शूद्रांची स्थिती अधिकाधिक निकृष्ट करण्याचा पद्धतशीर प्रयत्न धर्माच्या नावाखाली क्षत्रिय शासकांनी व ब्राह्मणांनी केलेला दिसतो.

४. मध्ययुग ( इ.स. १६०० ते १७००) –

हा मुसलमानी आक्रमणाचा काळ आहे. मुसलमानी आक्रमणामुळे परंपरागत जातीव्यवस्थेस सर्वप्रथम हादरा दिला. मुसलमानात जातिप्रथा नसल्यामुळे मुस्लिम राजांनी जातिप्रथेला आश्रय दिला नाही. काही मुसलमान राजांनी जबरदस्तीने धर्म परिवर्तनाचे सत्र आरंभिले. या उलट काही राजांनी आपली सत्ता टिकविण्यासाठी हिंदूबरोबर मिळून मिसळून राहण्याचे धोरण अंगिकारले. या काळात . जातिप्रथेसंबंधी दोन परस्परविरोधी विचारप्रवाह निर्माण झालेत . मुसलमानांच्या समतेच्या पद्धतीने प्रभावित होऊन काही हिंदू संतांनी जातिप्रथेविरुध्द प्रचार सुरु केला. गुरुनानक, कबीर, तुकाराम इत्यादी संतानी स्पृश्यास्पृश्यांच्या कल्पनेविरुध्द जनजागृतीस सुरुवात केली. याउलट ब्राह्मणाद्वारे जातिप्रथा अधिक दृढ करण्याचा प्रयत्न झाला. मुसलमान राजापासून हिंदूधर्माचे

संरक्षण करण्याच्या हेतूने सामाजिक संबंध व खाण्यापिण्यासंबंधीचे नियम अधिक दृढ करण्यात आले. विधवा विवाहावर बंधने घालण्यात आली. सतीप्रथेला उत्तेजन देण्यात आले. याच काळात जातीच्या कठोर नियमांना कंटाळून अनेकांनी इस्लाम धर्म स्वीकारल्याची उदाहरणे सापडतात.

५. वर्तमानयुग ( सन १७०० ते नंतर ) –

वर्तमानकाल जातिसंस्थेसाठी खऱ्या अर्थाने संक्रमण काल ठरला. इंग्रजी शासन व पाश्चात्य संस्कृतीच्या प्रभावाने जातिसंस्थेवर अनेक प्रकारचे प्रहार झालेत. पाश्चात्य संसकृतीत प्रभावी ठरलेली समानतेची व व्यक्तिस्वातंत्र्याची भूमिका सर्वसामान्य जनतेस आणि विचारवंताना पटू लागली. तसेच औद्योगिकरणामुळे परंपरागत व्यवसाय मोडकळीस आले. त्यानूसार झालेली वर्गवारी ही कालबाह्य ठरु लागली. अनेक नवीन व्यवसाय सुरु झाले. त्यामूळे विभिन्न जातीची सामाजिक स्थिती व त्यांचे कार्य यातही परिवर्तन होऊ लागले. इंग्रजी शासनाने भारताच्या धार्मिक बाबतीत हस्तक्षेप न करण्याचे धोरण सुरवातीपासूनच अंगिकारले होते. पण वॅरन हेस्टिंग्ज हा गव्हर्नर मात्र अपवाद ठरला. त्याने १९५० मध्ये जाती अपात्रता निर्मूलन अधिनियम सर्वप्रथम लागू केला व १८७२ मध्ये विशेष विवाह अधिनियम लागू करण्यात आला. या नियमाने आंतरजातीय विवाहास अनुमती दिली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारताच्या नवीन घटनेत अस्पृश्य जातीना विशेष संरक्षण देऊन त्यांच्यावरील सामाजिक व धार्मिक बंधने दूर केली. घटनेनुसार सर्वासाठी समान अधिकाराचे तत्व लागू केले. १९५५ मध्ये मंजूर झालेल्या हिंदूविवाह विषयक कायद्याने वैवाहिक संबंधाच्या बाबतीतील सर्व जातीय बंधने दूर केली. या काद्याने आंतरजातीय विवाहस मान्यता दिली. १९५५ च्या अस्पृश्यता अपराध अधिनियमाने जातीचे नियम केवळ नष्टच केले नाहीत तर जातीनुसार असे निर्बध लावणे हा शिक्षेस पात्र असा गुन्हा ठरविला. अशा तऱ्हेने इंग्रजी आमदानीपासून आजपावेतो झालेल्या अनेक संवैधानिक तरतूदीमुळे व निरनिराळ्या समाजसेवकांनी केलेल्या जनजागृतीमुळे जातिसंस्थेचे सर्व आधार कोलमडून पडलेले दिसतात. घटनात्मक आणि कायदेशीर

दृष्टीकोनातून जातिसंस्थेचे विघटन झाले आहे असे म्हणण्याचे मुख्य कारण म्हणजे सर्वसामान्य जनतेच्या मनात आजदेखील जातीबाबतच्या कल्पना खोलवर रुजलेल्या दिसतात. परिणामी प्रत्यक्ष सामाजिक वर्तनात आजदेखील जातिभेदाचे प्रत्यंतर येते हळूहळू हे भेद ओसरत असून कालांतराने ते नष्ट होतील ही बाब मात्र नाकारता येत नाही.

७) काचोळे दा.घो.[७] (१९९८) –

डॉ. दा.घो काचोळे यांनी आपल्या 'भारतीय समाज रचना,' या पुस्तकात जातीची बदलती भूमिका आणि भविष्य याविषयी सविस्तर विवेचन पूढील प्रमाणे केलेले आढळून येते. भारतीय समाज हा अनेक जाती व उपजातीचा मिळून बनलेला समाज आहे. येथील प्रत्येक व्यक्तीला जातीचा आधार असतो. बदलत्या परिस्थितीत जात पंचायतीचे जातीच्या सदस्यांवर नियंत्रण ठेवण्याचे अधिकार कायद्याने नष्ट केल्यामुळे जात पंचायतीबद्दल निष्ठा दाखविण्याची सक्ती जरी राहिली नाही तरी व्यक्तीला तिच्या जातीत एक सदस्य म्हणून जगावे लागते. पारंपारिक समाजजीवनात व्यक्तीबरोबर जात पंचायतीची सक्ती होती ती आता राहिली नाही हे जरी सत्य असले तरी सद्य : परिस्थितीत जातीव्यवस्थेत बदल घडून आल्याने प्रत्येक जातीची भूमिका बदलली आहे. पुढे भविष्यात सुद्धा जातीची भूमिका अशी असेल याचा नेमका अंदाज करणे कठीण असले तरी भारतीय समाजातून जाती व्यवस्था कदापी नष्ट होणार नाही हे तेवढेच सत्य आहे. वरकरणी हिंदू समाज ऐकसंघ दिसत असला तरी वस्तुस्थिती मात्र वेगळी आहे. शेकडो जातीचा मिळून बनलेला हा समाज असल्याने जाती जातीतील अंतर हे खंडयुक्त अंतर असल्याने प्रत्येक जातीचे सामाजिक अस्तित्व नि स्थान मात्र दुसऱ्या जातीसारखे नाही. म्हणजे कोणत्याही दोन वा तीन जाती समान पातळीवर नाहीत. जात पंचायतीचे अस्तित्व कायद्यान्वये नष्ट झाले असले तरी जाती जातीतील अंतर अजूनही कायम आहे. जात पंचायत नष्ठ झाली किंवा ती कमकुवत बनली असली तरीही जाती बद्दलच्या निष्ठेत कोणत्याही प्रकारचा बदल झालेला दिसून येत नाही. कारण

बदलत्या परिस्थितीत एक आधार म्हणून लोक पुन्हा आप आपल्या जातीकडे खेचले जातात. मोठमोठ्या गावातून जाती पोट जातीच्या अनेक संस्था अस्तित्वात आलेल्या आहेत. या संस्थेचे मुख्य कार्यालय शहर अगर तालुक्याच्या ठिकाणी असते. अश्या प्रकारच्या जाती उपजातीच्या संस्थामध्ये प्रामुख्याने जातीचाच विचार केला जात असतो. कोणत्याही जातीची संस्था संपूर्ण समाजाच्या वा अन्य जातीचा विचार करीत नसते. लोक अश्या संस्थाकडे आकर्षीत होण्याला अनेक कारणे असते. त्यापैकी एक कारण म्हणजे आपल्या जातीचे कोणीतरी जवळचे असावे हे असते. दुसरे कारण मुलामुलींचे विवाह जुळविण्या संबंधीचे असते. जातीव्यवस्थे मुळे समाजाचे खंडात्मक विभाजन घडून आलेले असले तरी नविन बदलेल्या परिस्थितीत जरी जात कायम असली तरी जातीच्या कार्यात्मक भूमिकेत बदल झालेला आहे हे दिसून येते. म्हणून बदलत्या परिस्थितीत जरी जातीचे स्वरुप विघटीत झाले असले तरी ते कायम टिकेलच याची शाश्वती नाही. सध्याच्या परिस्थितीत खेड्यातील सर्वच जातीची व्यवस्था निव्वळ कुलीन झालेली आहे. पूर्वी उच्च निच श्रेणीच्या आधारलेल्या जाती आता कोलमडून पडल्याआहेत. धार्मिक मूल्यांवर आणि आर्थिक बळावर आधारलेल्या श्रेणीची परस्पराकडे फारकत झालेली आहे. वर्णानुक्रमाने, संख्यने आणि आर्थिक बळाने श्रेष्ठ मानल्या गेलेल्या जाती आणि शिक्षण नौकऱ्या, आणि इतर स्वतंत्र उपजिवीकेची साधने आणि त्याच प्रमाणे गावातील जमिन मालकी या नव्याने आर्थिक कुवत असलेल्या जाती यांच्या राजकीय सत्ते करीता कमालीची रस्सी खेच सुरु झाली आहे. ज्या जाती संख्येने कमी असतात त्या आप आपल्या आर्थिक हितसंबंधा नुसार कधी या गटात तर कधी दुसऱ्या गटात जात असतात. सोईनूसार त्या गट बदलत असतात. सत्ता प्राप्ती साठी जाती जातीत स्पर्धा सुरु झाली असली तरी जाती अंतर्गत स्पर्धा होवू लागली आहे. मराठा – मराठ्या विरुध्द, महार – महाराविरुध्द , माळी – माळ्याविरुध्द असे सत्तेचे समिकरण बदलत असते. महाराष्ट्रात मराठा जातीत राजकीय सत्ता मिळविण्याची ताकद असली तरी मराठा जाती आपसात सत्ता स्पर्धेसाठी

सातत्याने संघर्ष चालवित आहे. सध्य परिस्थिती आर्थिक सुधारण्याची धडपड सर्वच जातीमध्ये दिसून येते. पूर्वी सुध्दा असा प्रयत्न केला जायचा. पण गाव गाड्याच्या चौकटीत फारसे यश येत नव्हते. पिढ्यान पिढ्या तो व्यवसाय आणि तेवढेच उत्पन्न नि त्या प्रमाणात खर्च या पलिकडे कोणत्याही जातीला आर्थिक प्रगती करता येत नव्हती. धार्मिक मूल्यावर आधारलेले श्रेणीतील कनिष्ठ जातीनां मिळणाऱ्या अनेक विध सवलतीमुळे जातीचे जातीच्या अस्मीतेवर वेगळी कलाटणी मिळू लागली आहे. याउलट वरच्या जातींना त्यांची नावे मागासलेल्या जातीच्या यादीत घालण्याचा प्रयत्न सुरु केला आहे. मागास जातीना मिळणाऱ्या सवलतीचा लाभ घेऊन वरचा सामाजिक दर्जा कायम ठेवण्याचा वरिष्ठ जातीचा प्रयत्न म्हणजे अर्थे उत्पदनाच्या साधनाचा भोवती सर्वच जाती कशा फिरत आहे हे लक्षात आल्यावाचून राहत नाही. आजही विशिष्ट प्रकारची अर्थात्पादनाची साधने ही अनुवंशीकतेने काही विशिष्ठ जातीच्या स्वाधीन असल्याने जातीभेद व जातीयता तक धरुन आहेत . जाती व्यवस्था नष्ठ व्हावी यासाठी केले जाणारे प्रयत्न ही निव्वळ, थाप आहे हे लक्षात आल्यावाचून राहत नाही.

८) चौहान अरुण. धो. ८(२००१) -

श्री अरुण धो. चौहान यांनी आचार्य पदवी करिता सादर केलेल्या आपल्या ''सांस्कृतिक देवाण – घेवाण व सांस्कृतिक सात्मीकरण प्रक्रियांच्या विशेष संदर्भात स्थायिक झालेल्या राजपूत समुदायाचे समाजशास्त्रीय अध्ययन,'' या संशोधन विषयांच्या अंतर्गत ४०० राजपुत कुटूंबियापैकी ३२४ राजपुत कुटुंबियांकडून मुलाखत अनुसूचीद्वारे जी माहिती प्राप्त झाली त्या आधारावर पुढील प्रमाणे निष्कर्ष काढण्यात आले होते. त्या विषयी माहिती पुढील प्रमाणे :-

- सदर संशोधना करीता बुलढाणा, यवतमाळ, अकोला, अमरावती, वर्धा व भंडारा या जिल्हयातील राजपूत कुटुंबियाची यादृच्छिक नमुना पद्धतीने निवड करण्यात आली होती. सदर अध्ययनात सर्वात जास्त उत्तरदाते बुलढाणा जिल्हयातील होते त्यांचे शेकडा प्रमाण २६ टक्के इतके होते.

- राजपूतांच्या मुख्य:त्वे राजपूत भामटा, राजपूत परदेशी व राजपूत पुरोहीत इत्यादी उपजाती असल्याचे आढळून आले. त्यापैकी महत्तम उत्तरदात्यांची उपजात राजपूत भामटा ही असल्याचे आढळून आले . त्यांचे एकुण शे.प्र. ५७ टक्के इतके होते.

- सदर अध्यनावरुन महत्तम राजपूत कुटुंबिय उत्तरदात्यांचे मूळ गांव राजस्थानात असल्याचे आढळून आले. उदा. सोलस, उदयपूर, जयपूर, नागोर, चितोंड, बिकानेर, भरतपूर, राजकोट, उजैन, अजमेर इत्यादी.

- समाजातील प्रत्येक व्यक्ती आपल्या उपजिवीकेसाठी शेती, उद्योग, नौकरी, करीत असतो त्याचप्रमाणे राजपूत समुदायातील व्यक्ती सुध्दा शेती, उद्योग आणि नोकरी इत्यादी व्यवसाय करीत आहेत. तसेच सदर अध्ययनावरुन असे लक्षात आले की, महत्तम उत्तरदात्यांचा व्यवसाय शेती हा आहे. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ४९ टक्के इतके आहे. विदर्भातील लोकांचा मुख्य व्यवसाय शेती हाच आहे. असे सदर अध्ययनावरुन दिसून येते.

- महत्तम राजपूत उत्तरदात्यांच्या पूर्वजांचा व्यवसाय शेती हा आहे. त्यांचे एकुण दहा पैकी पाच एवढे आहे.

- सदर अध्ययनावरुन असे आढळून आले की, ओळखी आणि युध्द या कारणामूळे तेथील परिस्थिती व भोसले यांच्या सेनेत भरती होण्याच्या इच्छेने विदर्भात स्थायिक झालेल्या राजपूत कुटुंबियांची संख्या जास्त आहे. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ४३टक्के व ४२ टक्के इतके आहे.

- प्रस्तूत संशोधनावरुन असे आढळून आले की, १० पैकी ६ राजपूत कुटुंबातील सदस्यांचे वय ५१ ते १०० वर्षाच्या दरम्यान आहे.

- परंपरागत व्यवसाय तसेच नागरी विभागातील नवीन व्यवसायाची राजपूत कुटूंबियांनी केलेली स्विकृति तसेच विदर्भातील ग्रामीण वा अर्धग्रामीण समुदायाशी त्यांचा दिर्घकालीन संपर्क असल्यामुळे महत्तम उत्तरदात्यांचे संबंध हे शहरी भागात प्रस्थापित झालेले आहेत. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ६५ टक्के इतके आहे.

- विदर्भातील कुळाचाराच्या दृष्टीने स्वत:चे मोठे घर असणाऱ्या उत्तरदात्यांची संख्या जास्त असून त्यांचे प्रमुख वयाने सर्वात मोठी पुरुष व्यक्ती ही परंपरागत सत्ताधारी ( Traditional authority ) आहे. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ५९ टक्के इतके आहे.

- राजपूत कुटुंबातील सदस्यांच्या वारंवार होणाऱ्या गाठी भेटी तसेच लग्न समारंभ, मृत्यु, सण–सोहळे, इत्यादी प्रसंगी परस्परांच्या भेटी होतातच तसेच सदर संशोधन अध्ययनावरुन असे आढळून आले की, महत्तम उत्तरदाते सण समारंभ इत्यादी प्रसंगी आपल्या मोठया घरी जातात. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ३४ टक्के इतकी आहे.

- विविध प्रसंगी मोठ्या घरी जाणे एक कर्तव्य असल्याचे महत्तम उत्तरदात्यांचे मत आहे. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ६१ टक्के असल्याचे सदर संशोधन अध्ययनावरुन आढळून आले.

- कोणत्याही कुटुंबाच्या, त्यांच्या मोठ्या कुटुंबाकडून सामाजिक , आर्थिक नैतिक, धार्मिक तसेच इतर अपेक्षा असतात तसेच या अध्ययनावरुन असे आढळून आले की मोठया कुटुंबाकडून महत्तम उत्तरदात्यांच्या सामाजिक अपेक्षा आहेत. त्यांचे एकुण शेकडा प्रमाणे ३२ टक्के आहे.

- समाजात अस्तीत्वात असणाऱ्या प्रत्येक समाजाच्या त्यांच्या उन्नतीसाठी गावात, शहरात, समाजाच्या ट्रस्ट, होस्टेल, शिक्षण संस्था, प्रशिक्षण संस्था इत्यादी संस्था असतात. परंतु या अध्ययनावरुन असे आढळून आले की, महत्तम राजपूत उत्तरदात्यांच्या मते त्यांच्या गावात / शहरात समाजाच्या ट्रस्ट, होस्टेल, शिक्षण संस्था, प्रशिक्षण संस्था इत्यादी संस्था नाहीत त्यांची एकूण शेकडा प्रमाण ६२ टक्के इतके असल्याचे आढळून आले. याचा अर्थ असा की येथे स्थायिक झालेल्या राजपूतांना आपल्या स्वत:पुरत्या मर्यादित अशा संस्थाची उदा. होस्टेल, शिक्षण संस्था इत्यादी स्थापन करणे आवश्यक वाटत नाही. तर वैदर्भीय स्थानिक संस्थानाच ते आपल्या संस्था मानतात . हे राजपूत समाजाच्या वैदर्भीय समाज संस्कृतीशी झालेल्या आत्मसातीकरणाचे घोतक म्हणता येईल.

- महत्तम उत्तरदात्यांनी विदर्भात वस्ती केल्यानंतर स्थानिक भाषा आत्मसात करण्याचा पूर्णत: प्रयत्न केलेला असल्याचे सदर अध्ययनावरुन आढळून आले त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ६० टक्के इतके आहे.

- विदर्भात वस्ती केल्यानंतर महत्तम उत्तरदात्यांची मराठी, वऱ्हाडी भाषा आत्मसात करण्याचा बऱ्याच प्रमाणात प्रयत्न केला असल्याचे सदर अध्ययनावरुन आढळून आले त्याचे एकूण शेकडा प्रमाण ५० टक्के इतके आहे.

- महत्तम उत्तरदात्यांनी विदर्भातील भाषा शिकण्यासाठी, शाळा, टयुशन, वाचन इत्यादी माध्यमांचा उपयोग केला नसल्याचे सदर अध्ययनावरुन आढळून आले. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ६० टक्के इतके आहे. परंतु विदर्भाबाहेरील सूनेला विशेषत: राजस्थानातील मराठी वा वैदर्भीय भाषा शिकविण्यासाठी अनेक कुटुंबानी विशेष मेहनत करण्यासाठी प्रयत्न केले. एक गोष्ट मात्र महत्वाची आहे की, अनौपचारिक माध्यमे उदा. शेजारीपाजारी या बाबतीत जास्त प्रभावी ठरले असल्याची ग्वाही त्यांनी दिली.

- महत्तम उत्तरदात्यांनी आपल्या कौटुंबिक सदस्यांच्या बाबतीत वैदर्भिय भाषेचे आत्मसातीकरण करण्याबाबत जास्त प्रमाणात उत्सुकता दाखविलेली असल्याचे सदर अध्यनावरुन आढळून आले. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ६८ टक्के इतके आहे.

- महत्तम उत्तरदात्यांनी ८० टक्के च्या वर वैदर्भिय वेशभूषा अंगिकारल्याचे सदर अध्ययनावरुन आढळून आले त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ३४ टक्के इतके आहे. याचाच अर्थ बहुसंख्य राजपूत कुटुंबियांनी वैदर्भिय संस्कृती आत्मसात केल्याचे दिसून येते.

- कोणत्याही समाजाची स्थानिक परंपरा, उत्सव व सांस्कृतिक प्रतिमाने या बाबींशी संबंधीत असते. सदर अध्ययनावरुन असे आढळून आले की, महत्तम उत्तरदात्यांनी स्थानिक परंपरा, उत्सव, व सांस्कृतीक प्रतिमाने स्विकारली आहेत. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ७० टथके इतके आहे याचाच अर्थ असा की, बहुसंख्य राजपूत कुटूंबानी वैदर्भिय संस्कृतीचे आत्मसातीकरण केले आहे. राजपूत समाजाचे इतर जातीशी सामाजिक दूरत्व जवळीकता या दृष्टीने प्रत्येक जातीच्या संदर्भात अनुमापन मूल्ये (Scale Value ) पुढील प्रमाणे आहे. ब्राह्मण ४.२७ (सगळ्यात जास्त समीपता ) मराठा ४.०१, (द्वितीय क्रमांक ) कुणबी ३.९०, (तृतीय क्रमांक ) माळी ३.५९, तेली ३.६९, कलार ३.०९, महार २.३४, मांग २.२५, अनुसूचीत जाती २.३४, व आदिम जमाती २.२५ (सर्वात जास्त सामाजिक दूरत्व ) इतके आढळून आले. यावरुन असे आढळून येते की, महत्तम उत्तरदात्यांनी ब्राह्मण, मराठा, कुणबी, माळी, तेली ह्या जाती वगळता इतर जातीशी दूरत्व दर्शविलेले असल्याचे सदर अध्ययनावरुन आढळून आले. यासाठी बोगार्डस अनुमापन पद्धती उपयोगात आणली गेली होती व त्या आधारे अनुमापन मूल्ये ठरविले गेली.

- सण उत्सवच्या बाबतीत महत्तम राजपूत कुटुंबीय गणेशोत्सव, दसरा, दिवाळी, इत्यादी सर्व सणवार साजरे करत असल्याचे सदर अध्ययनावरुन आढळून आले. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ५५ टक्के इतके आहे.

- अतिआदरातिथ्य , अतिथी सत्कार, खर्चाळूपणा, धार्मिक व परंपरागत गोष्टीवर फार वेळ व पैसा गमावणे, सांसकृतिक स्व:केंद्रियता सुस्तपणा, जातीना दिलेले जास्त महत्व इत्यादी वैदर्भिय संस्कृतीच्या वैशिष्टयापैकी महत्तम उत्तरदात्यांना स्थानिक वैदर्भिय संस्कृतीचे अतिअतिथ्य हे वैशिष्टे आवडत नसल्याचे सदर संशोधन अध्यनावरुन आढळून आले. त्यांचे शेकडा प्रमाण ४० टक्के इतके आहे.

- महत्तम उत्तरदाते वर्षातून सरासरी एक ते दोन वेळा राजस्थानच्या मूळ गावी जातात याचे कारण म्हणजे परंपरा व अस्मिता टिकून राहावी हे असल्याचे सदर संशोधन अध्यनावरुन आढळून आले त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ७२ टक्के इतके आहे.

- महत्तम उत्तरदात्यांना आपल्या मूळ राजस्थानी शौर्य, हे वैशिष्टये आवडत असल्याचे आणि त्यांना त्याबाबत अभिमान वाटत असल्याचे सदर संशोधन अध्ययनावरुन आढळून आले. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ३९ टक्के इतके आहे.

- सदर संशोधन अध्ययनावरुन असे आढळून आले की, महत्तम उत्तरदात्यांनी जन्मभूमीच्या पेक्षा कार्यभूमीला जास्त महत्व दिलेले आहे. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ७७ टक्के इतके आहे.

थोडक्यात प्रस्तुत संशोधनाच्या निष्कर्षा वरुन असे म्हणता येईल की, विदर्भात स्थायिक झालेला राजपूत समुदाय येथील सांस्कृतिक देवाण-घेवाण आणि संस्कृतीशी बहुतांश प्रमाणात समायोजीत झालेला आहे. याचा अर्थ असा की, विदर्भातील बुलढाणा, यवतमाळ, अकोला,

अमरावती, वर्धा, व भंडारा जिल्हयामधील राजपूत कुटुंबानी सामाजिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या स्थानिक संस्कृतीशी समायोजन केले येथील मुळ निवासी असणाऱ्या वैदर्भिय लोकाशी त्यांची मोठ्या प्रमाणात सांस्कृतिक देवाण-घेवाण केली आणि सरते शेवटी विदर्भाच्याच भागामध्ये राजपूतांकडून वैदर्भिय सात्मीकरण झाले.

तसेच अमरावती जिल्हयातील कुणबी (मराठा ) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाजशास्त्रीय अध्ययन या संशोधनविषयाच्या अनुषंगाने पुढील प्रकरण ३ रे अध्ययन पध्दती व तंत्र यामध्ये सदर संशोधनाकरिता उपयोगात आणलेल्या संशोधन पध्दतीचे व तंत्राचे सविस्तर विवेचन करण्यात आले आहे.

# संदर्भ

[१]डॉ. इरावती कर्वे, 'हिंदू समाज एक अन्वयार्थ, प्रकाशक – दि.धो. कर्वे, पुणे, प्रथम आवृत्ती–१९७५, पृष्ठ क्र. १०६ ते १०८.

[२]डॉ. सुधा काळबांडे, 'भारतीय समाज रचना', प्रकाशक–भारत मुद्रक आणि प्रकाशन, औरंगाबाद १९७६, पृष्ठ क्र. ४ते११.

[३]एम.जी. कुळकर्णी, 'भारतीय समाज व्यवस्था', प्रकाशक – परिमल प्रकाशन औरगांबद, प्रथम आवृत्ती सुधारीत – ११७, पृष्ठ क्रमांक ७ ते १३.

[४]भा.की. खडसे, 'मांग जात – समाजशास्त्रीय अध्ययन ', प्रकाशक – मंगेश प्रकाशन, नागपूर, प्रथम आवृत्ती १९९०, पृष्ठ क्रमांक २११ ते २३०.

[५]रामनाथ चव्हाण, 'जाती आणि जमाती ' , प्रकाशक – मेहता पब्लीकेशन हाऊस पुणे, द्वितीय आवृत्ती १९९०, पृष्ठ क्रमांक १० ते १३.

[६]प्रकाश बोबडे, 'भारतीय समाज रचना पारंपारीक व आधुनिक ', प्रकाशक – मंगशे प्रकाशन नागपूर, पाचवी आवृत्ती १९९४, पृष्ठ क्र. २३१ ते २३७.

[७]काचोळे, दा.धो, 'भारतीय समाजरचना ', प्रकाशक कैलास प्रकाशन, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती १९९८ पृष्ठ क्रमांक २४७ ते२५२.

[८]चव्हाण अरुणसिंह , 'सांस्कृतिक देवाण – घेवाण व सांस्कृतिक सात्मीकरण प्रक्रियांच्या विशेष संदर्भात विदर्भात स्थायिक झालेल्या राजपूत समुदायाचे समाजशास्त्रीय अध्ययन, आचार्य पदवी करिता सादर केलेला शोध प्रबंध (२००१).

******

# प्रकरण ३ रे
# अध्ययन पद्धती व तंत्र

## ३.१ प्रास्ताविक –

"अमरावती जिल्हयातील कुणबी ( मराठा ) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेच समाजशास्त्रीय अध्ययन " या संशोधनाच्या अनुषंगाने सदर प्रकरणात उपयोगात आणलेल्य अध्ययन पद्धती व तंत्राचे सविस्तर विवेचन करण्यात आलेले असून यात नमूना निवड पद्धती सामग्री संकलनाचे तंत्र, त्याचप्रमाणे संशोधनाचा प्रकार याबाबत सविस्तर विवेचन करण्यात आले आहे.

## ३.२ अध्ययन पद्धती :-

संशोधनाचे काम हे अत्यंत क्लिष्ट असल्याने अत्यंत चांगल्या पद्धतीने पार पाडण्याचे का संशोधकाला करावे लागते. विषयाच्या अनुषंगाने त्यांचे निरिक्षण अत्यंत सुक्ष्म व तटस्थ स्वरुपा असले पाहिजे. संशोधकांच्या मनात जर संबंधित विषयाच्या लोकांबद्दल काही अनुकूल वा प्रतिकूल पूर्वग्रह असतील तर निरिक्षणाला अर्थ राहत नाही जे आहे ते तसेच्या तसे स्विकारण्याची वृत्ती संशोधकाची असली पाहिजे. म्हणजे तो निपक्षपाती असला पाहिजे. कामचलावु तथ्य संकलन करुन जो निष्कर्ष काढला जातो तो चुक असू शकतो. येथे बुद्धीची घमेंड उपयोगी नसते. निरिक्षण करतांना व तथ्य संकलन करतांना संशोधकाला तटस्थवृत्तीने ती वस्तुनिष्ठ वृत्तीने काम करावे लागते. उत्तम संशोधकाजवळ यासारख्या अनेक गुणांची आवश्यकता असते ज्यांचा त्यांला सोयीनुरुप उपयोग करुन घेता आला पाहिजे वा तशी क्षमता टिकवून ठेवली पाहिजे.

संशोधनाचे क्षेत्र असो की साधे सरळ व्यक्तीचे जीवन असो कोणालाही आराखड्याची आवश्यकता आहे. प्रामुख्याने समाज जीवनात प्रत्येक व्यक्तीजवळ जर जीवनविषयक आराखडा नसेल तर त्या व्यक्तीचे जीवन सुरळीत स्वरुपाचे नसते. कोणतेही काम करायचे तर त्यासाठी नियोजन आखावे लागते. नियोजनाच्या दृष्टीने कामाची निश्चित दिशा ठरवावी लागते. कोणत्याही कार्याला दिशा नसेल वा नियोजन नसेल तर त्या कार्याला अर्थ नसतो. घर बांधणे असो की लग्न करणे असो प्रत्येक बाबतीत काहीतरी वेळ, पैसा, श्रम नी मनुष्यबळ यांचा विचार करुन त्यांचा मेळ बसवावा लागतो. असे केल्याने कामात सुसूत्रता निर्माण होत असते. म्हणजे कार्याचे पद्धतशीर नियोजन, त्यांची रचना अथवा मांडणी आखणी करावी लागते. हे सगळ्याचे एकत्रित स्वरुप म्हणजे आराखडा.

संशोधन कार्यासाठी सुद्धा आराखड्याची आवश्यकता असते. संशोधन सुरु करण्यापूर्वी संशोधनाचा आराखडा तयार करणे आवश्यक असते. या आराखड्यात संशोधकाला काही गोष्टी निश्चित करावया लागतात. ज्यात संशोधनाचा उद्देश, अध्ययन, संशोधनाचे क्षेत्र, संशोधनासाठी लागणारा कालावधी, आवश्यक माहिती संकलित करणे, माहिती किती, कशी करावी नी ती कोठून उपलब्ध होईल, नमुना निवडीचे आधार, माहिती संकलित करण्यासाठी आवश्यक असणारी साधने, संकलित केलेल्या माहितीचे विश्लेषण, संशोधनकर्त्यासाठी वेळ, पैसा , श्रम यासाख्या अनेक बाबीचा समावेश असतो. हा सगळा आराखडा वा नियोजन करुन सुध्दा प्रत्यक्ष संशोधनाचे काम सुरु करण्यापासून तर शेवटपर्यंत कोणकोणत्या अडचणींना सामोरे जावे लागेल यांचा सुद्धा संशोधकाला विचार करावा लागतो. आराखडा तयार करणे म्हणजे कार्याची योजना आखणे असा आराखड्याचा सरळ अर्थ निघतो. संशोधन विषयक आराखडा तयार केला म्हणजे पैसा, वेळ, श्रम यासारख्या बाबींची बचत होत असते. कामाच्या बाबतीत निश्चित दिशा प्राप्त होत असते. ज्याकाही अडचणी निर्माण होतील त्याविषयी आधीच विचार केल्याने प्रत्यक्ष काम करतांना त्रास झाला तरी

तो सहन करण्याची क्षमता संशोधकाच्या अंगी निर्माण होते. त्यांची मानसिक अवस्था निश्चित कार्याच्या दिशेने कार्यरत झालेली असते.

तथापि, संशोधन आरांखडा, म्हणजे काय याचे निश्चित शब्दात काही संशोधकाने स्पष्टीकरण केलेले आहे. त्यापैकी ऐकॉफ यांचे स्पष्टीकरण लक्षात घेण्यासारखे आहे. तो म्हणतो निर्णय क्रियान्वित करण्याची स्थिती येण्यापूर्वीच निर्णय निर्धारित करण्याच्या प्रक्रियेला आराखडा म्हणतात. तसेच सेल्टिझ, जहोडा, डॉईश व कुक ह्यांनी आराखड्या संबंधी जी व्याख्या केली आहे ती सुध्दा अत्यंत बोलकी आहे. ती अशी संशोधकाच्या उद्दीष्टाच्या दृष्टीने निष्कर्षाची संबंद्धता व संशोधन कार्यातील मितव्यय ह्यांची जेणे करुन सांगड घालता येईल . अशा प्रकारे तथ्यांचे संकलन व विश्लेषण करण्यासाठी आवश्यक अशा अटीची नियोजित व्यवस्था म्हणजे संशोधन आराखडा होय थोडक्यात , संशोधन आराखडा तयार करतांना संशोधनाचा विषय कोणता त्यादृष्टीने संशोधनाचा उद्देश लखात घ्यावा लागतो. संशोधन विषय व उद्देश लक्षात घेवूनच आराखड्याचे काम आखावे लागते. मोजक्याच शब्दात विचार करायचा म्हटला तर संशोधन विषयासंबंधीच्या साधक विचारांची व्यवस्था व त्या दृष्टीने संशोधनकार्य सुरु करणे म्हणजे संशोधन आराखडा होय.

सारांश , संशोधनाच्या दृष्टीने आराखडा तयार करणे, आवश्यक बाब असते. संपूर्ण संशोधन कार्याची रुपरेषा आधीच निश्चित केल्यामुळे संशोधकाला संशोधन कार्यात फारशी अडचण निर्माण होण्याची शक्यता नसते. कोणत्याही प्रकारची अनपेक्षित अडचण आली तरीसंशोधक त्याबाबतीत विचलित होत नसतो. परंतु हे सगळे जरी सत्य असले तरी संशोधन आराखड्याचे स्वरुप जास्तीत जास्त आदर्श ठेवण्याचा त्याने जाणिवपूर्वक प्रयत्न करणे आवश्यक असते. आराखडा अधिक आकर्षक नी आदर्श होण्यासाठी संशोधकाने काही घटकांचा जाणिवपूर्वक विचार करणे महत्वाचे असते. प्रामुख्याने ज्या घटकांचा संशोधन आराखड्यासाठी उपयोग होतो त्यात नमुना निवड, निरिक्षण पद्धती संख्याशास्त्रीय बाब, आणि शेवटी प्रत्यक्ष कार्यवाहीत इतयादीचा समावेश झालेला असतो. म्हणजे प्रत्यक्ष कार्यवाहीत नमुना निवड, निरिक्षण पद्धती, संख्याशास्त्रीय बाबी ह्या प्रत्यक्षात

..३.३..

कशा कार्यान्वित केल्या जातील नी त्यासाठी कोणत्या तंत्राचा अवलंब केला जाईल यासाठी संशोधन आराखड्यात स्पष्टीकरण केले गेले पाहिजे. एवढे सगळे करुन सुध्दा संशोधनातील निष्कर्ष तंतोतंत ठरतीलच याची खात्री नसते. कारण हे जे निष्कर्ष असतात ते परिवर्तनशील मानावायाचे असतात. म्हणून त्यात तंतोतंपणा वा अचुकपणा असेलच असे नाही. म्हणूनच या अर्थाने शुमन म्हणतो, संशोधन आराखडा ही काही अशी विशिष्ट व काटेकोर योजना नाही की ज्यामध्ये अजिबात विचलन नाही. पण संशोधन कार्याची वाटचाल योग्य दिशेने व्हावी म्हणून उभे केलेले हे मार्गदर्शक स्तंभ आहेत.[१]

## ३.३ संशोधन आराखड्याचे प्रकार :-

सामाजिक संशोधनासाठी आराखडयाची आवश्यकता असते हे जरी सत्य असले तरी आराखड्याचे स्वरुप एकाच प्रकारचे असत नाही. कारण संशोधनाच्या उद्दिष्टाप्रमाणे संशोधन आराखडयाचे स्वरुप बदलत असते. संशोधन आराखड्याचे स्वरुप संशोधन उद्दिष्ट लक्षात घेवून जरी बदलत असेल वा त्यात फरक दिसून येत असला तरी सगळ्याच आराखडया मध्ये बरेचसे साम्य दिसून येते. येथे फक्त उद्दिष्ट लक्षात घेऊनच ढाचा बदलला जातो एवढेच आराखडा प्रकारांची एकमेकापासून निव्वळ फारकत झालेली नसते. स्वतंत्र अशी तटबंदी व्यवस्था नसते. भिन्नता दिसून येत असली तरी सारखेपणाच अधिक असतो. त्यांना एकमेकापासून भिन्न ठेवणे संशोधनाच्या दृष्टीने शक्य नसते. तथापि, संशोधन आराखड्याच्या प्रत्येक प्रकारचे स्वतंत्र अस्तित्व असल्याने त्यांच्या वैशिष्टयात तफावत जाणवल्याशिवाय राहत नाही. तात्पर्य, संशोधनाचे उद्दिष्ट ठरवून त्या प्रमाणे संशोधन आराखडा तयार केला पाहिजे एवढेच. एकंदरीत संशोधन आराखड्याचे चार प्रकार पडतात ते पुढील प्रमाणे :-

१) अन्वेषात्मक किंवा परिचयात्मक संशोधन आराखडा

२) वर्णनात्मक संशोधन आराखडा

३) निदानात्मक संशोधन आराखडा

४) प्रायोगिक संशोधन आराखडा

वरिल संशोधनाच्या चार आराखड्या पैकी प्रस्तूत संशोधना करिता वर्णनात्मक संशोधन आराखडा उपयोगात आणला असून तसेच प्रस्तूत संशोधनाचे क्षेत्र हे अमरावती जिल्हया पूरते असल्यामुळे तसेच हे क्षेत्र व्यापक असल्यामुळे सर्वेक्षण पद्धतीचा सुद्धा उपयोग करण्यात आला होता. प्रस्तूत संशोधनाच्या अनुषंगाने वर्णनात्मक संशोधन आराखड्या विषयी त्याच प्रमाणे सर्वेक्षण पद्धती बाबत सविस्तर माहिती पुढील प्रमाणे.

## वर्णनात्मक संशोधन आराखडा[२] :-

अन्वेषणात्मक आराखड्या पेक्षा वर्णनात्मक संशोधन आराखड्याचे स्वरुप काहीसे वेगळे असते. उद्देशांची समानता या दोनही आराखड्यात आढळून येत असली तरी अभ्यास विषयातील, समूह, व्यक्ती यांच्या वैशिष्टयांचे वर्णन वर्णनात्मक संशोधन आराखड्यात केले जाते. प्रामुख्याने भिकाऱ्या संबंधीची माहिती मिळविताना त्यांचे वय, लिंग, धर्म,जात , पंथ संप्रदाय भीक मागण्याचे तंत्र , वास्तव्य या सारख्या बाबींचा सविस्तर तपशील वर्णनात्मक आराखड्यासाठी अभिप्रेत असतो. याचाच अर्थ असा की अभ्यास विषयात असलेल्या विविध व्यक्ती आणि समूह यांच्या अनेक विध अंगाविषयीची सविस्तर माहिती संकलित करुन त्यांचे वर्णन वर्णनात्मक आराखड्यात केले जाते.

वर्णनात्मक आराखड्यात तथ्य संकलित करण्यासाठी वैज्ञानिक तंत्राचा आधार घ्यावा लागतो. मुलाखत , अनुसूची , प्रश्नावली, प्रत्यक्ष निरीक्षण, सहभागी निरीक्षण आणि सामुदायिक स्वरुपाचे रेकॅार्ड आणि त्यांचे विश्लेषण या सारख्या तंत्राचा वर्णनात्मक संशोधन आराखडयात उपयोग करुन घ्यावा लागतो.

वर्णनात्मक आराखडा निर्दोष राहण्यासाठी संशोधकाने काही बाबींची काटेकोरपणे काळजी घेणे आवश्यक असते.

१) संशोधकाने सर्वप्रथम अभ्यास विषयाची निवड अत्यंत काळजीपूर्वक करायला पाहिजे. विषयासंबंधित तथ्ये संकलित करता येतील असाच विषय संशोधकाने निवडला पाहिजे.

२) एकदा अभ्यास विषय निवडला की, त्यासाठी कोणत्या तंत्राचा उपयोग करायला पाहिजे हे संशोधकाने निश्चित करावे लागते. कारण विषयासंबंधी तथ्ये संकलित करण्यासाठी तंत्राची गरज पडत असते. योग्य पद्धतीने तंत्राची निवड केली नाही तर संशोधनात चूक राहून जाते.

३) वर्णनात्मक आराखड्यात संशोधकाचे मत निकोप असावे लागते. कोणत्याही प्रकारचा पूर्वग्रह त्यांच्या मनात असू नये. पक्षपाती पणा, गैरसमज यासारख्या वृत्तीच्या संशोधकाला वर्णनात्मक आराखडा निर्दोष ठेवता येणे शक्य नसते. संशोधनात अनावश्यक अतिशोक्तीचा दोष निर्माण होवू शकतो. तेव्हा तटस्थ व वस्तुनिष्ठ दृष्टीकोनाचा अवलंब करुन संशोधकाने आपले काम केले पाहिजे तरच वर्णनात्मक आराखडा निर्दोष राहू शकतो.

४) अनेकदा विशिष्ट व आकर्षक तथ्यावर संशोधक लक्ष केंद्रीत करीत असतो. म्हणजे तथ्यांच्या बाबतीत त्यांच्या कृतीत संतुलितपणा नसतो. सगळ्यांच तथ्यांना न्यायी हक्क, मिळेल यांची संशोधकाने खबरदारी घेतली नाही तर संशोधनाला वैज्ञानिकता प्राप्त होत नसते.

५) वर्णनात्मक संशोधन आराखड्यात पैसा, वेळ व श्रम शक्ती जास्त प्रमाणात खर्ची पडत असतात. येथे संशोधकाने या सगळ्याच बाबीचा मेळ धालून शोध-प्रबंध मर्यादित ठेवण्यावर लक्ष केंद्रीत केले पाहिजे. अनावश्यक बाबीवर धन खर्च व श्रम व वेळ घालविण्याच्या मोहात संशोधकाने पडू नये.

## ३.४ सर्वेक्षण पद्धती :

सामाजिक तद्वतच समाजशास्त्रीय संशोधनात तथ्ये शोधून त्यांचे संकलन करणे आणि नंतर निष्कर्ष काढण्याचे काम संशोधकाला करावे लागते. तथ्ये शोधतांना विविध तंत्राचा उपयोग करुन घेतला जातो. काही माहिती प्रत्यक्ष अनुभवातून मिळते तर काही पुस्तक वा लिखीत स्वरुपातून मिळते. यालाच अनुक्रमे प्राथमिक सामग्री आणि द्वितीयक सामग्री असे म्हटले जाते. तथ्ये संकलन करण्यासाठी जसा निरीक्षण, ऐतिहासिक आणि तुलनात्मक पद्धतीचा उपयोग केला जातो तसाच सर्वेक्षण पद्धतीचा सुद्धा उपयोग करुन घेतला जातो. सर्वेक्षण पद्धत ही सुद्धा सामाजिक तथ्ये शोधून काढण्यासाठी उपयुक्त आहे. या पद्धतीत एक वा अनेक माणसांचा सहभाग असतो. व्यक्तीगत पातळीवरुन एकटा संशोधक सुद्धा समाजविषयक माहिती मिळवू शकतो. परंतू त्यासाठी अभ्यास विषय मर्यादित असावा लागतो. अभ्यास विषयाचे स्वरुप विस्तारीत नी व्यापक असेल तर समूह पातळीवरुन विविध घटकांचे सर्वेक्षण केले जाते. एखाद्या विशिष्ट भूभागावर राहणाऱ्या समूह तथा समुदायाची माहिती समाजिक सर्वेक्षणामुळे मिळू शकते, ही माहिती समूहाची सर्वांगिण स्वरुपाची असेल वा समूहाच्या एखाद्या बाजुची सुध्दा असू शकेल. सर्वेक्षणाचा उद्देश कोणता नी कसा असेल त्यावर विषयांची कक्षा अवलंबून असते. समाजाच्या कोणता ही प्रश्न वा समस्यांचे आकलन करुन घेण्यासाठी व त्यावर उपाय सुचविण्यासाठी सर्वेक्षणाचा उपयोग होतो. एवढेच नाही तर एखादा सिद्धांतसुद्धा पडताळून पाहण्यासाठी सर्वेक्षण केले जाते. इतर देशाच्या तुलनेने भारतात सर्वेक्षणाचा उपयोग खूप आधी करुन घेण्यात आलेला आहे. कौटिल्याच्या अर्थशास्त्राची उभारणी ही सामाजिक सर्वेक्षणातून झालेली असल्याचा उल्लेख आहे. म्हणजे पाश्चिमात्य देशाच्या आधी सर्वेक्षणाची सुरुवात भारतात झाली हे एक विशेष आहे. अलिकडच्या काळात सगळ्याच देशात सर्वेक्षण केले जावू लागले आहे. व्यापक वा संपूर्ण समाजाचे सर्वेक्षण करतांना शासनाकडे ही जबाबदारी असल्याचे दिसून येते. स्वरुप मर्यादित असेल तर एखादी संस्था वा व्यक्ति तथा संशोधक सर्वेक्षणाचा प्रकल्प हाती घेत असते.

तात्पर्य एखाद्या प्रश्नासंबंधी चिकित्सक पाहणी करणे व त्यासंबंधी सर्व प्रकारची अंर्तभूत माहिती घेणे म्हणजे सर्वेक्षण मार्क अब्राम सर्वेक्षणाची व्याख्या करताना म्हणतो, समुदायाचे संघटन व क्रियांची माहिती करुन घेण्यासाठी सर्वेक्षणाचा आधार घ्यावा लागतो. याच अर्थाने सी.ए. मोझरने सुद्धा सर्वेक्षणाचे स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. तो म्हणतो, समाज जीवनाच्या काही अंगाविषयी प्रशासकीय माहिती मिळविण्याच्या गरजेसाठी किंवा कार्यकारणभाव शोधण्यासाठी किंवा समाजशास्त्रीय सिद्धांताच्या काही भागावर नवीन प्रकाश टाकण्यासाठी सामाजिक सर्वेक्षण केले जाते.[३]

## ३.५ सर्वेक्षण पद्धतीचे प्रकार [४] –

सर्वेक्षण पद्धतीद्वारे तथ्ये संकलन करुन निष्कर्ष काढले जात असले तरी तथ्य संकलन करण्यासाठी एकच पद्धत उपयोगात आणली जात नाही. विषयाचे स्वरुप व महत्व लक्षात धेवून सामाजिक सर्वेक्षण कसे वा कोणत्या पद्धतीने केले जाईल या दृष्टीने वेगवेगळ्या प्रकारे विचार केला जाता. म्हणजे पद्धती नी तंत्राचे स्वरुप विविध प्रकारचे असल्याने त्यानूसार सर्वेक्षणाचे प्रकार पडतात.

१) **सर्वसामान्य सर्वेक्षण** – एखाद्या प्रश्नासंबंधी वा समस्या संबंधी इतंभूत माहिती मिळविण्याचा सर्वेक्षणाचा सर्वसामान्य हेतू असतो. प्रामुख्याने अशा प्रकारचे सर्वेक्षण शासकीय पातहीवरुन करण्याचा प्रघात आहे. लोकसंख्या, आर्थिक व सामाजिक प्रश्नासंबंधी अंर्तभूत माहिती संकलित करण्यासाठी सर्वसाधारण सर्वेक्षण पद्धती प्रकारचा उपयोग करुन घेतला जातो. दर दहा वर्षानी अशा प्रकारचा सर्वेक्षण करण्याचा प्रयत्न चालू असल्याने शासनाला पुढील नियोजन आखणे शक्य होत असे.

२)	**विशिष्ट सर्वेक्षण –** एखाद्या विशिष्ट उद्देशाने प्रेरीत होवून जेव्हां सर्वेक्षण केले जाते त्याला विशिष्ट सर्वेक्षण असे म्हटले जाते. एखादा समुदाय वा समूहाच्या विशिष्ट अंगाची जर इंतभूत माहिती हवी असेल तर त्यासाठी हा प्रकार वापरला जातो. एवढेच नाही तर एखाद्या सिद्धांताची छानणी करण्यासाठी किंवा गृहीतकृत्ये तपासून बघण्यासाठी सुद्धा विशिष्ट सर्वेक्षणाची पद्धत अंगिकारली जाते. हेतूची स्पष्टता निश्चित असल्यामुळे तेवढ्या पुरतेच हे अशा प्रकारचे सर्वेक्षण केले जाते.

३)	**नियमित सर्वेक्षण –** काही समस्या वा समूह तथा गटाची माहिती मिळविण्यासाठी नियमीतपणे सर्वेक्षण केले जात असते. यात काही कालावधी जावू द्यावा लागतो. दर दोन चार वर्षानी संबंधित विषयाचे सर्वेक्षण केले जात असते हे अशा प्रकारचे सर्वेक्षण काही संस्था, शासन वा काही खाती करीत असतात. अर्थात ही अशा प्रकारची सर्वेक्षणाची यंत्रणा प्रत्येक संस्था तथा खात्याने आयोजित केलेली असली तरी तीला कायम सवरुप दिलेले असते. शिक्षण संस्था, साखर कारखाने, औद्योगिक कारखाने, शासन नी बँकानी अशा प्रकारची योजना आखलेली असते. या सगळ्या संस्था वा शाखा नियमित सर्वेक्षण घेवून विशिष्ट प्रश्नांचा वा समस्येचा आढावा घेवून त्या दृष्टीने धोरण ठरवित असतात. तात्पर्य, नियमित सर्वेक्षणामुळे एखाद्या समस्येचे स्वरुप लक्षात येत असते.

४)	**नैमित्तिक सर्वेक्षण –** नैमित्तिक सर्वेक्षण हेतू कायम स्वरुपी नसून तात्पुरता असतो. एखादा प्रश्न निर्माण झाला असेल व त्याची तीव्रता जानवत असेल तर अशा प्रसंगी केवळ गरज म्हणून अशा प्रकारचे सर्वेक्षण केले जाते. अर्थात उद्देश निश्चित असेल असे मात्र नाही. तात्पर्य जसा प्रसंग निर्माण होईल त्याप्रमाणे त्या प्रश्नाची माहिती करुन घेण्यासाठी नैमित्तिक सर्वेक्षण प्रकाराचा वापर करुन घेतला जातो.

५)	**प्रारंभिक सर्वेक्षण :–** समाजात अनेकविध प्रश्न वा समस्या निर्माण झालेल्या असतात. त्या समस्येचे स्वरुप अनेकदा माहित नसते. अशा प्रसंगी माहित नसलेल्या एखाद्या समस्येंचा प्राथमिक स्वरुपात परिचय करुन घेण्यासाठी प्रारंभिक सर्वेक्षणाचा वापर करुन घेतला जातो. प्रारंभिक

माहितीद्वारे विषयाचे स्वरुप लक्षात आले म्हणजे त्या दृष्टीने योजना आखून सर्वेक्षण केले जाते. थोडक्यात, केवळ प्रश्न वा समस्यांचे स्वरुप लक्षात घेण्यासाठीच प्रारंभिक सर्वेक्षण केले जाते.

६) **अंतिम सर्वेक्षण –** अंतिम सर्वेक्षणाचा प्रारंभ प्रारंभिक सर्वेक्षण झाल्यानंतर सुरु होत असते. कारण प्रारंभीक सर्वेक्षणामुळे जसे तथ्याचे स्वरुप लक्षात येते तसेच त्यांची खोलीसुद्धा समजण्यास मदत होत असते. अंतिम सर्वेक्षणामुळे संशोधनाचा निश्चित असा आराखडा तयार केला जातो. अंतिम सर्वेक्षणातूनच निष्कर्ष काढणे शक्य होते. अर्थात अंतिम सर्वेक्षणाची सुरुवात प्रारंभिक सर्वेक्षणापासूनच होते.

७) **वैश्विक सर्वेक्षण –** वैश्विक सर्वेक्षणाचे स्वरुप अतिशय व्यापक असते या सर्वेक्षणासाठी अधिक पैसा, जास्तीत जास्त वेळ नी प्रचंड श्रम शक्तीची गरज असते. एक वा दोन व्यक्तीमुळे वैश्विक सर्वेक्षण करणे शक्य नसते. येथे अनेक लोकांची गरज असते. कारण एखाद्या औद्योगिक कारखान्याला डोळ्यापुढे ठेवून तेथील कामगारांची आर्थिक नी सामाजिक परिस्थिती माहित करुन घ्यायची असेल तर त्यासाठी देश पातळीवरील कामगारांचे सर्वेक्षण असावे लागते. म्हणजे वैश्विक सर्वेक्षणात सर्व समष्टीचे , समूहाचे अध्ययन अपेक्षित असते.

८) **नमुना सर्वेक्षण –** अनेकदा विशाल समूहाची माहिती करुन घेणे शक्य होत नसल्यामुळे पर्याय म्हणून नमुना निवड पद्धत अंगिकारावी लागते. नमुना निवडीत काही विशिष्ट घटकांचीच निवड करुन त्यांची सांगोपांग माहिती संकलित करावी लागते. अर्थात यामुळे प्रतिनिधीक स्वरुपाची माहिती मिळते.

(वरिल विवेचनाच्या अनुषंगाने सदर संशोधनाकरिता वर्णनात्मक संशोधन आराखडा तसेच सर्वेक्षक पद्धतीचा उपयोग करण्यात आलेला आहे.)

## ३.६ नमुना निवड पद्धती :-

संशोधनामधून ज्या समग्र किंवा विश्वाच्या विशिष्ट लक्षनांच्या बाबतीत निष्कर्ष काढावयाचा आहे त्या विश्वाच्या व समग्राच्या एका भागाच्या वा खंडाच्या अध्ययनावरुन त्या विश्वातील विशिष्ट लक्षणाबाबत विश्वासनिय निष्कर्ष किंवा अनुमान काढण्याचा हा प्रश्न संबंधीत आहे. समग्रामधून पाहणीसाठी एक भाग निवडण्याच्या पद्धतीस नमूना चाचणी म्हणतात[५] या विधानाच्या अनूषंगाने "अमरावती जिल्हयातील कुणबी ( मराठा ) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाज शास्त्रीय अध्ययन" या संशोधना करिता नमुना निवड पद्धतीच्या अयंतर्गत गैरसंभाव्यता नमुना निवड योजना पद्धती अंतर्गत सोयीस्कर नमूना निवड पद्धतीचा उपयोग करुन प्रसतू संशोधनासाठी अमरावती जिल्हयातील कुणबी ( मराठा ) या समाजाचे ४०० कुटुंब नमुना म्हणून निवडण्यात आले. सोयीस्कर नमुना निवड पद्धती म्हणजे संशोधनकर्ता त्यांच्या हाताशी येतील वा त्या सोयीस्कर वाटतील अशा व्यक्तीची वा व्यक्तीं च्या गटाची नमुन्यासाठी त्याने निर्धारीत केलेल्या संख्येपर्यंत निवड करित जातो.

## ३.७ सामग्री संकलनाचे तंत्र -

प्रस्तूत संशोधनाकरिता सामग्री संकलना करिता प्राथमिक तसेच द्वितीय स्त्रोतांचा उपयोग करण्यात आला होता. द्वितीयक स्त्रोताअंतर्गत विविध प्रकाशित ग्रंथ पुस्तके तसेच शोध प्रबंध यांचा सामग्री संकलना करिता उपयोग करण्यात आला तरीच प्राथमिक स्त्रोत अंतर्गत सामग्री संकलनाकरिता मूलाखत सूची या तंत्राचा उपयोग करण्यात आला. मुलाखत तंत्रा बाबत सविस्तर माहिती पुढील प्रमाणे

संशोधकाची धडपड माहिती गोळा करण्यासाठी असते. जितकी अचूक व जितकी अधिक चांगली माहिती मिळेल तितकी त्याला हवीच असते. कारण जशी माहिती तसे निषक्र्ष हा संशोधनातील एक अलिखित नियमच असतो. सहाजिकच विविध तंत्रांचा व माध्यमांचा वापर करुन

तो अभ्यास विषया संबंधीची माहिती अधिकाधिक समृद्ध करण्याचा प्रयत्न करीत असतो. प्रश्नावली, अनुसूची, विशिष्टाभ्यास, जनगणना पद्धती इत्यादी अनेक तंत्राचा वापर तो तथ्यसंकलनासाठी करीत असतो. . पण समाजाच्या कोणत्याही प्रकारात अधिक उपयुक्त ठरणारे तंत्र म्हणजे मुलाखत होय. संबंधित व्यक्तींना प्रत्यक्ष भेटून त्यांच्याशी संबधीत विषयावरच्या अनेक प्रश्नांची चर्चा करुन ज्या माध्यमाद्वारे माहिती गोळा केली जाते त्या माध्यमाला मुलाखत असे म्हणतात. यामध्ये संशोधक व निवेदक यांचा प्रत्यक्ष संवाद असतो.

मुलाखतीला इंग्लिशमध्ये Interviews असे म्हणतात. Inter म्हणजे अंत: व Views म्हणजे दृष्टी . तेव्हा एक प्रकारची अंतरदृष्टी देणारे एक प्रभावी साधन म्हणून मुलाखतीचा उल्लेख करता येईल. संशोधक व निवेदक यांचा प्रत्यक्ष संवाद घडत असतो. त्या वेळी अभ्यास विषया संबंधी दोघांच्या मध्ये विचारांचे आदान - प्रदान होत असते. केवळ त्यामध्ये प्रश्नोत्तरे असतात असे नाही, पण अभ्यासक निवेदकाकडून अभ्यासविषयाच्या विविध बाजू समजून घेत असतो. त्यामुळेच तर वर म्हटल्याप्रमाणे अभ्यासकाला अभ्यास विषयासंबधीचा एक अंतरदृष्टी लागत असते. म्हणून तर पॉलिन यंग म्हणतात मुलाखत ही अशी सुव्यवस्थित पद्धती आहे की, ज्यायोगे तुलनेने त्रयस्थ असलेल्या व्यक्तीच्या जीवनात अभ्यासक कल्पना शक्तीच्या बळावर शिकत असतो.

अभ्यासक व निवेदक यांच्यामध्ये उत्कृष्ट सुसंवाद मुलाखतीद्वारा साधला जातो. निवेदक कोणत्याही समाजातील असो किंवा कोणतीही मूल्ये जपणारा असो. भौगोलिक, सांस्कृतिक, सामाजिक व आर्थिक भेद छेदून अभ्यासक व निवेदक यांच्यातील अंतर मुलाखतीद्वारे कमी होत असते. इतकेच नव्हे तर भावनिक व बौद्धिक पातळीवरचे अंतरही दोहोमधील याच माध्यमाद्वारे सतत कमी होत असते. म्हणूनच पी.व्ही यंग, मुलाखतीला अनौपचारिक व प्रभावी मौलिक संवाद असे म्हणतात हा संवाद एखाद्या निश्चित व सुस्थापित आशयास धरुन घडवून आणलेला असतो.

अभ्यासक व निवेदक यांचे सान्निध्य हे एका विशिष्ट हेतूसाठी निर्माण झालेले असते. अभ्यासक आपल्या अभ्यासविषयाच्या संदर्भात माहिती संकलित करीत असतो. इतकेच नव्हे तर अनेक हेतूसाठी सुध्दा विविध व्यक्ती एकमेकांच्या मुलाखती घेत असतात. एखाद्या मोकळ्या असलेल्या जागांसाठी योग्य उमेदवार निवडीसाठी उमेदवाराची चाचणी घेण्याचाही हेतू असतो. मुलाचे वर्तन योग्य होते की अयोग्य हे पाहण्यासाठी पालक व मुलगा यांची मुलाखत, पोलीस अधिकारी व गुन्हेगार यांची समोरा समोरची मुलाखत, प्राध्यापक व विद्यार्थी यांची मुलाखत, अभ्यासक्रम निश्चित करण्यासाठी पालक, विद्यार्थी व प्राचार्य यांची मुलाखत, अशा अनेक मुलाखतीचे हेतू एकच असतात असे नाही. त्यांचे हेतू विविध असतात. पण या वरुन एक बाब स्पष्ट होते, ती अशी की मुलाखती मागे कोणता ना कोणता तरी हेतू असतो. जॉन मॅज म्हणतात, मुलाखत हा काही हेतूंनी केलेला संवाद असतो हे हेतू विविध असतात उदा. विशिष्ट जागेसाठी उमेदवाराची निवड करणे , काही कृती ठरविणे, किंवां माहिती मिळविणे.

जेव्हा दोन किंवा अधिक व्यक्ती एकमेकांच्यासंपर्कात येत असतात तेव्हा त्या एकमेकांवर कळत न कळपतपणे प्रभाव पाडीत असतात. परपरांमुळे परस्परांचे वर्तन बदलत असते. परस्परांवर प्रभाव पाडणाऱ्या सामाजिक संबंधाला आंतरक्रिया म्हणतात. मुलाखतीमध्ये ज्या व्यक्ती एकमेकांच्या संपर्कात येत असतात. त्यांच्यामध्ये असे विशिष्ट सामाजिक संबंध उभारलेले असतात. हाव भाव,मुद्राविष्कार व शाब्दिक अविष्कार या माध्यमातून सामाजिक आंतरक्रिया मूर्त होत असतात. बौद्धिक व भावनिक पातळीवर अभ्यासक व निवेदक एकमेकांवर प्रभाव पाडीत असातात. म्हणूनच गुड व हॅट म्हणतात, मूलतः मुलाखत म्हणजे सामाजिक आंतरक्रियांचीच प्रकिया आहे. व्हिव्हियन मामर यांनी मुलाखतीत ही आंतरक्रिया होत असते हाच मुद्दा मांडलेला आहे ते म्हणतात मुलाखतीमध्ये अशी एक सामाजिक परिस्थिती असते की, ज्यामध्ये अभ्यासक व निवेदक परस्परांना प्रतिसाद देण्याची मानसिक प्रक्रिया चालू असते.

मुलाखत हे तथ्यसंकलनाचे प्रभावी साधन आहे. अभ्यासक व निवेदक यांच्यामध्ये मुलाखतीद्वारा एक संवाद होत असतो. केवळ अभ्यासकच निवेदकाला प्रश्न विचारीत असतो व निवेदक त्या प्रश्नांचे उत्तर देत असतो असे नाही तर निवेदक ही त्यांना आपल्याशंका विचारुन किंवा प्रतिप्रश्न करुन आपल्या शंकाचे निरसन करीत असतो. हे एक प्रकारचे विचार व भावना यांचे मौखिक दळ-वळण चालू असते. मुलाखत व इतर पद्धती यांची तुलना करता हे स्पष्ट होते की, केवळ मुलाखतीमध्ये निवेदकांच्या अंत:करणाचे खुले वाचन करता येते. व्यक्तीच्या बाह्यवर्तनातून व्यक्तीच्या भावना पूर्णपणे समजतातच असे नाही. पण त्यांच्या अंत:करणाचा ठाव घेण्याचे सामर्थ्य मुलाखतीत निश्चितच आहे. निवेदकाची भावना, अनुभव, आठवणी, प्रेरणा इत्यादी जाणून घ्यावयाच्या असतील तर मुलाखतीविना दुसरा पर्याय नाही.

## ३.८ मुलाखतीची उद्दिष्टे :-

सामाजिक शास्त्रामध्ये कोणत्याही प्रश्नांचा अभ्यास करतांना त्यातील अनेक बारकावे टिपण्याचा प्रयत्न संशोधक करीत असतो. त्यासाठी अनेक तंत्राचा वापर संशोधक करीत असतात. प्रश्नावली, अनुसूची, जनगणना, विशिष्ट अभ्यास इत्यादी तंत्राचा वापर काही विशिष्ट हेतूंनी केलेला दिसून येतो. मुलाखतीच्या स्वरुपाचा विचार केल्यानंतर मुलाखतीचेही हेतू नेमके कोणते किंवा कोणत्या विशिष्ट कारणासाठी मुलाखतीचे तंत्र उपयुक्त ठरते हे पाहणे अगत्याचे ठरते हे हेतू खालीलप्रमाणे आहेत.

१. **प्रत्यक्ष संपर्क** - निवेदक व अभ्यासक यांच्या युतीतूनच अखेर मुलाखत यशस्वी होत असते त्यामुळे निवेदकाशी समोरासमोरचे संबंध निर्माण झाल्याविना कोणताही निवेदक खुल्या मनाने प्रश्नाचे उत्तर देणार नाही. त्यामुळे मुलाखतीची आरंभीची औपचारिकता सोडून त्यावर मात करण्याचे प्रयत्न निवेदकाचे असले पाहिजेत. इतकेच नव्हे तर निवेदकांच्या तोंडून कोणत्याही घटनेचे बारकावे व त्यांच्या स्वत:च्या त्या बाबतच्या प्रतिक्रिया अभ्यासकाला प्रत्यक्ष संपर्कातून टिपता येतात. पी.व्ही यंग म्हणतात ( निवेदकाचा ) अभिनय, विशिष्ट तऱ्हेच कटाक्ष, मुद्रेवरचे हावभाव, निवेदनातील अर्थपूर्ण थांबणे यामुळे अनेक सूक्ष्म जीवनांचे अविष्कार होत असते.

२. **खास माहिती प्राप्त करणे :** मुलाखतीचा हा सर्वात महत्वाचा उद्देश मानला पाहिजे. कारण ज्या निवेदकांची निवड मुलाखतीसाठी केलेली असते त्यांला घटनेसंबंधी काही विशेष माहिती असते. म्हणूनच त्यांच्या कडून ती माहिती मिळवणे आवश्यक असते. काही वेळेला त्यांच्या वैयक्तिक जीवनातील खळबळजनक घटना साद प्रतिसाद उमटवणाऱ्या असतात. अशी माहिती निवेदक करण्यास सहसा निवेदक तयार नसतो. म्हणून मुलाखतीत संवादाच्या ओधात अतिशय कौशलयाने या बाबीसंबंधी माहिती अभ्यासक काढू शकतो. ही बाब अन्य तंत्राने साध्य होत नाही हे लक्षात घेतले पाहिजे.

३. **गृहीत तत्वांचा शोध -** संशोधनामध्ये काही गृहीते मांडूनच त्या दिशेने संशोधकांची वाटचाल चालू होतते. पण कित्येक वेळेला संशोधकाने कल्पनाही केलेली नसते असे विचार व स्थिती त्यांचे दर्शन संशोधकाला मुलाखतीमध्ये होत असते. निवेदकांच्या विशिष्ट प्रतिक्क्रिया , अभिवृत्ती, दृष्टिकोन, आशा -आकांक्षा व त यांचे वर्तन इत्यादीची पार्श्वभूमी संशोधकाला माहित असतेच असे नाही. पण मुलाखतीद्वारे ही पार्श्वभूमी त्यांला समजल्यानंतर तो काही नवीन गृहीतत्त्वे मांडू शकतो. तेव्हा मुलाखतीमध्ये हाही हेतू अंतर्भूत झालेला असतो.

४. **गृहीत तत्वांची तपासणी -** कोणताही अभ्युपगम अगर गृहीत तत्व हे वास्तवावर आधारलेले असते. अमुक घटना का घडली याचे ते संभाव्य स्पष्टीकरण असते. पण अभ्युपगम म्हणजे स्वैर कल्पना नव्हे. चकोर पक्षी चांदणे पितो ही स्वैर कल्पना म्हटली पाहिजे. कारण ती सिद्ध करता येत नाही. पण अभ्युपगमाची चाचणी केली पाहिजे हे संभाव्य स्पष्टीकरण अचूक आहे की नाही, हे पाहण्यासाठी अधिक पुरावे गोळा करणे जरुरीचे असते . हे अभ्युपगम ग्राह्य ठरले तरच त्यांचा स्वीकार केला जातो. मुलाखतीचा हा एक महत्वांचा उद्देश असतो की, अभ्युपगमाची चाचणी निवेदकांशी प्रत्यक्ष संपर्क साधून केली जाते. अनेक व्यक्तीशी संवाद करुन एखाद्या विशिष्ट वर्तनाविषयी अगर घटनेविषयी अधिक माहिती गोळा केली जाते. तेव्हा गृहीत तत्वांची अगर अभ्युपगमाची चाचणी हाही मुलाखती चा एक उद्देश असतो. [६]

## ३.९ मुलाखतीचे गुण [७] :

मुलाखतीचे पूढील गुण आढळून येतात.

१. **उत्तम प्रतिसाद :** अभ्यासक व निवेदक यांचा प्रत्यक्ष संवाद मुलाखतीत घडत असतो. कोणत्याही प्रकारचा औपचारिक पडदा त्यामध्ये नसल्याने विषयासंबधीची बारीक सारीक माहिती अभ्यासकाला मिळत असते. निवेदकांचा उत्तम प्रतिसाद मिळत राहणे ही माहिती मिळविण्याच्या दृष्टीने महत्वाचे असते. अभ्यासक प्रत्यक्षपणे निवेदकांच्या संपर्कात येत असल्याने निवेदकांना प्रेरणा व स्फूर्ती मिळत राहते.

२. **सर्व थरातील लोकांचे सहकार्य :** मुलाखतीचा हा महत्वाचा गुण आहे. समाजातील सर्व थरातील लोकांशी संपर्क अभ्यासकाला साधता येतो. अशिक्षित, अडाणी साक्षरतापूर्व अवसथेत असलेले, अबालवृद्ध आदी लोकांना भेटून त्यांच्याशी चर्चा करता येते. इतर पद्धतीच्या मर्यादा यामुळे चटकन लक्षात येतात.

३. **विचारांचे अदान – प्रदान :** मुलाखत ही एकमार्गी नसते. अभ्यासकाने प्रश्न विचारावयाचे व निवेदकांनी उत्तर द्यावयाचे असे त्यांचे स्वरुप नसते. यामध्ये अभ्यासक निवेदक अभ्यासविषयासंबधी मनमोकळी चर्चा करीत असतात. विचारांचे आदान प्रदान सहजपणे होत असते.

४. **सखोल अभ्यासाची शक्यता :** मुलाखतीमध्ये दोहोचा संवाद घडत असल्याने विषयाची व्यापक चर्चा घडू शकते. कितीतरी बारीक सारीक माहिती अभ्यासकाला मिळत असते. कितीतरी सूक्ष्म बाबीसंबधीचे नाजूक पदर हळू हळू उलगडत जात असतात. अभ्यासक जर तयारीचा असेल तर याहून अधिक सखोल जाणे त्याला सहज शक्य होते. कित्येक वेळेला अभ्यासकाने अपेक्षिले नसेल एवढी थरारक व नाट्यमय माहिती त्याला मिळू शकते.

५. **खाजगी व व्यक्तिगत माहिती :-** काही घटनांची व्यापक माहिती घेत असतांना कित्येकवेळा निवेदकांच्या वैयक्तिक जीवनाला स्पर्श करणारे विषय येत असतात. इतर कोणत्याही तंत्रपद्धतीत ही माहिती मिळविणे शक्य नसते. पण मुलाखतीत मात्र अनौपचारिक व प्रत्यक्ष स्वरुपाचे संबंध निर्माण झाले असलयाने निवेदक कोणताही आडपडदा न ठेवता खाजगी स्वरुपाची माहिती देत असतो.

६. **लवचिकता :** अभ्यासकाला विषयाची सर्वांगीण माहिती घ्यावयाची असते. त्यातील काही माहिती स्फोटक व खळबळजनक असण्याची शक्यता असते. त्यासाठी निवेदकांची मन:स्थिती योग्य हवी व हा क्षण साधण्याचे स्वातंत्र्य अभ्यासकाला यामध्ये मिळत असते. कोणते प्रश्न निवेदकाला केव्हा व कोठे विचारावेत हा निर्णय घेण्याचा अवसर अभ्यासकाला मुलाखतीत मिळत असतो.

७. **खऱ्या – खोट्याची चिकित्सा :-** इतर तंत्राने मिळवलेली माहिती विश्वसनीय असतेच असे नाही. प्रश्नावलीतून उत्तरे देत असतांना एका विद्याविभूषित असलेल्या स्थापत्य शास्त्रज्ञाने असे अभ्यासकाला सांगितले की, ज्या प्रश्नांना आम्ही होय - उत्तरे लिहिलेली आहेत ती नाही अशी समजावीत . कारण एका विभागातील सर्वच कर्मचाऱ्यांनी त्यांच्या प्रश्नावली विभागप्रमुखा मार्फत अभ्यासकाला सुपूर्द केलेल्या होत्या. अशातऱ्हेची परिस्थिती मुलाखतीत येत नाही. अभ्यासकाला सुपूर्द केलेल्या होत्या. अशा तऱ्हेची परिस्थिती मुलाखतीत येत नाही. अभ्यासक व निवेदक समोरासमोर असतात. त्यांचे हावभाव, नेत्रपल्लवी , बोलण्याचा चढ-उतार यावरुन निवेदक प्रामाणिकपणे माहिती देत आहे की, नाही याचा वास अभ्यासकाला येत असतो. खरे कोणते व खोटे कोणते हे अभ्यासकाला कळून येते. श्रीमती यंग म्हणतात खऱ्याखोट्याची शहनिशा अभ्यासक जागेवरच करु शकतो. कार्यक्षम अभ्यासकाच्या सहवासात निवेदक मोकळ्या मनाने आपल्या मनातील भीती, गंड व भावनेने निथळणारे प्रसंग सांगत असतो. हे प्रश्नावलीने साध्य होत नाही.

८. **गैरसमज व संदिग्धता टाळणे शक्य** - अभ्यासक व निवेदक यांचा खुला संवाद मुलाखतीत घडत असतो. त्यामुळे ज्या विषयासंबंधी अभ्यासकाच्या मनात शंका व संदिग्धता असते त्यांचे निरसन त्याच वेळी करुन धेता येते. अभ्यासक व निवेदक या दोहोनाही मोकळेपणाने चर्चा करता येत असल्याने कोणत्याही बाबीबद्दल जे समज गैरसमज असतात ते वेळीच दूर करणे इथे शक्य होते.

९. **अज्ञान माहितीवर प्रकाश** : अभ्यासविषाच्या बाबतीत सर्वच माहिती अभ्यासकाला व काही निवेदकांना असते, असे नाही. कित्येकवेळेला माहिती देण्याची संधी न मिळालयाने किंवा देण्याची इच्छा नसल्याने काही घटनांची माहिती गुप्तच राहत असते, मै चूप रहूंगी, ही भूमिका निवेदकांची असण्याची शक्यता असते. पण मुलाखतीमध्ये अशी काही प्रेरणा निवेदकाला मिळाली तर अभावितपणे काही अज्ञान बाबीवर तो प्रकाश टाकीत असतो. अशातऱ्हेची संधी इतर तंत्रपद्धतीत मिळू शकत नाही.

वरिल मुलाखती ची उद्दिष्टये आणि गुण पाहता प्रस्तूत संशोधन विषयाच्या अनुषंगाने प्रामाणिक स्त्रोताअंतर्गत सामग्री संकलना करिता मुलाखत या सामग्री संकलन तंत्राचा उपयोग करण्यात आला होता.

तसेच पुढील प्रकरण ४ थे प्राप्त सामग्रीचे विश्लेषण यामध्ये प्राथमिक तसेच द्वितीयक स्त्रोताद्वारे प्राप्त माहितीचे विश्लेषण करण्यात आलेले आहे.

***

# संदर्भ

[१]दा.धो. काचोळे, 'सामाजिक संशोधन पद्धती , ' – प्रकाशक कैलास पब्लीकेशन औरंगाबाद प्रथम आवृत्ती १९९३, पृष्ठ क्र.२८ ते ३१

[२]दा.धो. काचोळे, 'सामाजिक संशोधन पद्धती ',– प्रकाशक कैलास पब्लीकेशन औरंगाबाद प्रथम आवृत्ती १९९३, पृष्ठ क्र.३४ ते ३५.

[३]दा.धो. काचोळे, 'सामाजिक संशोधन पद्धती ',– प्रकाशक कैलास पब्लीकेशन औरंगाबाद प्रथम आवृत्ती १९९३, पृष्ठ क्र.१६३.

[४]दा.धो. काचोळे, 'सामाजिक संशोधन पद्धती ', – प्रकाशक कैलास पब्लीकेशन औरंगाबाद प्रथम आवृत्ती १९९३, पृष्ठ क्र.१७० ते १७१.

[५]भांडारकर पु.ल., 'सामाजिक संशोधन पद्धती ', प्रकाशक महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ नागपूर, तिसरी आवृत्ती, १९८७,. पृष्ठ क्र. ३६६.

[६]गुरुनाथ नाडगोंडे,' सामाजिक संशोधन पद्धती ,' प्रकाशक फडके प्रकाशन, कोल्हापूर, प्रथम आवृत्ती १९८६, पृष्ठ क्र. ११३ ते ११८.

[७]गुरुनाथ नाडगोंडे, 'सामाजिक संशोधन पद्धती'' , प्रकाशक फडके प्रकाशन, कोल्हापूर, प्रथम आवृत्ती १९८६, पृष्ठ क्र. १२२ ते १२४.

*****

# प्रकरण ४ थे

# प्राप्त सामग्रीचे विश्लेषण

## ४.१ प्रास्ताविक :-

''<u>अमरावती जिल्हयातील कुणबी (मराठा) समाजाच्या सामाजिक गतिशीलतेचे समाजशास्त्रीय अध्ययन</u>'', या संशोधनाच्या अनुषंगाने प्रस्तूत प्रकरणात प्राथमिक तसेच द्वितीयक स्त्रोतां द्वारे प्राप्त माहितीचे विश्लेषण सविस्तर पणे करण्यात आलेले आहे.

## ४.२ प्राप्त सामग्रीचे विश्लेषण :-

प्रस्तूत संशोधन विषयाच्या अनूषंगाने एकूण ५०० कुणबी (मराठा ) कुटूंबाची नमुना म्हणून निवड करण्यात आली होती. परंतू त्यापैकी एकूण ३०६ उत्तरदात्यांनी मुलाखतीला आवश्यक असा प्रतिसाद दिला. या ३०६ उत्तरदात्यांनी कुणबी (मराठा ) समाजातील गतिशीलते विषयी जी माहिती दिली. त्याबाबत सविस्तर विश्लेषण सांख्यिकीय पद्धतीच्या शेकडा प्रतिशत प्रमाण पद्धतीद्वारे करण्यात आले असून त्याबाबत सविस्तर माहिती पुढील प्रमाणे .

## उत्तरदात्यांची वया बाबत माहिती

प्रस्तूत संशोधन विषयाच्या अनुषंगाने ज्या उत्तरदात्यांची नमुना म्हणून निवड करण्यात आली होती त्यांची वयानूसार माहिती पूढील तालिका क्रमांक ४.१ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.१

उत्तरदात्यांची वयानूसार माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | उत्तरदात्यांचे वय | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १. | २५ ते ३५ वर्षे | ६४ | २१% |
| २. | ३५ ते ४५ वर्षे | ४६ | १५% |
| ३ | ४५ ते ५५ वर्षे | १६० | ५२% |
| ४ | ५५ ते ६५ वर्षे | २४ | ०८% |
| ५ | ६५ वर्षाच्या वर | १२ | ०४% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरील तालिका क्रमांक ४.१ वरुन असे दिसून येते की, एकुण ६४ उत्तरदात्याचे वय हे २५ ते ३५ वर्षाच्या दरम्यान , ४६ उत्तरदात्यांचे वय हे ३५ ते ४५ वर्षाच्या दरम्यान, १६० उत्तरदात्यांचे वय हे ४५ ते ५५ वर्षाच्या दरम्यान, २४ उत्तरदात्यांचे वय हे ५५ ते ६५ वर्षाच्या दरम्यान तर एकूण १२ उत्तरदात्यांचे वय हे ६५ वर्षाच्या वर असून त्यांची शेकडा प्रमाण अनुक्रमे २१%, १५%,५२%,०८%,०४ % इतके आहे.

वरिल विश्लेषणा वरून असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांचे वय हे ४५ ते ५५ वर्ष दरम्यान असून त्यांची एकूण शेकडा प्रमाणे ५२ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.१

उत्तरदात्यांची वयानूसार माहिती दर्शविणारी आकृती




उत्तरदात्यांची संख्या

## मुळ गावा बाबत माहिती

कुणबी मराठा उत्तरदात्यांच्या मुळ गावाबाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४.२ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.२

उत्तरदात्यांची मुळ गावा विषयी माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | तपशिल | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | ग्रामीण भागातील | १७७ | ५८% |
| २. | शहरी भागातील | १२९ | ४२% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरील तालिका क्रमांक ४.२ वरुन असे दिसून येते की, एकूण १७७ मुळ उत्तरदात्याची गावे ग्रामीण भागातील असून त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ५८ टक्के इतके आहे तर, १२९ उत्तरदात्यांचे मुळ गाव शहरी भागातील असून त्यांचे शेकडा प्रमाणे ४२ टक्के इतके आहे.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, जास्तीत जास्त उत्तर दात्यांचे मुळ गांव ग्रामीण भागातील असून त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ५८ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.२

उत्तरदात्यांच्या मुळ गावाविषयी माहिती दर्शविणारी आकृती



## शिक्षण विषयक माहिती

उत्तरदात्यांच्या शिक्षणा विषयी माहिती पुढील तालिका क्रमांक ४.३ मध्ये दर्शविलेली असून त्याचे सविस्तर विवेचन पुढीलप्रमाणे.

तालीका क्रमांक ४.३

उत्तरदात्यांच्या शिक्षणाविषयी माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | उत्तरदात्यांचे शिक्षण | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | माध्यमिक शाळा | ०६ | ०२% |
| २. | मॅट्रीक | १८ | ०६% |
| ३. | पदवी | १७५ | ५७% |
| ४. | पदव्यूत्तर पदवी | १०७ | ३५% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरील तालिका क्रमांक ४.३ वरुन असे दिसून येते की, एकूण ०६ उत्तरदात्याचे शिक्षण माध्यमिक शाळे पर्यत एकूण १८ उत्तरदात्याचे शिक्षण मॅट्रीक पर्यत , एकुण १७५ उत्तरदात्यांचे शिक्षण पदवी पर्यत, तर एकुण १०७ उत्तरदात्यांचे शिक्षण पदवूत्तर पदवी पर्यत झालेले असून त्यांचे एकूण शेकडा प्रमाण अनुक्रमे ०२ टक्के, ०६ टक्के, ५७ टक्के, आणि ३५ टक्के इतके आहे.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांचे शिक्षण पदवी पर्यत झालेले असून त्यांचे एकुण शेकडा प्रमाणे ५७ टक्के इतके आहे.

## शैक्षणिक स्थळा बाबत माहिती

उत्तरदात्यांच्या शैक्षणिक स्थळा बाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४४ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.४

उत्तरदात्यांच्या शैक्षणिक स्थळा बाबत माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | उत्तरदात्यांचे शैक्षणिक स्थळ | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | ग्रामीण भागातील | ९८ | ३२% |
| २. | शहरी भागातील | २०८ | ६८% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरील तालिका क्रमांक ४.४ वरुन असे दिसून येते की, एकूण ९८ उत्तरदात्यांचे शैक्षणिक स्थळ हे ग्रामीण भागातील असून एकूण २०८ उत्तरदात्यांचे शैक्षणिक स्थळ हे शहरी भागातले आहे. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण अनुक्रमे ३२ टक्के आणि ६८ टक्के इतके आहे.

वरिल विश्लेषणा असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांचे शैक्षणिक स्थळ हे शहरी भागातील असून त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ६८ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.३

उत्तरदात्यांच्या शिक्षणाविषयी माहिती दर्शविणारी आकृती




उत्तरदात्यांचे शिक्षण

आकृती क्रमांक ४.४

उत्तरदात्यांच्या शैक्षणिक स्थळाविषयी माहिती दर्शविणारी आकृती



## शिक्षणाचे माध्यम

उत्तरदात्यांच्या शिक्षणाबाबत माध्यमाबाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४.५ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.५

उत्तरदात्यांच्या शैक्षणिक माध्यमाविषयी माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | उत्तरदात्यांचे शिक्षणाचे माध्यम | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | मराठी | १७७ | ५८% |
| २. | हिंदी | ०७ | ०२% |
| ३. | इंग्रजी | १२२ | ४०% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरिल तालिका क्रमांक ४.५ वरुन असे दिसून येते की, एकूण १७७ उत्तरदात्यांचे शिक्षण मराठी माध्यमातून, एकूण ०७ उत्तरदात्यांचे शिक्षण हिंदी माध्यमातून तर एकुण १२२ उत्तरदात्यांचे शिक्षण इंग्रजी माध्यमातून झालेले असुन त्यांचे एकूण शेकडा प्रमाण अनुक्रमे ५८ टक्के,०२ टक्के व ४० टक्के इतके आहे.

वरिल विश्लेषणा वरुन असे आढळून येते की, महत्तम उत्तरदात्यांचे शिक्षण हे मराठी माध्यमातून झालेले असून त्यांचे शेकडा प्रमाण ५८ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.५

उत्तरदात्यांच्या शैक्षणिक माध्यमा विषयी माहिती दर्शविणारी आकृती




उत्तरदात्याचे एकूण श.प्र.

शिक्षणाचे माध्यम

## व्यवसाया बाबत माहिती

उत्तरदात्यांच्या व्यवसायाबाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४.६ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.६

उत्तरदात्यांच्या व्यवसायाबाबत माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | उत्तरदात्यांचे व्यवसाय | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | शेती | १२९ | ४२% |
| २. | उद्योग | ३७ | १२% |
| ३. | नौकरी | ११६ | ३८% |
| ४. | मजुरी | २४ | ०८% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरिल तालिका क्रमांक ४.६ वरुन असे दिसून येते की, एकूण १२९ उत्तरदात्यांचा व्यवसाय शेती, एकूण ३७ उत्तरदात्यांचा व्यवासाय उद्योग, एकूण ११६उत्तरदात्यांचा व्यवसाय नोकरी तर एकुण २४ उत्तरदात्यांचा व्यवसाय मजूरी असून त्यांचे एकूण शेकडा प्रमाण अनुक्रमे. ४२ टक्के, १२ टक्के, व ०८ टक्के इतके आहे. वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येत आहे की, कुणबी मराठा समाजातील महत्तम व्यक्ती ह्या शेती च्या खालोखाल नोकरी करणारे आहेत. त्यांचे एकुण शेकडा प्रमाण अनुक्रमे २४ टक्के, व ३८ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.६

उत्तरदात्यांच्या व्यवसायाबाबत माहिती दर्शविणारी आकृती

उत्तरदात्याचे व्यवसाय



उत्तरदात्याचे एकूण शे.प्र.

## अमरावती जिल्हयात स्थायीक होण्याची कारणे

उत्तरदात्यांच्या अमरावती जिल्हयात स्थायीक होण्याच्या कारणाबाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४.७ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.७

अमरावती जिल्हयात स्थायीक होण्याची कारणे– या बाबत माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | तपशिल | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | व्यवसाय | १६८ | ५५% |
| २. | ओळखी | ९८ | ३२% |
| ३. | शेती | ४० | २३% |
| | एकूण | ३०६ | १००% |

पुढील सारणी क्रमांक ४.७ वरुन असे दिसून येते की, एकूण १६८ (५५ टक्के ) उत्तरदाते अमरावती जिल्हयात व्यवसायामुळे एकूण ९८ (३२ टक्के ) उत्तरदाते ओळखीमूळे तर ४० (२३ टक्के ) शेती मुळे स्थायिक झालेले आहेत.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदाते ते करीत असलेल्या व्यवसायामुळे अमरावती जिल्हयात स्थायीक झालेले असून त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ५५ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.७

अमरावती जिल्हयात स्थायिक होण्याची कारणे–याबाबत माहिती दर्शविणारी आकृती




स्थायिक होण्याची कारणे

## पूर्वजांचे समाजात स्थान

पूर्वजांच्या समाजाच्या स्थानाविषयी माहिती पुढील तालिका क्रमांक ४.८ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.८

उत्तरदात्यांच्या पूर्वजांच्या समाजातील स्थाना विषयी माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | पूर्वजांचे स्थान | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | उच्च | १७८ | ५८% |
| २. | मध्यम | १२२ | ४०% |
| ३. | कनिष्ठ | ०६ | ०२% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरिल तालिका क्रमांक ४.८ वरुन असे दिसून येते की, १७८ उत्तरदात्यांच्या मते त्यांच्या पुर्वजांचे समाजात उच्च स्थान होते. तर एकूण १२२ उत्तरदात्यांच्या मते त्यांच्या पूर्वजांचे समाजात मध्यम स्थान तर, एकूण ०६ उत्तरदात्यांच्या मते त्यांच्या पुर्वजांचे समाजात कनिष्ठ स्थान होते यांचे एकूण शेकडा प्रमाणे अनुक्रमे ५८ टक्के, ४० टक्के आणि ०२ टक्के इतके आहे.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांच्या मते त्यांचे पूर्वजाचें समाजात उच्च स्थान होते. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ५८ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.८

पूर्वजांच्या समाजातील स्थानाविषयी माहिती दर्शविणारी आकृती



## कुटुंब प्रकारा विषयक माहिती

उत्तरदात्यांच्या कुटुंब प्रकारा बाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४.९ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.९

उत्तरदात्यांच्या कुटुंब प्रकाराबाबत माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | कुटुंबाचा प्रकार | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | प्रारंभीक | २१ | ०७% |
| २. | विस्तारीत | ९८ | ३२% |
| ३. | संयुक्त | १८७ | ६१% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरिल तालिका क्रमांक ४.९ वरुन असे दिसून येते की, एकूण २१ (०७ टक्के ) उत्तरदात्यांचा कुटुंब प्रकार हा प्रारंभीक, एकूण ९८ (३२ टक्के ) उत्तरदात्यांचा कुटुंब प्रकार विस्तारीत तर एकूण १८७ (६१ टक्के ) उत्तरदात्यांचा कुटुंब प्रकार हा सयुक्त आहे.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांच्या कुटुंबाचा प्रकार हा संयुक्त असून त्यांचा एकूण शेकडा प्रमाण ६१ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.९

कुटुंब प्रकाराबाबत माहिती दर्शविणारी आकृती




कुटुंबाचा प्रकार

## अमरावती जिल्हयात देवाण-घेवाण आणि संबंध

उत्तरदात्याचे अमरावती जिल्याहयात देवाण-घेवाण व इतर समाजाशी असलेले संबंध याबाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४.१० मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.१०

अमरावती जिल्हयात देवाण-घेवाण व इतर समाजाशी असलेले संबंध याबाबत माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | उत्तरदात्यांचे संबंध | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | घनिष्ठ | १२९ | ४२% |
| २. | दुरचे | २८ | ०९% |
| ३. | देवाण-घेवाण पुरते | १४९ | ४९% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरिल तालिका क्रमांक ४.१० वरुन असे दिसून येते की, एकूण १२९ (४२ टक्के ), उत्तरदात्यांचे घनिष्ठ संबंध तर एकूण २८ (०९ टक्के ) दुरचे संबधं तर एकूण १४९ (४९ टक्के) उत्तरदात्यांचे देवाण - घेवाण पुरते संबंध इतर समाजाशी असल्याचे आढळून येते.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांचे इतर समाजाशी फक्त देवाण घेवाण पुरतेच संबंध असून त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ४९ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.१०

अमरावती जिल्हयात देवाण-घेवाण व इतर समाजाशी असलेले सबंध याबाबत

माहिती दर्शविणारी आकृती




अमरावती जिल्ह्यात देवाण -घेवाण संबंधाचे

स्वरूप

## अमरावती जिल्हयात कोणत्या भागात / गावात संबंध जास्त प्रमाणात प्रस्थापित

उत्तरदात्याचे अमरावती जिल्हयात कोणत्या भागात / गावात संबंध जास्त प्रमाणात प्रस्थापित झाले आहेत याबाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४.११ मध्ये दर्शविलेली आहे..

तालीका क्रमांक ४.११

उत्तरदात्यांचे कोणत्या गावात/भागात प्रस्तापित आहेत त्या संबंधी माहिती दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | तपशिल | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | ग्रामीण भागात | १४७ | ४८% |
| २. | शहरी भागात | १५९ | ५२% |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरील तालिका क्रमांक ४.११ वरुन असे दिसून येते की, एकूण १४७ (४८ टक्के ) उत्तरदात्यांचे अमरावती जिल्हयातील ग्रामीण भागातील तर एकूण १५९ (५२टक्के) टक्के उत्तरदात्याचे संबंध शहरी भागात जास्त प्रस्तापित झालेले आहेत.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांची अमरावती जिल्हयातील शहरी भागात संबंध प्रस्तापित झाले असून त्याचे एकुण शेकडा प्रमाण ५२ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.११

संबंध कोणत्या भागात /गावात प्रस्थापीत झालेले आहेत. याबाबत

माहिती दर्शविणारी आकृती




ग्रामीण / शहरी भाग

## उत्तरदाते ज्या भागात राहतात त्याची वैशिष्ठये

उत्तरदाते अमरावती जिल्हयात ज्या भागात राहतात त्या भागात वैशिष्टयाबाबत माहिती पुढील तालिका क्रमांक ४.१२ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.१२

उत्तरदाते ज्या भागात राहातात त्याची वैशिष्ठये दर्शविणारी तालिका :-

| अ.क्र | जागेची वैशिष्ये | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | विशेष करुन कुणबी (मराठा) जात | ६७ | २२% |
| २. | मिश्रीत जाती | १५९ | ५२% |
| ३. | व्यापारी जाती | २४ | ०८% |
| ४. | इतर जाती | ५६ | १८ % |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरिल तालिका क्रमांक ४.१२ वरुन असे दिसून येते की, एकूण ६७ (२२ टक्के ) उत्तरदाते ज्या ठिकाणी राहतात त्या ठिकाणी विशेष करुन कुणबी (मराठा) जातीची वस्ती जास्त प्रमाणात आहे. तर १५९ (५२ टक्के ) उत्तरदाते ज्या भागात राहतात त्या ठिकाणी मिश्रीत जाती तर २४ (०८ टक्के) उत्तरदाते त्या भागात व्यापारी जाती तर, ५६ (१८ टक्के ) उत्तरदाते ज्या भागात राहतात त्या ठिकाणी इतर जातीच्या समाजाची वस्ती आहे. वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदाते ज्या भागात राहतात त्या ठिकाणी मिश्रीत जाती आहेत. त्याचे एकूण शेकडा प्रमाण ५२ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.१२

उत्तरदाते ज्या भागात राहतात त्यांची वैशिष्टये-बाबत माहिती दर्शविणारी आकृती




भागाची वैशिष्टये

## समाजाच्या जीवनपद्धतीचे संरक्षण आणि समाजातील एकात्मते बाबत जागरुकता

समाजाच्या जीवनपद्धतीचे संरक्षण आणि समाजातील एकात्मते बाबत जागरुकता याबाबत उत्तरदात्यांच्या मताविषयी माहिती पुढील तालिका क्रमांक ४.१३ मध्ये दर्शविलेली आहे.

तालीका क्रमांक ४.१३

समाजाच्या जीवनपद्धतीचे संरक्षण आणि समाजातील एकात्मतेबाबतत जागरुकता याविषयी उत्तरदात्यांचे मत दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | उत्तरदात्याचं मत | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | पुर्णत: | २०९ | ६८% |
| २. | फारसा नाही | २७ | ०९% |
| ३. | उदासीन | ०६ | ०२% |
| ४. | विशेष रुची नाही | ६४ | २१ % |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरिल तालिका क्रमांक ४.१३ वरुन असे दिसून येते की, समाजाच्या जीवनपद्धती संरक्षण व समाजाच्या एकात्मते बाबत एकुण २०९ ( ६८ टक्के ) उत्तरदाते पूर्णत: जागरुक, २७ (०९ टक्के ) फारसे जागरुक नाहीत. तर एकूण ०६ (०२ टक्के ) उत्तरदाते जागरुकते

बाबत उदासिन आहेत. तर एकुण ६४ (२१ टक्के ) उत्तरदात्यांना समाजाच्या जागरुकतेबाबत विशेष रुची नाही.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येत `की, महत्तम उत्तरदाते समाजाच्या जीवनपद्धतीच्या संरक्षणा बद्दल तसेच समाजातील एकात्मतेबाबत पुर्णत: जागरुक असून त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ६८ टक्के इतके आहे.

आकृती क्रमांक ४.१३

समाजाच्या जीवनपध्दतीचे संरक्षण आणि समाजातील एकात्मतेबाबत जागृततात

याबाबत माहिती दर्शविणारी आकृती




समाजाच्या जीवनपध्दतीचे सरंक्षण आणि

समाजातील एकात्मेबद्दल जागृतता – केलेले प्रयत्न

## सामाजिक / सांस्कृतीक बाबी

उत्तरदात्यांच्या विविध सामाजिक / सांस्कृतिक बाबी विषयी माहिती पुढील तालिका क्रमांक ४.१४ मध्ये दर्शविलेली आहे.

तालिका क्रमांक ४.१४.

सामाजिक सांस्कृतिक बाबी विषयी माहिती दर्शविणारी तालिका.

| अ क्र | तपशिल | होय | | नाही | |
|---|---|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र | संख्या | शे.प्र |
| १ | आपल्या गावात / शहरात समाजाची उत्सव ,मेळावे इत्यादी भरतात काय ? | १४७ | ४८% | १५९ | ५२% |
| २. | आपण समारंभा मध्ये इतर समाजातील लोकांना आमंत्रित करता काय ? | १९० | ६२ % | ११६ | ३८% |
| ३ | आपल्या समाजाच्या गावात / शहरात काही संस्था आहेत काय ? | २२० | ७२% | ८६ | २८% |
| ४. | आपला अतरजातीय विवाहाला विरोध आहे काय ? | १७४ | ५७% | १३२ | ४३% |
| ५ | आपल्या समाजाची संस्कृती परंपरा दृढमुल व्हावी या करीता प्रयत्न करता काय ? | १९६ | ६४% | ११० | ३६% |
| ६ | आपल्या समाजाने सामाजिक क्षेत्रामध्ये उन्नती व्हावी या करीता आर्थिक सहाय्य करता काय ? | २३३ | ७६% | ७३ | २४% |

| ७. | अनुदान शिष्यवृत्ती / पारितोषीके इत्यादी देण्याचा प्रयत्न करता काय ? | २११ | ६९% | ९५ | ३१% |
|---|---|---|---|---|---|
| ८ | आपल्या पुर्वीच्या पिढ्यांच्या तुलनेत आपणांस असे वाटते की, आपल्या समोरील भविष्य हे जास्त उज्वल राहणार आहे. | २३९ | ७८% | ६७ | २२% |
| ९ | आपण सांस्कृतिक आत्मा स्विकारला तरच आपला विकास होवू शकेल असे आपणांस वाटते काय ? | १७७ | ५८% | १२९ | ४२% |

वरिल तालिका क्रमांक ४.१४ वरुन असे दिसून येते की, एकूण १४७ (४८ टक्के ) उत्तरदात्यांच्या मते गावात / शहरात उत्सव मेळावे भरतात तर एकूण १५९ (५२टक्के ) उत्तरदात्यांच्या मते गावात / शहरात समाजाचे उत्सव मेळावे भरत नाहीत. तसेच १९० (६२टक्के) उत्तरदात्यांच्या मते ते समाजाच्या समारंभामध्ये इतर समाजातील लोकांना आमंत्रित करतात. तर एकूण ११६ (३८ टक्के ) उत्तरदात्यांच्या मते ते इतर समाजातील लोकांना आमंत्रित करीत नाहीत. त्याप्रमाणे एकुण २२० ( ७२ टक्के ) उत्तरदात्यांच्या मते समाजाच्या गावांत / शहरात विविध संस्था आहेत. तर अश्या प्रकारच्या संस्था नसल्याचे एकूण ८६(२८टक्के) उत्तरदात्यांचे मत आहे. आंतरजातीय विवाहाला एकूण १७४ (५७ टक्के) उत्तरदात्यांचा विरोध असून एकूण १३२ ( ४३टक्के ) उत्तरदात्यांचा अंतरजातीय विवाहाला विरोध नाही. तसेच आपल्या समाजाची संस्कृती, परंपरा दृढमूल व्हावी या करीता १९६ ( ६४ टक्के ) उत्तरदाते प्रयत्न करतात तर एकूण ११०

(३६ टक्के ) उत्तरदाते कोणत्याही प्रकारचे प्रयत्न करीत नाहीत. त्याचप्रमाणे सामाजिक क्षेत्रात समाजाची उन्नती व्हावी या करीता एकुण २३३ (७६ टक्के ) उत्तरदाते आर्थिक सहाय्य करतात. तर एकूण ७३ (२४ टक्के ) उत्तरदाते कोणतेही प्रकारचे आर्थिक सहाय्य करीत नाहीत. एकूण २११ (६९ टक्के ) उत्तरदाते अनुदान शिष्यवृत्ती, आणि पारितोषीके इत्यादी देण्याचा प्रयत्न करतात. तर ९५ (३१ टक्के ) उत्तरदाते अश्या प्रकारचा प्रयत्न करीत नाहीत. तसेच एकूण २३९ (७८ टक्के ) उत्तरदात्यांच्या मते पूर्वीच्या पिढ्याच्या तुलनेत त्यांच्या समोरील भविष्य हे जास्त उज्वल राहणार आहे. तर ६७ (२२ टक्के ) उत्तरदात्यांना त्यांच्या समोरील भविष्य उज्वल राहणार नाही असे वाटते. त्याचप्रमाणे आपण स्थानिक सांस्कृतिम आत्मा स्विकारला तरच आपला विकास होवू शकेल असे एकूण १७७ (५८ टक्के ) उत्तरदात्यांना वाटते तर एकूण १२९ ( ४२ टक्के ) उत्तरदात्यांना असे वाटत नाही.

वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांच्या मते शहरात गावात समाजाचे उत्सव मेळावे भरत नाहीत. त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ५२ टक्के इतके आहे.

महत्तम उत्तरदाते समाजाच्या समारंभात इतर समाजातील लोकांना आमंत्रित करतात त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ६२ टक्के इतके आहे. तसेच महत्तम उत्तरदात्यांच्या मते गावात , शहरात समाजाच्या संस्था आहेत त्यांचे एकूण शेकडा प्रमाण ७२ टक्के इतके आहे, तसेच ५७ टक्के उत्तरदात्यांचा आंतरजातीय विवाहाला विरोध आहे. तर समाजाची संस्कृती परंपरा दृढमूल व्हावी याकरीता ६४ टक्के उत्तरदाते प्रयत्न करतात . तसेच आपल्या समाजाची सामाजिक

क्षेत्रामध्ये उन्नती व्हावी याकरीता ७६ टक्के उत्तरदाते आर्थिक सहाय्य करतात. तर ६९ टक्के उत्तरदाते अनुदान, शिष्यवृत्ती, पारितोषिके, इत्यादी देण्याचा प्रयत्न करतात. तसेच ७८टक्के उत्तरदात्यांच्या मते त्यांच्या पूर्वीच्या पिढ्यांच्या तुलनेत त्यांचे समोरील भविष्य हे उज्वल राहणार आहे. तर ५८ टक्क उत्तरदात्यांच्या मध्ये स्थानिक सांस्कृतिक आत्मा स्वीकारला तर त्यांचा विकास होवू शकतो.

आकृती क्रमांक ४.१४

गावात / शहरात समाजाचे उत्सव मेळावे इत्यादी भरतात काय? याबाबत माहिती दर्शविणारी आकृती




उत्तरदात्याचे एकूण शे.प्र.

आकृती क्रमांक ४.१५

समारंभामध्ये इतर समाजातील लोकांना आमंत्रण-याविषयी

माहिती दर्शविणारी आकृती



आकृती क्रमांक ४.१६

समाजाच्या गावात/शहरात काही संस्था आहेत काय? याप्रश्नाबाबत

माहिती दर्शविणारी आकृती




उत्तरदात्याचे मत

आकृती क्रमांक ४.१७

आतंरजातीय विवाहाला विरोध याबाबत माहिती दर्शविणारी आकृती




उत्तरदात्यांचे मत

आकृती क्रमांक ४.१८

समाजाची संस्कृती परंपरा दृढमूल व्हावी याकरिता प्रयत्न करता काय?

माहिती दर्शविणारी आकृती




उत्तरदात्यांचे मत

आकृती क्रमांक ४.१९

समाजाची सामाजीक क्षेत्रामध्ये उन्नती–याबाबत माहिती दर्शविणारी आकृती




समाजाची सामाजीक क्षेत्रामध्ये उन्नती या करिता

आर्थिक साहाय्य - होय - ७६%

नाही –२४%

आकृती क्रमांक ४.२०

अनुदान , शिष्यवृत्ती, पारितोषीके -याबाबत माहिती दर्शविणारी आकृती




अनुदान शिष्यवृत्ती पारितोषीके इत्यादी देण्याचा प्रयत्न

होय - ६९%

नाही - ३१%

आकृती क्रमांक ४.२१

पुर्वीच्या पिढीच्या तुलनेत समोरील भविष्य –याबाबत माहिती दर्शविणारी आकृती




पुर्वीच्या पिढीच्या तुलनेत समोरील भविष्य जास्त उज्वल राहणार

आहे.– होय – ७८

नाही –२२%

आकृती क्रमांक ४.२२

स्थानिक सांस्कृतीक आत्मा स्विकारणे आणि विकास -याबाबत माहिती दर्शविणारी आकृती




आपण सांस्कृतीक आत्मा स्विकारला तरच आपला विकास होऊ शकेल असे आपणास वाटते काय?

होय - ५८%

नाही -४२%

## मुला मुलीच्या आंतरजातीय विवाह बद्दल मत

मुला मुंलींच्या आंतरजातीय विवाहबद्दल उत्तरदात्यांच्या मता विषयी माहिती पुढील तालीका क्रमांक ४.१५ मध्ये दर्शविलेली आहे.

तालिका क्रमांक ४.१५

मुलामुलींच्या आंतरजातीय विवाहाबाबत उत्तरदात्यांचे मत दर्शविणारी तालिका.

| अ.क्र | तपशिल | उत्तरदाते | |
|---|---|---|---|
| | | संख्या | शे.प्र. |
| १ | अतिसहमत | ३४ | ११% |
| २. | सहमत | ४६ | १५% |
| ३. | तटस्थ | ५५ | १८% |
| ४. | असहमत | १७१ | ५६ % |
| | एकूण | ३०६ | १००% |

वरिल तालिका क्रमांक ४.१५ वरुन असे दिसून येते की, मुलामुलीच्या आंतरजातीय विवाहावर एकूण३४ (११ टक्के ) उत्तरदात्यांनी अति सहमत एकूण ४६ (१५ टक्के ) सहमत एकूण ५५ उत्तरदात्यांनी ( १८ टक्के ) उत्तरदात्यांनी तटस्थ तर एकूण १७१ (५६ टक्के ) आपले असहमत मत प्रर्दशित केल्याचे दिसून येते. वरिल विश्लेषणा वरुन असे दिसून येते की, महत्तम उत्तरदात्यांनी मुलां मुलींच्या अंतरजातीय विवाहा बाबत असहमती दर्शविलेली असून त्यांची एकूण शेकडा प्रमाण ५६ टक्के इतके आहे.

